भारत-गौरव-ग्रंथमाला
पुष्प १२७ वें.

# छाया-प्रकाश



न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
—भगवान् श्रीकृष्ण

लेखक
गोपीनाथ तळवलकर

१९३६

— किंमत —

साधी बांधणी रु. १ कापडी बांधणी रु. १।

प्रिय सुहृद्

अॅ. दामोदर पंढरीनाथ शिखरे

एल्एल्. बी. [ जज्ज स्पेन्सरप्राइझ्मन् ]

यांस

सप्रेम समर्पण

प्रस्तुत है प्राणस्नेही
चुप थी अब भी वैदेही
कहती क्या वे प्रिय जाया
जहाँ प्रकाश वहीं छाया

—मैथिलीशरण

*　　　　*　　　　*　　　　*

". . . . Being a finished child of nature, not a joint product like most of us, of nature, history, and society, he abounded miraculously in his own clear sense, but was obtuse to the droll, miscellaneous lessons of fortune."

—*George Santayana*

## याच लेखकाचीं इतर पुस्तकें

१ आशियाचे धर्मदीप ( चरित्र-प्रबंध )
२ दूर्वांकुर ( कविता )
३ साराच चमत्कार ( मुलांकरितां कादंबरी )
४ चंद्रशेखर आणि मोह्ना ( परीकथा )
५ पुणें ( स्थलवर्णन )
६ आजकालच्या थोर विभूति ( चरित्रात्मक )

---

## संकल्पित

१ आकाशमंदिर ( कादंबरी )
२ गृहरत्नें ( बालस्वभावचित्रें )

---

# प्रस्ताव

श्री

शिरोडें
८–८–३६

प्रिय गोपीनाथ,

स. न. वि. वि.

तुमचें पत्र पोंचलें. कादंबरीचे फॉर्मही मिळाले. फॉर्म शब्द वापरतांना मन थोडेंसें कचरलें. फर्मे, स्थूलमुद्रितें, सूक्ष्म मुद्रितें इत्यादि शब्दही डोळ्यांपुढून गेले. पण त्यांतल्या एकानेंही मनाचें समाधान होईना. मनाप्रमाणें भाषेची शुद्धि हेंही मोठें बिकट काम दिसतें ! नाहीं ?

हस्तलिखितापेक्षां मुद्रित मजकूर चांगला दिसतो हें कांहीं खोटें नाहीं. कविता वहींतून वाचण्यापेक्षां मासिकांतून वाचली म्हणजे तिची गोडी वाढते असें केशव-सुतांना (का विनायक कोंडदेव ओकांना ? स्मरणशक्तीचा प्रयोग करीत बसत नाहीं, दोघांपैकीं कोणातरी एकाला एवढी खात्री आहे !) वाटत असे म्हणतात. पत्रिकां-प्रमाणें दिसणारीं प्रुफें वाचण्यापेक्षां बांधलेलें सुंदर पुस्तक वाचून मनावर अधिक अनुकूल परिणाम होणें शक्य आहे ! नाहींतरी आपल्या समाजांत मुलगी पसंत केली जाते, ती पांच मिनिटें नुसतें तिच्याकडे पाहूनच नाहीं का ? अर्थात् तुमची कादंबरी-कन्यका मला दिसली त्यापेक्षां इतरांना अधिक मोहक दिसेल हें ओघानेंच आलें.

**काव्य व निबंध या क्षेत्रांतून कादंबरीच्या क्षेत्रांत तुम्हीं पाऊल टाकलेंत हें पाहून अत्यंत आनंद झाला.** बोलपटांनीं रंगभूमीचा बेरंग केला, त्याप्रमाणें लघुकथा कादंबरीला निस्तेज करून टाकते कीं काय अशी अलीकडे भीति उत्पन्न झाली होती. विमानविद्या कितीही पूर्णतेला पोंचली तरी तिला आग-गाड्या व आगबोटी यांचें उच्चाटण करणें शक्य नाहीं. लघुकथा व कादंबरी यांचा संबंध असाच आहे. पण वर्षाकांठीं हाताच्या बोटांवर मोजतां येण्याजोग्याही वाच-नीय कादंबऱ्या प्रसिद्ध होत नाहींत असें दिसून आल्यावर वरील भीति अकारण

होती असें कोण म्हणेल? गेल्या २–३ वर्षांत अनेक तरुण लेखकांनीं कादंबरीक्षेत्रांत उत्साहानें पदार्पण केल्यामुळें ही भीति नाहींशी होत आहे. या लेखकांच्या पथकांत सामील झाल्याबद्दल मी तुमचें अभिनंदन करतों. जीवनाचें यथार्थ प्रतिबिंब दर्शविण्याला कादंबरीइतकें वाङ्मयाचें दुसरें कोणतेंच क्षेत्र अनुकूल नाहीं. रंगभूमीवरील नट बोलपटांत चमकूं शकत नाहीं, या समजुतीप्रमाणें **काव्यक्षेत्रांतील लेखक कादंबरीसारख्या गद्यक्षेत्रांत यशस्वी होऊं शकत नाहीं, असें आपल्याकडे मानलें जातें. हा ग्रह नाहींसा करण्याला तुमच्यासारख्यांचें लेखन निःसंशय उपयोगी पडेल.**

**तुम्हीं या कादंबरींत समाजवादी नायक निर्माण केलात हें काळाच्या ओघाला धरूनच आहे.** हरिभाऊंचे गणपतराव, रघुनाथराव आणि यशवंतराव हे आपल्या काळांतील प्रगतिपर विचारांचे जसे प्रतिनिधी होते, त्याप्रमाणें **तुमचा प्रकाश सुशिक्षित व तेजस्वी तरुणाचें तळमळणारें मन व्यक्त करतो यांत संशय नाहीं. शशांक, किशोर व सदानंद यांच्या विविध स्वभावाच्या पार्श्वभूमीवर प्रकाशचें स्वभावचित्र निःसंशय उठून दिसतें.** सदानंदाच्या पात्रामुळें अनेक भाईबंद तुमच्यावर फार रागावतील. कॉमरेड दाखवायचा आणि तो अशा उलट्या काळजाचा? प्रत्येक कळपांत शेळीचें कातडें पांघरणारा लांडगा असूं शकतो हें ते विसरतातच!

छाया, सुलभा, चित्रलेखा, शेवंती इत्यादि स्त्रीभूमिकांतही चांगलें वैचित्र्य आहे. मात्र कादंबरीच्या विस्ताराच्या मानानें तिच्यांत पात्रांची फार दाटी झाली आहे असें वाटतें. चित्रलेखा व शेवंती यांच्या भूमिकांत वैशिष्ट्य आहे. पण एका कुंडींत अनेक रोपें लावूं नयेत हेंच खरें. **आनंदाची गोष्ट हीच कीं, मनुष्याप्रमाणें लेखकाचेही जे षड्रिपु असतात त्यांतील मोहालाच तुम्ही बळी पडलां आहां.** कामदेवाच्या भजनीं लागून कादंबरी सुरस करण्याचा अगर मत्सरानें ग्रस्त होऊन, आपल्याला अप्रिय असलेल्या माणसांच्या निंदेनें कादंबरीला रंग आणण्याचा संप्रदाय महाराष्ट्रांत सध्या रूढ होऊं पाहात आहे. त्यापासून तुम्ही अगदीं अलिप्त आहांत हें तुमची कादंबरी न आवडणाराही कबूल करील.

कादंबरींत कथानकाची गुंतागुंत करून उत्कण्ठा उत्पन्न करण्याचा तुमचा प्रयत्न योग्य दिशेनेंच झाला आहे. मात्र सुलभेला फसवून मोहजालांत पकडण्याचा प्रकार

फार घाईचा वाटतो. शेवंतीच्या नवऱ्याची आत्महत्त्या तर अपघाताच्या सदरांत येईल. कथानक वेगांत आल्यावर असा एखादा अपघात क्षम्य ठरतो ही गोष्ट निराळी ! प्रस्तुत कादंबरींतील झडतीचा काय अगर कारखान्याच्या आगीचा काय दोन्ही प्रसंग प्रथमदर्शनीं महत्त्वाचे वाटतात. पण त्यांचा पुढें कथानकाशीं कांहींच संबंध येत नसल्यामुळें वाचक ते विसरून जातो. कादंबरीचें कथानक फुलांच्या वेणीपेक्षां पेडाच्या वेणीसारखें असलें तर अधिक आकर्षक होतें.

गुलाबाचें फूल कुणी त्याचे कांटे मोजण्याकरितां जवळ घेत नाहीं. तेव्हां माझ्या अंगांत संचारलेल्या टीकाकाराला इथेंच मुक्ति देतों. तुमची कादंबरी वाचून हाता-वेगळी केल्यावर, "वणव्याचा प्रकाश काळोखांत दहाबारा मैलांवरून मोहक दिसतो; पण जसजसं जवळ जाऊं लागावं तसतसा त्याचा दाहकपणा प्रत्ययाला येतो." या प्रकाशाच्या वाक्यासारख्या अनेक वाक्यांवर मन रमूं लागलें. असा सुवास असल्यावर कांट्यांची काळजी कोण करतो ?......

तुमचा,

**वि. स. खांडेकर**

# दोन शब्द

या कादंबरीची कल्पना आणि आराखडा आज दोन वर्षें मनांत घोळत होता; परंतु प्रत्यक्ष लेखनास ता. २६–७–३६ रोजीं सुरुवात झाली. पण पांच प्रकरणें लिहून झाल्यावर लेखनाला अर्धविराम मिळाला. या वर्षीच्या फेब्रुवारी महिन्यांत लेखनास पुनः सुरुवात केली आणि मग मात्र दोन अडीच महिन्यांतच कादंबरी लिहून हातावेगळी केली. 'अर्वाचीन साहित्य' या ग्रंथांत आणि 'ध्रुव', 'विहार', 'संजीवनी', 'प्रकाश' इ० नियतकालिकांत या कादंबरीच्या प्रकाशनाबद्दलच्या वार्ता प्रसिद्ध होत गेल्यानें, लेखनास एक प्रकारें हुरूप आला हें कृतज्ञतापूर्वक नमूद करावेंसें वाटतें. कादंबरीच्या रचनाकालांत आणि नंतर, तिच्या सदृश नांवाचे हिंदी व मराठी १–२ बोलपट निघाले. अर्थात् त्यांचा कादंबरीशीं नांवापुरताहि संबंध नाहीं हें उघड आहे!

सिनेमाप्रमाणें कांहीं ठळक प्रसंगांचें विस्तृत वर्णन देऊन, त्यांतून कथानकाचें सूत्र ओंवावयाचें असें एक विशिष्ट तंत्र या कादंबरींत उपयोगांत आणिलेलें दिसेल. एकाद्या घटनेंत कथानकाचा विकास होईल, दुसऱ्या प्रसंगांत वातावरणाची कल्पना येईल, आणि तिसऱ्या एकाद्या हकीकतींत पात्रांचे स्वभावविशेषच स्पष्ट होतील. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे कांहीं प्रकरणांत बाह्यतः दिसणारा अलगपणा नाहींसा होऊन, सर्व कादंबरींत एक प्रकारचा अखंडपणा आहे हें कळून येण्यासारखें आहे.

कुठें कुठें कला व तत्त्वज्ञान यांचीहि चर्चा आहे. भौतिकवादी दृष्टीचा प्रचार व प्रसार सध्यांच्या शास्त्रीय युगांत सर्वत्र होतांना दिसला, तरी कांहीं श्रेष्ठता, ध्येयें, गुणविशेष असे असणारच कीं, जेथें अध्यात्म व भौतिकता यांचें मीलन व्हावें. त्या मीलनाचा महोत्सव चितारणें हें कलेचें पवित्र कर्तव्य होय. मीं तें कितपत पार पाडलें आहे हें रसिक वाचक ठरवितीलच.

'तुम्ही लिहा हो कादंबरी; छान लिहाल तुम्ही.' अशा उत्साहवर्धक शब्दांनीं प्रि. बाबूराव अत्रे यांनीं कादंबरीलेखनास मला प्रवृत्त केलें; आणि बॅ. विठ्ठलराव

तारकुंडे, भय्याजी उमराणी, बाबा जोशी, निरंतर, पुरंदरे इत्यादि माझ्या सुविद्य बालमित्रांनीं मला वेळोवेळीं डवचून हें काम माझ्याकडून करून घेतलें. हस्तलिखित वाचून सूचनाहि केल्या. रा. क्षीरसागर यांच्या मूलग्राही चर्चेचा उपयोग कथारचनेंत पुष्कळ झाला. प्रो. बापूराव कर्वे यांचें प्रोत्साहन नेहमींच मिळावयाचें. चित्रकार गोंधळेकर यांनीं केवळ बाह्यांगालाच आपल्या कला-चातुर्यानें शोभा आणिली असें नव्हे, तर कादंबरीच्या अंतरंगांतहि ( विशेषतः कलाविषयक विवेचनांत ) त्यांच्या नित्य सहवासाचा फार फायदा मला मिळाला. मुखपृष्ठावरील 'अक्षर'—लेखन सुप्रसिद्ध कथालेखक रा. य. गो. जोशी यांच्या कुंचलींतून झालें आहे.

कादंबरी लिहून पुरी होतांच ती छापण्याची तत्परता रा. मंगेशराव कुलकर्णी यांनीं दाखविली. त्यांच्या प्रख्यात मुद्रणमंदिराची व ग्रंथमालेची थोर प्रतिष्ठा माझ्या पहिल्याच कादंबरीला मिळाली, याचा मला साहजिकच अभिमान वाटतो. पण त्या भरांत ती मिळवून देण्याचे कामीं रा. गं. दे. खानोलकर यांनीं दाखविलेली आस्था मी विसरणार नाहीं.

सुविख्यात साहित्यसेवक रा. भाऊसाहेब खांडेकर यांचें खाजगी पत्र त्यांच्या परवानगीनें कादंबरीला प्रस्ताव ( Foreward ) म्हणून जोडीत आहें. त्यांच्या माझ्यावरील लोभामुळें हा प्रस्ताव विनासायास मिळाला असला तरी त्याच्या बहुमोलपणाची मला जाणीव आहे.

या सर्व स्नेह्यांचें ऋण मी आनंदानें शिरावर वाहत आहें. माझ्या या पहिल्या कथाकृतीचें रसिक महाराष्ट्र योग्य तें कौतुक करील अशी आशा वाटते.

१५–९–३६<br>
भाऊमहाराज बाग कॉलनी,<br>
१९६/४१ सदाशिव, पुणें २

गोपीनाथ तळवलकर

## .१.  'शांतिनिकेतन'

डेक्कन जिमखान्यावरील 'शांतिनिकेतन' हा बंगला नांवाप्रमाणेंच शांत पण रम्य दिसे. त्याची बांधणी साधी व प्रमाणबद्ध होती. कुंपणाचे खांब, प्रवेशद्वार, खिडक्या, आवारांतील उपवनासारखी दिसणारी फुलभाग, भिंती इ० मधील रंग-संगती इतकी बेमालूम जुळलेली होती कीं हें काम खास कोणातरी चतुर कला-वंताचेंच आहे असा पाहणाराचा साहजिक ग्रह होई. बंगल्याच्या रमणीयतेला निस-र्गानेंहि भरपूर मदत केली होती. एका बाजूला नदी, झाडी, टेकड्या; दुसऱ्या बाजूला टिळक तलावाचें चकचकणारें पाणी; आणि मागच्या बाजूस लांब क्षिति-जावर डोंगरांची रांग व पलीकडे स्वर्गद्वाराच्या पायरीप्रमाणें शोभणारा सिंहगड अशा देखाव्यामुळें मधील चित्राला चांगला उठाव मिळे. बंगल्यावर '१९३५' असें त्याचें जन्मवर्ष दिलें होतें. आणि शिरोभागीं झळकणारी रेडिओची दांडी बंगल्यां-तील मंडळींच्या आधुनिकपणाची ग्वाही देत होती.

बंगल्याच्या आवारांत एक तरुण चित्रकार एका वैदू जोडप्याचें चित्र तयार कर-ण्यांत तल्लीन झाला होता. काळ्या नागांसारखें दिसणारें तें वैदू जोडपें चित्रकारा-पासून पांच सात हातांच्या अंतरावर बसलें होतें. वैदू मधून मधून चंची सोडून तमाखू तोंडांत टाकी. नवराबायको आपल्या प्राकृत बोलींत कांहींतरी बोलत होतीं. चित्रकार मध्येंच त्यांना आपल्याकडे पाहण्यास सांगे. बाकी तीं दोघें पूर्ण मोकळे-पणानें वागत होतीं. आपल्या दोघांचें चित्र काढलें जात आहे याबद्दल कांहीं आनंद, कुतूहल, किंवा उत्कंठा दोघांनाहि नव्हती. मग त्यांचें अज्ञान म्हणा, किंवा त्यांना अशा गोष्टींचा सरावच झाला होता म्हणा !

चित्रकाराचें वय पंचवीसच्या आसपास असावें. त्याचा बांधा सुकुमार व मध्यम होता. त्याचें गोरेंपण अगदीं हिमासारखें आणि ओलसर दिसे. परमेश्वरानें ही मूर्ति रंगविल्यावर वाळूंसुद्धां न देतां भूमीवर पाठविली कीं काय असें एकाद्याला वाटलें असतें. काळेभोर केस, मोठें पण नितळ कपाळ, सरळ पण नाजुक नासिका, लाल व रेखीव जिवणी, गुलाबाच्या आंतील पाकळ्यांसारखे दिसणारे कान इ० त्याच्या चेहऱ्याचे मनोहर विशेष कोणाच्याहि सहज लक्षांत आले असते. तांबुस फ्रेमच्या चष्म्यानें त्याच्या चेहऱ्यावरील जनानी सात्त्विकपणाला अधिकच मार्दव आलें होतें. त्यानें फक्त मलमलीचा शर्ट अंगांत घातला होता. वाऱ्यानें कपाळावर पुढेंपुढें भुरभुरणारे केस मागें सारतांना किंवा कॅनव्हस जरा दूर सरकवून निरीक्षण करतांना त्याची हालचाल अतिशय मोहक दिसे. वैदूला आणि त्याच्या बायकोला मधून मधून तो कांहीं सूचना देई. त्यांच्या चेहऱ्यावरील एकादी अगदीं सूक्ष्म छटा आतां साधणार असें दिसलें कीं त्याचा चेहरा प्रफुल्ल होई; मग तो अधिकच कसोशीनें रंगमिश्रण करून कामांत जास्त गढून जाई. अशा वेळीं वरचा ओठ झाकून आणि जिवणीच्या एका टोकाला थोडी मुरड घालून तो कुंचलीचे फराटे मोठ्या जलदीनें देऊं लागे.

इतक्यांत फाटक वाजलें आणि—

" काय शशांक, आज हें मॉडेल घेतलें आहे वाटतं ?" असे शब्द त्याच्या कानावर आले.

शशांकनें वर पाहिलें—

" कोण प्रकाश !"

शशांकचा चेहरा तात्काळ आरक्त आणि आनंदित झाला. त्यानें त्या वैदूला लगेच जायला सांगितलें. त्यांच्या बैठकीबद्दल ( sitting ) त्यांना ठरलेला मुशाहिरा देऊन टाकिला, आणि प्रकाशच्या गळ्यांत दोन हातांची मिठी घालून लडिवाळपणें त्याला विचारलें—

" आतांच आलास ना ? "

" नाहीं-नाहीं. मला चांगलीं पंधरा मिनिटें झालीं येऊन. फाटकाच्या बाहेर उभा राहून आमच्या कलावंताची सविकल्प कीं काय ती समाधि पाहत होतों. "

हें ऐकून शशांक गोंधळला. पण कांहींतरी बोलण्याच्या उद्देशानें तो म्हणाला—

" अरे, तुम्ही ज्या गरिबांकरितां आपल्या जिवांचं रान करतां आहांत त्या गरिबांना कलेच्या साम्राज्यांत अजरामर करीत होतों. "

" ओहो, क्रांति चिरायु होवो ! बहुजनांच्या उद्धारासाठीं झटणारे तुझ्यासारखे गोड कलावंत आमच्या पक्षाला मिळाल्यावर समाजक्रांति व्हायला काय रे उशीर !" प्रकाश इतकें बोलून मोठ्यानें हसला. त्याच्या बोलण्यांत कौतुकाचाच भाग अधिक होता. तरी शशांक अधिकच गोंधळला. पण इतक्यांत प्रकाशनें त्याच्या खांद्यावर हात टाकिला. आणि हळूहळू ते दोघे मित्र बंगल्यांत शिरले.

प्रकाशला पाहिल्यानंतर विमोहित होणार नाहीं असा माणूस विरळा ! त्याची व्यक्तिमत्ता इतकी प्रभावशाली होती. तो उंच, सडपातळ होता. त्याच्या काळ्याभोर केसांवर तपकिरी सोनेरी अशी लकाकी मोठी मनोहर दिसे. त्याचा चेहरा लालसर गोरा होता. थोडे तपकिरी वर्णाचे त्याचे विशाळ डोळे अत्यंत तेजस्वी दिसत. त्याचें नाक थोडें आंखुड पण मोहक होतें. त्याचें हास्य अत्यंत मनमोकळें व आकर्षक वाटे. त्यानें नखशिखांत खादी परिधान केली होती. चाकलेट रंगाच्या कोटावर शर्टची कॉलर बेफिकीरपणें मोकळी सोडण्याची त्याची पद्धत असे. त्यामुळें त्याचें मुखमंडळ अधिकच सुंदर दिसे. ज्या सौंदर्याचा उगम उदात्त मानसिक शक्तींपासून होतो असें प्रकाशचें सौंदर्य होतें. असें सौंदर्य कोणाच्याहि मनाची तात्काळ पकड घेतें, पण त्याचें पृथक्करण करणें कठीण असतें. प्रकाशच्या मनाचा ताजेपणा अवर्णनीय होता. त्यानें सत्याग्रहाच्या चळवळींत अविश्रांत श्रम केल्याचें अथवा दोन तीन वेळां दीर्घ मुदतीचा कारावास भोगल्याचें वृत्त त्याच्या फुलासारख्या टवटवीत मुखावरून कळणें शक्य नव्हतें. अशा सौंदर्याचा आविष्कार ज्या शक्तींपासून होतो त्याच शक्ति त्याचें रक्षणहि करीत असतात. प्रकाशच्या मूक चेहऱ्यावर जे भाव दिसत, तेच बोलण्यांत व्यक्त होत आणि त्याच्या हालचालींतहि त्यांचेंच प्रतिबंब दिसे.

शशांक आणि प्रकाश शशांकच्या खोलींत आले. खोलींत शिरतांच समोर आरशाचें कपाट होतें. त्यांत या दोघां मित्रांचीं प्रतिबिंबें दिसलीं. प्रकाश उंच असल्यामुळें आरशांत चेहरा पाहण्याकरितां तो किंचित् वाकला. त्यानें आपल्या तलम केसावरून हात फिरविला. शशांक हें सर्व उल्हसित होऊन पहात होता.

बसल्यानंतर शशांकनें प्रश्न केला "तूं इतके दिवस मुंबईला काय करीत होतास ?"

"अरे आमची पार्टी नवीनच आहे. तेव्हां नियम ठरविणें, कार्यकारी मंडळ निवडणें, आणखी अशींच कित्येक कामें चाललीं होतीं."

"त्यासंबंधीं इंग्रजी वर्तमानपत्रांतून आलेले सर्व रिपोर्ट मी काळजीपूर्वक वाचत होतों. कारण ती बैठक संपण्यावर तुझं इकडे येणं अवलंबून होतं; तेव्हां त्या बैठकीचं भरतवाक्य ऐकायला मी किती उत्सुक असेन हें तुला सांगायला पाहिजे असं नाहीं."

"वा–मला का तें ठाऊक नाहीं. पण शशांक, कार्य ही सर्वांत महत्त्वाची गोष्ट आहेना ? निदान मी ती किती मानतों हें तुला ठाऊक आहे. आमची बैठक संपल्यानंतर इतर कित्येक मजूरसंस्थांच्या अंतरंगांतून मी जाऊन आलों. तात्त्विक मतभेद आणि वृत्तींतली भिन्नता यामुळं मजूर चळवळींत कितीतरी तट पडले आहेत. त्यांतच वरच्या वर्गांतून उत्पन्न झालेले सुसंस्कृत पुढारी आणि मजूरवर्गांतून पुढे आलेले अशिक्षित पुढारी यांची लढत चाललेली. एकंदरीनं मार्क्सलेनिनच्या पुस्तकावरील दहा भाष्यं वाचून होणार नाहीं एवढं ज्ञान मला मुंबईच्या मजूरवस्तींत ८ दिवस फिरण्यानें झालें."

" तुझ्याबद्दलच्या माझ्या प्रेमाला आतां अधुपणाचं स्वरूप येत चाललं आहे. तुझ्या अंगच्या ज्या गुणांवर मी लुब्ध आहें त्याच नेमक्या गुणांनीं तुझा सहवास दिवसेंदिवस दुर्मिळ होत चालला आहे. चित्रकला आणि काव्य हे पूर्वी माझे महत्वाकांक्षेचे विषय होते; परंतु आतां तुझ्या विरहाचें दुःख विसरण्याचं एक साधन एवढाच त्यांचा उपयोग मला राहिला आहे. "

शशांकच्या बोलण्यांत कारुण्याची छटा अधिकाधिक येऊं लागली. तेव्हां वातावरण अगदीं बदलून टाकण्याकरितां प्रकाश म्हणाला—

" बरें, तें राहूं दे. आजच्या तुझ्या चित्राची कल्पना तरी काय आहे ? "

" त्या चित्राला ' दुपारची विश्रांति ' हें नांव द्यायचं मीं ठरविलं आहे. मला वाटतं यावरून काय तो बोध होईल. अखिल-भारतीय-चित्रकलाप्रदर्शनांत पाठवीन असें म्हणतों. "

पण इतक्यांत चहाची घंटा झाली आणि ते दोघे मित्र खालीं चहापानाच्या दालनांत आले.

शशांकची आई रमाबाई या चहाची तयारी करीत होत्या. इतक्यांत शशांकचे वडील महिपतरावहि आले.

महिपतरावांना 'आबा' म्हणत. आबांना पन्नासीची झुळूक लागलेली होती. तरी एकंदर जीवन फारसें दगदगींत न गेल्यानें आणि मूळचीच प्रकृति चांगली असल्यानें ते वयाच्या मानानें बरेच लहान दिसत. त्यांचें थोराड नाक, भरघोस मिशा, अधिकारी डोळे, आणि उंचापुरा बांधा यामुळें त्यांच्याबद्दल प्रथमदर्शनींच आदर व दबदबा वाटूं लागे.

शशांक व प्रकाश दालनांत येतांच आबा व रमाबाई यांच्या तोंडून एकदमच उद्गार निघाला, "अरे, वा, प्रकाश, तूं केव्हां आलास ?" त्यावर प्रकाशनें 'आजच' असें उत्तर दिलें.

आबा एक नमुनेदार महाराष्ट्रीय होते. शिक्षणसंस्थेंतली आपली नोकरी संभाळून ते समाजकारण करीत. वाङ्मय आणि समाजशास्त्र याविषयींचें त्यांचें परिशीलन खोल होतें. रानडे व टिळक यांच्या कर्तृत्वानें निर्माण झालेल्या वातावरणांचे दृढ संस्कार त्यांच्या मनावर झालेले होते. परंतु टिळकांची समाजसुधारणेविषयीं अनासक्ति आणि रानड्यांचा प्रार्थनासमाजावरील लोभ ह्या गोष्टी आबांना नापसंत वाटत.

पोटजातींचें एकीकरण, सवर्णांत पुनर्विवाह, सार्वजनिक ठिकाणीं अस्पृश्यतानिवारण, आणि वन्य जातींची सुधारणा या चार सरहद्दींनीं त्यांच्या सुधारणावादाचें क्षेत्र मर्यादित होतें.

तथापि ब्राह्मण वर्गाविषयींचा जाज्वल्य अभिमान हाच त्यांच्या सर्व तत्त्वज्ञानाचा आधार असे. अलीकडील समाजवादी मंडळीबद्दल त्यांना सहानुभूति वाटे। ते कळवळून म्हणत, "चांगलीं कर्तबगार मुलें पण अगदीं वायां चाललीं आहेत हो।" दंगाधोपा न करतां प्रतिपादकाच्या शुद्ध भूमिकेवर उभे राहून समाजांत स्थित्यंतर घडवून आणावें असें आबा म्हणत. अर्थात् प्रकाशसारख्या तेजस्वी क्रांतिवादी माणसांचे व आबांचे नेहमींच खटके उडावयाचे.

तसाच उडण्याची आज वेळ आली होती.

## छाया–प्रकाश

" काय प्रकाश, झाली का तुझ्या पार्टीची सभा ? " आबांनीं विचारलें.

" हो आबा, पण आतांपर्यंत प्रास्ताविक काम तेवढं झालं आहे. आतां त्याला निश्चितपणा देण्याकरितां नागपुरास सभा भरणार आहे. तेव्हां पुढील महिन्यांत मी तिकडे जाईन म्हणतों."

" बघ, मी तुमच्याबद्दल म्हणतों तें हेंच. कार्यापेक्षां त्याचा गाजावाजाच जास्ती. एका बैठकींत ठरविलं असतं तर."

" पण आबा, कोणत्याहि नव्या तत्त्वज्ञानाचा गाजावाजा झाला तर कांहीं वाईट नाहीं. तेवढीच जनता तिकडे अधिक ओढली जाते."

" ही तुमच्या गांधींची रीत. पण आतां लोक त्या गोष्टीला विटले आहेत. आणि पहिल्या प्रथम गाजावाजा झालेल्या गोष्टी वर्षा दोन वर्षांच्या आंत राम म्हणतात हें कळून चुकलं आहे."

" पण आमच्या पक्षाचं कार्य हें कोणत्याहि व्यक्तीनं काढलेलं तत्त्वज्ञान नाहीं. बहुजनसमाजाच्या हलाखींत त्याचा जन्म झाला आहे आणि ती हलाखी दूर करणें हें त्याचें ध्येय आहे; तेव्हां आम्ही थंडावलों तरी आमचं कार्य करण्यासाठीं जनतें- तून अनेक मंडळी खात्रीनें येतील."

" अरे, सर्व असंच म्हणतात. तुमचा गांधी मंदिरप्रवेशाचे वेळीं असं का म्हणत होता हें माझं कार्य आहे ? पर्वती सत्याग्रहाचे वेळीं तुम्ही जनहिताच्या दृष्टीनंच दंगल माजविलीत ना ? पण ती दंगल अपेशी ठरली. त्यावेळचा तो काका आतां गेला असेंब्लित–गांधी झाला सेवानिवृत्त, आणि तूं आतां मंदिराचीं इस्पितळं करण्याची भाषा बोलतो आहेस ? "

" आबा, तुम्ही सर्व गोष्टींचा विपर्यास करीत आहांत. काका किंवा गांधीजी यां- बद्दल मी काय सांगूं ? परंतु माझ्याबद्दल म्हणाल तर तेव्हांहि समता प्रस्थापित करण्याकरितांच मीं मंदिरसत्याग्रहांत भाग घेतला आणि आतां समतेविषयींची नवी दृष्टी प्राप्त झाल्यानेंच मंदिरप्रवेशाची चळवळ मला टाकावू वाटते आहे. आर्थिक समता प्रस्थापित झाल्यावांचून श्रीमंत-गरीब, उच्च-नीच हे भेद जाणार नाहींत असं मला पूर्ण पटलं आहे."

"हें पहा, मंदिरप्रवेशाच्या चळवळीप्रमाणें याहि बाबतींतला तुझ्या मताचा फोलपणा तुला लौकरच कळून येईल." आबा जरा ठांसून म्हणाले.

यावर प्रकाश अगदीं तुटकपणें कांहींतरी बोलणार होता, परंतु वत्सल रमाबाईंना हें प्रकरण अखेर चिरडीस जाईल अशी भीति वाटूं लागली. त्या किंचित् हसून आबा व प्रकाश यांच्याकडे पहात म्हणाल्या,

"हें पहा—प्रकाश कांहीं कुठं पळून जात नाहीं. मग सावकाश वादविवाद करावा. चहा निवून चालला. नि इतका चांगला झालेला शिरा त्याची निवाल्यावर कांहीं गोडी राहणार नाहीं."

आबा आणि प्रकाश चहा घेऊं लागले.

शशांकहि चहा घेतां घेतां थबकला होता. प्रकाश कांहीं बोलूं लागला, विशेषतः आपल्या पक्षाचें अथवा तत्त्वज्ञानाचें समर्थन करूं लागला म्हणजे त्याचा चेहरा अगदीं सायंतनींच्या सूर्यासारखा आरक्त होई; आणि त्याच्या चेहऱ्यावर विलक्षण जादू पसरलेली दिसे. अशावेळीं शशांक मुग्ध होऊन त्याकडे पाहत राही. त्याच्यासारख्या सौंदर्यजीवी कलावंताला दिव्य सौंदर्य आणि तेंहि आपल्या उत्कटतेच्या वरच्या पातळीवर चढलेलें पाहण्याचा योग सुखकारकच वाटावयाचा. शशांक-प्रकाशचा मित्र किशोर चेष्टेनें पुष्कळदां म्हणे देखील—'प्रकाश आवेशानें बोलूं लागला म्हणजे शशांक इतक्या तल्लीनतेनें व प्रेमभरानें त्याच्याकडे पाहतो कीं, अथेल्लो आपले पराक्रम सासऱ्यापुढें सांगत असतां डेस्डिमोना त्याच्याकडे पहात आहे, असें शेक्सपियरच्या नाट्यसंग्रहांतील एक सुंदर चित्र मला आठवतें.'

मंडळीचें चहापान संपलें. शशांक व प्रकाश वर आले, तों साडेतीनचा ठोका पडला.

शशांक एकदम उठला, "अरे, आज छायाताई चारच्या लोकलनें लोणावळ्याहून येणार आहे. स्टेशनवर गेलें पाहिजे. सुलभाहि गांवांतून येणार आहे परस्पर."

प्रकाश म्हणाला, "खरंच, सुलभा दिसली नाहीं. पण बोलण्याच्या नादांत ती कुठं गेली हें विचारायचं विसरलोंच. काय रे, ही छायाताई कोण?"

"माझी मामेबहिण. आमचे मामा बरेच दिवस तिकडे लाहोरला होते. नुकतेच पेन्शन घेऊन मुंबईमध्यें दादरला स्थायिक झाले आहेत. छायाताई यंदाच इंटर झाली. ती विल्सन कॉलेजांत असते. सध्यां सर्व मंडळी लोणावळयास आहेत, मुंब-

ईला जाण्यापूर्वी छायाताई इथं येणार आहे दोन दिवस राह्यला. तूं येतोस माझ्या-बरोबर स्टेशनवर."

प्रकाश दिलगिरी व्यक्त करीत म्हणाला, "नको रे, आज रात्रीं शहरांतल्या हॉटेलांमधील नोकरांचं युनियन स्थापण्याकरितां एक सभा बोलविण्याचं ठरलं आहे. तेव्हां त्या व्यवस्थेला मला लागलं पाहिजे. बरं, येऊं !"

प्रकाशनें शशांकच्या पाठीवर हात ठेवून म्हटलें,

"पुनः केव्हां भेटशील ?"

"उद्यां."

"निश्चित ना ?"

"अगदीं."

प्रकाश झरझर पायऱ्या उतरून गेला व सायकलवर चढला. बंगल्याच्या खिडकींतून शशांक त्याच्याकडे पहात होता. नेब्युलापासून तुटलेला एकादा तेजोगोल जसा भयंकर वेगानें जातो तसा प्रकाश शशांकला भासत होता.

## .२. छाया आणि सुलभा

" छायाताई ! "

" सुलभा ! "

" शशांक नाहीं आला ? "

" आलाय् तर, तो तिकडे तुला शोधीत असेल. "

लोकल पुण्याच्या स्टेशनांत थांबतांच सुलभा उभी होती तिच्या समोरच्याच डब्यांत छाया तिला दिसली. शशांक दुसरीकडे डबे पाहत होता इतक्यांत दोघी बहिणी त्याला दिसल्या. त्यानें लगेच एक हमाल बोलावून छायाचें सामान त्याच्या हातीं दिलें आणि नंतर स्टेशनबाहेर उभ्या असलेल्या व्हिक्टोरियाकडे दोघींना तो घेऊन आला.

व्हिक्टोरिया डेक्कन जिमखान्याच्या मार्गाला लागली.

छाया आणि सुलभा मोठ्या सीटवर बसल्या होत्या. शशांक त्यांच्या पुढील लहान सीटवर बसला होता.

छायाचें वय वीस वर्षांच्या जवळपास असेल. ती उंच, सशक्त, प्रमाणबद्ध व मोहक होती. ती गोरी तर नव्हतीच, परंतु तिच्या त्या स्निग्ध व चकचकीत श्यामल वर्णापुढें गौरवर्णहि फिका पडला असता. तिचे डोळे निर्भय व प्रेमळ दिसत. सरोवराच्या कांठांवर थोड्या अंतरापर्यंत ओलावा पसरावा त्याप्रमाणें तिच्या डोळ्यांच्या सभोंवार तांबुस व काळसर अशी छाया दिसे. त्यामुळें ते विशाळ डोळे अधिकच उठून दिसत ! नाक सरळ असून मनांतील भावना शब्दांत व्यक्त होण्या-

पूर्वी तें किंचित् स्फुरण पावत असे. जिवणी थोडी मोठीच पण अतिशय लडिवाळ होती. तिचा केशकलाप मोठा होता आणि सकाळीं केलेली केशरचना आतांपर्यंत ढिली झाल्यानें तो आतां तर विशेषच मोठा दिसत होता. एका बाजूला बसविलेलें टपोर गुलाबाचें फूल आतां कानापर्यंत सरकलें होतें आणि त्याची तांबुस प्रभा तिच्या कानांतील हिऱ्यांच्या कुड्यामध्यें प्रतिबिंबित झाली होती. गळ्यांत एक पाणीदार मोत्यांची माळ V कटच्या निळ्या ब्लाउजनें आच्छादिलेल्या तिच्या उन्नत वक्षस्थळावर रुळत होती. तिच्या पातळावर इंद्रधनुष्यासारखे परंतु संख्येनें मात्र २–३च असे मजेदार सौम्य रंगांचे पट्टे होते. ती गोल नेसली होती. आणि मधून मधून अर्ध्याच डोक्यावर पदर घेत होती. अर्थात् त्या रंगीबेरंगी महिरपीनें तिचा चेहरा कांहीं वेगळ्याच तऱ्हेचा आणि अधिक सुन्दर दिसूं लागे. तिची वेषभूषा, तिची शब्दपद्धति, तिची हालचाल ही अशी होती कीं तिला एकटीलाच ती शोभून दिसावी.

छायेचें व्यक्तित्व इतकें असामान्य होतें.

—आणि तिच्या शेजारीं बसलेल्या सुलभामुळें तर तें विशेषच दिसून येई. कारण सुलभा म्हणजे ठराविक सौंदर्यविशेषांची एक मूर्त होती. लहान बांधा, उज्ज्वल गौरवर्ण, रेखीव नाकडोळे इ० सर्व कांहीं तिच्या ठिकाणीं होतें. ती अतिशय नाजुक होती; पण हा ठरीवपणा वगळल्यास सुलभाच्या कांहीं गोष्टी मात्र निःसंशय वेगळ्या व मोहक होत्या. तिचे डोळे आर्त व किंचित् झोपाळू दिसत; केसांवर सोनेरी झांक असल्यामुळें काळ्या ढगावर संध्याकाळच्या सूर्याचीं किरणें पडावीं तसा रम्य देखावा दिसे. क्रोध, आनंद, कारुण्य इत्यादि भावना तिच्या चेहऱ्यावर अगदीं तत्काळ प्रगट होत. ती अत्यंत चित्ताकर्षक होती. परंतु प्रेमिकाचें मन उत्साहित करण्याऐवजीं खिन्नच करणाऱ्या स्त्रियांच्या जातीपैकीं ती होती.

सुलभाच्या हिरव्या पातळावर तांबड्या जांभळ्या फुलांचा भरगच्च गालिचा काढलेला होता. त्यामुळें गर्द उपवनांतून एकादी परीच बाहेर डोकावून पहात आहे असें वाटे. मानेवर माळेसारख्या रुळणाऱ्या गजऱ्याच्या अर्धचंद्रांतून वेणीचा शेपटा पाठीवर रुळत होता. शेपट्याच्या शेवटीं जोडलेली रंगीत फीत त्या चित्रविचित्र पातळावर एकादें

फुलपाखरूं .बसल्याप्रमाणें दिसे. सुलभाच्या कानांतील मोत्याच्या झालरीचे डूल सदैव चंचल असावयाचे. तिच्या नाकांतील चमकी म्हणजे त्या मनोज्ञ मुखमंडलाचा तेजस्वी मध्यबिंदूच होता असें वाटे ! ब्लाऊजच्या बाह्यांचे सुंदर काठ तिच्या कोवळ्या गौरवर्ण दंडांना वेगळीच शोभा देत. नाजुक बिल्वराशेजारींच काळ्या-भोर पट्टयाचें लहानसें रिस्ट-वॉच तिनें बांधलें होतें. आपल्या नैसर्गिक रूपसंपदेला कमालीचा मादकपणा आणण्यां तसुलभाची बरोबरी करणारी तिच्या परिचित जगांत कोणीच नव्हती.

गाडींत भावंडांचीं बोलणीं सुरू होतीं.

"काय छायाताई, लोणावळ्याचा मुक्काम बहारीचा गेला असेल, नाहीं ?"

"तर रे ! तुझ्यासारखी मी चित्रकार किंवा कवि नाहीं म्हणून बरं. नाहींतर दादरला न जातां लोणावळ्यालाच कायमचा मुक्काम ठोकला असता. अन् तुला किती सांगितलं कीं दोन दिवसांच्या सवडीनं सुलभाला घेऊन ये. पण तूं कांहीं दाद दिली नाहींस."

"त्याचं असं झालं—"

"तुझ्या आधीं मींच सांगतें काय झालं असेल तें. या दिवसांत व्याख्यानमाला, वक्तृत्त्वसभा, उत्सव, समारंभ यांची गर्दी असायची तुमच्या पुण्यांत; त्यांतून विवाहाच्या या संपन्न बाजारपेठेंत सध्याच्या हंगामासाठीं अनेक वधूपिते तळ देऊन बसलेले; पुनः कुणाचीं पंन्नास वर्षे भरलीं, कुणाला एकसष्टावें वर्ष लागलें यासाठीं होणारे नित्याचे समारंभ आहेतच. आणि या सर्वांसाठीं नि थंडहवेचें निमित्त म्हणून बडोदें-नागपुरकडील अनेक प्रतिष्ठित पाहुणे इथं आलेले असावयाचे. अशा स्थितींत आमचा प्रसिद्ध चित्रकार व कवि शशांकदादा पुणं सोडून दूर जाऊं कसा शकणार ?"

"तुझ्यापुढं कोण बोलूं धजणार आहे ? बरं, तें राहूं दे. पण तूं लोणावळ्याला काय करीत होतीस ?"

"अरे, काय करायचं ? दररोज वेगवेगळ्या दिशांनीं फिरायला जायचं. पोहायचं, झोपा काढायच्या, गप्पा मारायच्या, अन् यांतून वेळ झालाच तर जगाच्या मागें

पडूं ये म्हणून कांहीं वाचायचं. शिवाय आम्ही कार्ले, कामशेत, लोहगड इ० ठिकाणच्या सफरीहि मधून मधून करीतच होतों."

गाडी वेधशाळेच्या पुढें आली असेल. इतक्यांत एक तरुण सायकलवरून समोरून आला. त्याची दृष्टादृष्ट होतांच उन्हाची तिरीप लागून लाल व म्लान झालेली सुलभा अधिक आरक्त पण प्रफुल्लित झाली. सायकलवरील तरुणानें सुलभाला पाहतांच स्मित केलें, परंतु लगेच तिच्या शेजारींच बसलेल्या छायाकडे नजर रोखली. इतक्यांत शशांककडे त्याचें लक्ष जातांच चपापून शशांकला त्यानें हात उचलून अभिवादन केलें. आणि लष्करच्या रोखानें सायकल वळविली. सुलभा गाडींतून तोंड काढून तो दृष्टिआड होईतोंपर्यंत त्याच्याकडे पहात होती.

हा प्रकार फारच थोड्या वेळांत घडला. अर्थात् छायाला तेवढ्यामध्यें त्या तरुणाचें पूर्ण निरीक्षण करतां येणें शक्य नव्हतें. परंतु त्याची उंच शरीरयष्टी, शुभ्र विजार, पठाणी पद्धतीच्या वहाणा, मग्रूर चेहरा, शिरस्त्राणविहीन डोकें इ० गोष्टी तिच्या नजरेंतून सुटल्या नाहींत. त्याचे डोळे मोठे पण जहरी असावे आणि त्यांच्या अपांगांवर तांबूस छटा असावी असेंहि तिला अंधुकपणें वाटलें. माणूस कांहीं साधा नसावा असा (कां कोणास ठाऊक!) छायाचा ग्रह झाला. आणि सुलभाची चलबिचल झालेली पाहून तर तिच्या विचारचक्राला जोराची चालना मिळाली. तिनें लागलीच शशांकला विचारलें—

"कोण रे हा मुलगा?"

"वाः अग, हा आमच्या पुण्याचा बुखारीन्, कॉम्रेड सदानंद. नुकताच बी. ए. झाला आहे. हा शंभर नंबरी लाल कम्युनिस्ट आहे हें सांगितलें म्हणजे त्याचीं मतें कशीं आहेत, तो हिंदुस्थानातल्या वंद्य पुढाऱ्यांना कशा शिव्या देत असेल, त्याचें ध्येय कसें अनिश्चित आहे, आणि त्याचा आयुष्यक्रम किती बेहिशेबी असेल याचें वर्णन नकोच करायला."

"दादा, हें रे काय?" सुलभा मध्येंच उसळून म्हणाली, "एकाद्याची ओळख करून द्यायच्या आधींच त्याच्याविषयीं दुसऱ्याचें मत कलुषित करावयाचें! सदानंदाचीं मतें नि जीवन तुला पटत नसेल म्हणून छायाताईला तें आवडणारच नाहीं असें कशावरून? आणि नाहीं आवडलें तर व्हायचें तेव्हां होऊं दे तिचं वाईट मत त्यांच्याविषयीं. तूं कशाला ही भूमिका तयार करून ठेवितोस?"

" हें पहा सुलभा " शशांक हंसून म्हणाला, " आम्ही कलोपासक जगाकडे नेहमींच व्यक्तिनिष्ठ दृष्टीनें पाहतों. आम्हांला जें सुंदर दिसेल तेंच जगाला सुंदर दिसावं आणि आम्हांला जें विकृत दिसेल तें जगालाहि विकृतच दिसावं असा आमचा आग्रह असतो. सदानंदाची ओळख छायाताईला करून द्यावयाची म्हणजे मला त्याच्याबद्दल काय वाटतं त्याच धोरणानं मी बोलणार. पण तुला राग येणं साहाजिक आहे. तेव्हां आतां मी म्हणतों, या नाण्याची दुसरी म्हणजे चांगली बाजू जर कोणती असेल, तर तिचं वर्णन करून तूंच सांग छायाताईला. "

" अगोदर आपण तिचं मन कलुषित केलं आहे अन् आतां मलां सांगतो आहे त्याचं निराकरण करायला. मी कशाला त्यांचें गुणवर्णन करूं?" सुलभा फणकाऱ्यानें म्हणाली. शशांकला तिचा तो रागावलेला रुसका चेहरा पाहून हसूं येत होतें.

आतां हें प्रकरण हातघाईवर आलें असें पाहून छाया सुलभाच्या पाठीवर हात ठेवून म्हणाली, " सुलभा, तूं अगदीं खरोखरच लहान मूल आहेस. माझं मन त्या सदानंदाविषयीं कलुषित झालं असं तुला सांगितलं कोणीं ? शशांक चार वाक्यं बोलला तेवढ्यावरून तूं हा निष्कर्ष काढलास, काय म्हणावं तुला ? पण मी इतकी का दुबळ्या मनाची आहें कीं एका बोलण्यांत शशांकानं कोणाबद्दलहि माझं वाईट मत करून टाकावं ? मी जेव्हां सदानंदाचं वर्तन स्वतःच पाहीन, तेव्हांच काय तें मत बनवीन. बरं, काय ग, या राजकीय पंथाखेरीज सदानंदांबद्दल दुसरी माहिती तुला काय आहे ?"

छायाच्या बोलण्याचा योग्य तो परिणाम झाला. सुलभा थोडी उत्तेजित होऊन सांगूं लागली, " छायाताई, सदानंद समतावादी आहेत. "

" म्हणजे काय ग, सुलभा ? " शशांकनें मध्येंच डोळे मिचकावून विचारिलें.

" गप्प शशांक. तूं मध्यें बोलूं नकोस. सुलभा सध्यां माझ्याशीं बोलते आहे. " छायानें शशांकला दटाविलें. सुलभेनें रागानें एकवार भावाकडे पाहून, आपलें बोलणें चालू केलें—

" त्यांना सध्यांच्या जगांतली कोणतीच गोष्ट पसंत नाहीं. कला, वाङ्मय या गोष्टीकडे ते अगदीं नव्या दृष्टीनं पाहतात. मुंबईच्या 'कला' नांवाच्या साप्ताहिकांत त्यांचे कलेवर नि नवमतवादावर लेख येतात, ते बघ एकदां वाचून म्हणजे त्यांचीं

सर्व मतं तुला कळतील. ते सध्यां एका फिल्मचा सिनेरियो लिहीत असून पुढंमागं एकाद्या सिनेटोनचे डायरेक्टर देखील होण्याची संधि त्यांना मिळेल असं म्हणतात. ते उत्तम वक्ते आहेत. इंग्रजी तर कित्ती छान बोलतात. परवां 'उत्तर ध्रुवावरील भांडवलशाहीचें कारस्थान' या विषयावर त्यांचं इथं कॉलेजांत व्याख्यान झालं. तेव्हां प्रोफेसर त्यांच्या ज्ञानावर अगदीं खूष झाले. अन् अध्यक्ष म्हणाले देखील कीं, महाराष्ट्रांतल्या लोकांना इंग्रजी बोलतां येत नाहीं, या टीकेला सदानंदासारखे वक्ते हेंच चोख उत्तर आहे."

"वाः वाः छान मोठा हुशार नि धडाडीचा दिसतोय् माणूस." छाया उद्गारली.

या उद्गारांनीं साहजिक सुलभा आनंदित झालेली दिसली.

शशांक कांहींतरी बोलण्याच्या बेतांत होता. पण शांत झालेलें वातावरण पुनः प्रक्षुब्ध होईल म्हणून त्यानें तो मोह आवरला. शिवाय गाडी अगदीं 'शांतिनिकेतन' जवळ आल्यामुळें आतां बोलणें आवरतें घेणें बरें असें त्याला वाटलें.

आबा आणि रमाबाई छायाची वाटच पहात होत्या. छाया गाडींतून उतरलेली पाहतांच त्यांना आनंद झाला.

"या छायाताई," दोघेंहि म्हणालीं.

छाया झपझप आंत आली आणि तिनें दोघांनाहि नमस्कार केला.

"हं, आतां काय आशिर्वाद देऊं?" आबांनीं चेष्टेनें छायेला विचारलें.

"काय द्यायचा असेल तो मोठ्यानें बोलूं नका. मनांतल्या मनांत द्या. म्हणतात ना कीं मनांत म्हटलेल्या मंत्राचं सामर्थ्य उच्चार केलेल्या मंत्रापेक्षां जास्त असतं!" छायेनें हंसत उत्तर दिलें.

छायेच्या या उत्तराचें आबांना कौतुक वाटलें. आपल्या चेष्टेच्या प्रश्नानें ती लाजेल किंवा गोंधळेल असा त्यांचा अंदाज होता तो सपशेल चुकला. तिनें मोठ्या खुबीनें त्यांचा प्रश्न परतवून लावला.

"बरं, मामा–मामी बरीं आहेत? आणि......"

आबांना मध्यें कोणीं थांबविलें नसतें तर ते बंगल्याच्या फाटकांत आणखी तासभर तरी छायाशीं बोलत उभे राहिले असते. मनुष्य एकाद्या व्यसनाच्या

आहारीं जावा तसें त्यांचें बोलण्याच्या बाबतींत होई. पण रमाबाई वेळोवेळीं त्यांच्या भाषणचक्राला ब्रेक लावून पुष्कळसा कालापव्यय वांचवीत. एवढेंच नव्हे तर औचित्याचा विवेकहि आबांकडून पाळला जाईल याची खबरदारी घेत.

—आणि आतां त्यांनीं तसेंच केलें.

"आतां सारी माहिती मग विचारावी छायाला. प्रवासाहून ती आलेली. तिला अमळ तोंड धुवून कपडे बदलूं देत, चहा घेऊं देत, नंतर काय तें."

"ठीक. ठीक." आबा आपल्या खोलींत निघून गेले.

छायाचें सर्व सामान गड्यानें आणून वरच्या मजल्यावर नेलें. सुलभाच्या खोली-शेजारींच तिची व्यवस्था करण्यांत आली. ती सुलभाबरोबर वर निघून गेली.

इकडे शशांकनें आईला विचारलें, "आई, माझ्याकडे कोणी आलं होतं?"

"हो, ती आपली मागली मोलकरीण शेवंती आली होती."

"शेवंती? ती कां आली होती?"

"काय कीं. म्हणाली माझं कांहीं काम आहे दादांशीं. उद्यां सकाळीं नऊच्या सुमारास येणार आहे."

"होय का?"

शशांक विचार करूं लागला. शेवंतीचें आपल्याकडे काय काम असेल हें त्याला कळेना.

"हो, आणखीन् किशोर येऊन गेला."

"किशोर का! वाः!"

शशांकनें हे शब्द उच्चारायला आणि सुलभा वरून खालीं यायला एकच गांठ पडली. किशोरचें नांव ऐकतांच ती जरा स्तिमित झाली; परंतु लागलीच निर्विकार चेहरा करून ती अंतर्गृहांत निघून गेली. चेहऱ्यावर उमटूं पाहणारे भाव आवरण्याचा तिचा प्रयत्न शशांक व रमाबाई यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नाहीं.

इतक्यांत छायाहि वरून आली; तिला घेऊन रमाबाई आंत गेल्या.

शशांक विचारमग्न स्थितींत आपल्या खोलीकडे वळला.

शेवंतीचें आपल्याकडे काय काम असेल याविषयीं त्याचा कांहींच तर्क चालेना.

---

## .३. नवी सृष्टि

आपल्या भावजीवनांत रम्य स्थित्यंतर घडवून आणणारा दिवस केव्हां उगवेल हें कधीं अगोदर कळतें का? तें तसें कळतें तर तें स्थित्यंतर होण्यापूर्वी ज्या अज्ञात पण सुखकारक संवेदनांनीं मनाला मुग्ध केलेलें असतें त्यांची नोंद ठेवणें सुलभ झालें असतें. अफाट समुद्रांत तारू हांकारीत बरेच दिवस जावें आणि अखेर एके दिवशीं समोरून गोजिरवाणीं पांखरें येऊन जहाजांवर बसावीं व त्यांची गोड किलबिल सुरू व्हावी तशी या मधुर संवेदनांची चाहूल आपणांला वाटते. जीवनांत क्रांति करावयास येणाऱ्या नव्या सृष्टीची वर्दी या संवेदना देत असतात.

अशाच अज्ञात पण अनुपम भावजालांत छाया सांपडली होती. तिला अगदीं पहाटे जाग आली. जागी होतांच ती प्रथम खिडकीपाशीं जाऊन उजळत चाललेली सृष्टिशोभा न्याहाळूं लागली. दूरच्या राखी रंगाच्या टेकड्या, तांबुस आकाश, फिका होऊन डोंगरावर उतरलेला चंद्र, हिरवी वनश्री असा देखावा पाहून तिला अधिकच उल्हास वाटूं लागला. या देखाव्यामुळेंच आपल्या मनाला आनंदाचे हेलकावे बसत असावे असें तिला प्रथम वाटलें. पण क्षणार्धातच आपली चूक तिला कळून आली. हा देखावा झोपेंत आपणांला कोठें दिसत होता? आपण झोपेंतून उठलों त्याच वेळीं नाहीं का आपणांला आनंदानें पुलकित झाल्यासारखें वाटलें? आणि देखाव्याचाच परिणाम म्हणावयाचा तर लोणावळ्याची वनश्री याहूनहि किती भव्य आणि आकर्षक होती! त्या ठिकाणीं हा अनुभव नाहीं आला कोठें!

दुःखाप्रमाणेंच अज्ञात सुखभावनेनेंहि मनुष्य अस्वस्थ होतो. छायेचें तसेंच झालें. ती झटकन् सुलभाकडे गेली. सुलभा अर्धवट झोपेंत होती. यावेळीं कृत्रिम

विचार व भावना यांचा गोंधळ तिच्या सुकुमार मुखावर चाललेला नसल्यामुळें तिचें सौंदर्य पूर्णपणें खुललें होतें आणि त्यावर प्रेमळता व भाबडेपणा यांचा सुंदर भाव चमकत होता. छायेनें तिच्याकडे क्षणभर पाहिलें आणि तिच्या कॉटवर जरा टेकून व तिच्या केसांवरून हात फिरवीत म्हटलें, "सुलभा, फिरायला येतेस?"

सुलभा अर्धवटच जागी झाली आणि छायाच्याच गुडघ्याला मिठी मारून तिनें डोळे मिटून घेतले.

"सुलभा, बाळा, मी तुला निजवायला नाहीं आलें, म्हटलं फिरायला येतेस का टेकडीवर."

मग सुलभा जागी झाली. केस सावरून व पोषाक नीटनेटके करून त्या दोघी फिरावयास गेल्या.

फिरतांना छायाचा उल्हास अधिकच वाढला. मध्यें सुलभाच्या ओळखीच्या कोणी मैत्रिणी भेटत. सुलभा चटकन् थांबून आपल्या छायाताईची त्यांच्याशीं ओळख करून देई. छायावर सुलभा पराकाष्ठेची संतुष्ट होती. सुलभाच्या ज्या दुर्बलतेमुळें तिच्या चांगल्या गुणांचें तेज कमी झालें होतें ती दुर्बलता छायांत मुळींच नव्हती. सुलभाच्या अजाणतेपणें असलेल्या छायावरील प्रेमाला हीच गोष्ट कारण होती. खेरीज सुलभाला अगदीं लहान मुलासारखें वागवून छाया नेहमीं तिचें कौतुक करी, तिच्यांतल्या चांगल्या गुणांना प्रकट होण्यास संधि देई. या सर्व गोष्टींमुळें सुलभाला छायाताई म्हणजे दैवत वाटल्यास नवल नाहीं.

सुलभा मधून मधून छायाला माहिती देत होती. जोड्यावर पायमोजे घालणारा तो पेन्शनर आयुष्यवर्धनाकरितां प्रत्येक टेकडीवर कसे वेगवेगळे व्यायाम करतो, तो एक नटवर्य टेकडीवर येतांच शर्ट काढून कसा उघडा होतो, ती नटी टेकडीवरून उतरतांना आपल्या कुत्र्याशीं कशी खेळते इ. कितीतरी गमती छायाला ती सांगत होती. आणि छायाहि त्या कौतुकानें ऐकत होती.

ऊन व्हायच्या आंत त्या 'शांतिनिकेतन' कडे परत फिरल्या. चहापाणी झाल्यानंतर छायानें स्नान केलें. तिनें आरशांत पाहिलें त्यावेळीं तिचें रूप तिला फारच आकर्षक दिसूं लागलें. रात्रींची गाढ झोप, पहाटेचें फिरणें, स्नान, उत्कृष्ट वेषभूषा या सर्वांचाच तिच्या कांतिमान् रूपावर परिणाम झाला होता. परंतु त्याहूनहि एका अननुभूत आनंदानें तिच्या कांतीला शतगुणित केलें होतें.

एवढ्या वेळांत सुलभाहि आपलें सर्व आवरून व पोशाक करून आली. नंतर दोघीजणी शशांकच्या खोलींत रेडियो ऐकण्यास गेल्या.

आकाश सर्वच निरभ्र होतें; त्यामुळें नादलहरी स्पष्ट व सुरेल उमटत. गायक एक नामांकित मुसलमान गवई होता. चीज मराठी असली तरी एकदोन शब्द सोडल्यास खांसाहेबांचे बाकी सर्व उच्चार शुद्ध व स्पष्ट होत. गाण्याचा ढंग मजेदार होता. आलाप, फिरत, मेंढ यांत खांसाहेब कमालीचें कौशल्य दाखवीत.

चीज देसकार रागांतली होती.

ये प्रकाश अंतरांत
जीवविहग गान गात
ही अपूर्व सुप्रभात
कोणत्या दिनाची.

आरोहाची करामत दाखवितांना खांसाहेब तानांचें एवढें वादळ उडवीत कीं आतां त्यांतून ते समेवर कसे येतात याची काळजी वाटे. पण शेक्सपिअरच्या जादूगाराप्रमाणें नादसागरावर वादळें उठवून तीं शांतहि करण्याची कला खांसाहेबांचे अंगीं होती. त्या शांतगंभीर आलापांनीं असें उत्कट वातावरण निर्माण केलें होतें कीं त्यांत शब्दार्थाचें भान कोणालाहि उरलें नव्हतें.

छायाची तर समाधिच लागली होती. तिचा स्वतःचा आवाज अत्यंत सुरेल आणि ती शास्त्रीय संगीतांत प्रवीण होती. लहानपणीं लाहोरला आणि नंतर मुंबईस तिनें गांधर्व महाविद्यालयांत शास्त्रीय पद्धतीनें गायनाचें शिक्षण घेतलें होतें. तिच्या अंगच्या ज्या गुणसंभारामुळें तिची सर्वत्र चहा केली जाई, त्यांत गानकौशल्य हा प्रमुख गुण होता. कालच रात्रीं जेवतांना आबा म्हणाले कीं, " या वसंतऋतूंत आपणांला खरें कोकिलकूजन ऐकायला मिळणार."

पण आज छायेला गाण्याचा जो आनंद होत होता तो त्यांतील करामतीमुळें कीं मनाच्या एका उत्कट अवस्थेमुळें हें तिचें तिलाच कळेना. चीजेंतील शब्दांनीं तर ती अधिकच वेडावली.—

इतक्यांत एक व्यक्ति तेथें आल्यानें त्याच्या वाढत्या उल्हासाला कुतूहलानें कांहींसा बांधा घातला.

" कोण, शेवंती ? "

" होय. दादा, काल येऊन गेलें मी. "

" हो; तें कळलं मला. पण तुझं काम मात्र काय असावं कांहींच कळेना. "

" काम फार महत्त्वाचं आहे "

शेवंती अडखळूं लागली. तिनें एकदां छायाकडे ओझरती नजर टाकली. यावेळीं छाया एका मोठ्या आरामखुर्चीवर बसली होती आणि खुर्चीच्या एका हातावर सुलभा बसली होती. तिनें आपले हात छायाच्या खांद्यावरून खालीं सोडले होते. छाया मधून मधून ते आपल्या हातांत घेऊन किंचित् डोलूं लागे.

शेवंती कां संकोच करीत आहे हें शशांकच्या तेव्हांच लक्षांत आलें. तो लगेच तिला म्हणाला,

" शेवंती, तूं मुळींच संकोच बाळगूं नको. ही छायाताई आपल्यापैकींच आहे. हं, विचार तुला काय विचारायचें असेल तें. "

शेवंती कांहींशी विचारमग्न झाली. बोलण्याला सुरुवात कशी करावी हें तिला कळेना.

शेवंतीचें वय वीस बावीस वर्षांचें असावें. कुणबाऊ पद्धतीचा तिचा वेष नीटनेटका होता. तिची कांति लिंबासारखी गोरी होती. चेहऱ्यावर शालीनता व स्वाभिमानीपणा यांचें सुंदर मिश्रण दिसे. तिच्या भुवया रजपूत चित्रांतल्या सुंदरीप्रमाणें आकर्ण होत्या. नाक किंचित् उचललेलें आणि फारच लाडिक वाटे. गालावरील मोठा तीळ आणि हनुवटीवर गोंदलेला हिरवा ठिपका तिच्या गोरेपणाला फारच शोभादायक होता. डोळ्यांत अशी आर्तता होती कीं, ती क्षणभर प्रेमभरानें पाहूं लागली म्हणजे पुरुषजीवनांत आत्मार्पण करण्यास तयार असणारें मूर्तिमंत स्त्रीत्त्वच पुढें उभें आहे असा भास व्हावा.

थोड्या वेळानें शेवंती बोलूं लागली.

" दादा, आमच्याकडली स्थिति तुम्हांला माहित आहेच. "

" हो, तुला माझ्याकडून शक्य तोंवर मदत मी करीत आहें. सध्यां तुला कांहीं अडचण आहे ? "

"तुमच्या मदतीमुळं तर मी या दिवसांत जीव धरून आहें. तुम्हींच माझे मालक म्हणून तुम्हांला कांहीं विचारायचं आहे."

"हं. विचार, विचार."

"आमच्या शेजारची ती मंजुळा ठाऊक आहेना, तुम्हांला ?"

"हो हो. तुझ्या आजारीपणांत ती आमच्याकडे येत असे कामाला."

"तीच. ती आतां त्या सिनेमांत गेलीय् काम करायला."

"होय का ? स्टार झाली ती ?"

"हो दादा, तिच्याकडे परवां कंपनींतले कुणी कामदार आले होते, मीहि तिथंच होतें तेव्हां. मी परत आल्यावर मंजुळेला त्यांनीं विचारलं ही बाई काय करते. मंजुळानं आमची सर्व स्थिति सांगितली. ते म्हणाले, ही बाई आमच्याकडे कां येत नाहीं ? तेव्हां मंजुळेनं मला विचारलं आहे. आतां तुम्ही..."

इतकें बोलतांच शेवंती अडखळली.

शशांक हें समजून उद्गारला—

"समजलों; सिनेमांत आपण जावं कीं नाहीं याबद्दल माझं मत विचारीत आहेस."

शेवंतीनें सलज्ज होऊन खालीं पाहिलें.

"त्याचं असं आहे." शशांक बोलूं लागला, "तिथें जाण्यांत मोठं गैर आहे असं मला मुळींच वाटणार नाहीं, हें तूं जाणतेसच. पण तुला तिथं जाऊन फायदा काय होणार ? मंजुळेला सध्यां काय मिळतं ?"

"तिला मिळतात पंधरा रुपये, पण मंजुळा म्हणाली...."

त्या लिंबकांतीवर कमालीची आरक्तता पसरली.

"कळलं. म्हणजे तूं सुंदर असल्यामुळं तुला तिथं भरभराटीला यायचा बराच संभव आहे. मुख्य भूमिका तुला लौकरच मिळेल. आणि तें पैशाच्या दृष्टीनं फार फायद्याचं होईल. काय असंच ना ?"

शेवंतीनें न बोलतां फक्त संमतिदर्शक मान हालविली. इतक्यांत सुलभा आनंदित होऊन मध्येंच म्हणाली, "जा ग तूं शेवंती सिनेमांत. मग आम्ही येऊं शूटिंग पाहायला."

तिच्या त्या पोरकट उद्गारांचें सर्वांनाच हसूं आलें. छायानें तर तिच्या तोंडांत एक चापटी मारली.

इतक्यांत शशांक गंभीर होऊन म्हणाला,

" शेवंती, दोन प्रश्न मोठे अवघड आहेत. एक तर त्या मोहाच्या वातावरणांत जाऊन तूं सुरक्षित राहशील का ? आणि उद्यां गंगाराम परत आल्यावर त्याला काय वाटेल ? "

" दादा, मी कुठंहि गेलें तरी धुतल्या तांदळासारखी राहीन याची मला खात्री वाटते. पण दुसरा प्रश्न अवघड आहे. आज तीन दिवस अन् तीन रात्री त्याचा विचार केला. जों जों विचार करावा तों तों मन गोंधळून जातं. दादा, तुम्हींच मला काय तें सांगा ? "

" त्याला सुटायला किती दिवस आहेत ? "

" मला वाटतं सहा महिने !" शेवंतीनें कातर स्वरांत उत्तर दिलें.

" तुरुंगांतून सुटल्यावर तो साहजिकच जगाकडे साशंक नजरेनं पाहणार. जिथं तिथं आपणांला लोक तिरस्कारीत आहेत, आपली टवाळी करीत आहेत अशा भावनेनं तो जगांत वावरणार. त्याला जर हें तुझं नवीन धाडस कळलं तर धक्काच बसेल !"

" हाच भयंकर विचार माझ्या मनांत येतो. पण पुनः वाटतं सावकारांनीं येऊन चार लोकांदेखत अब्रू घेण्यापेक्षां हा मानानं मिळविलेला पैसा काय वाईट ? एकदां कर्ज फिटलं म्हणजे मग कोण तिथं राहतंय् ? "

सर्वजण कांहीं वेळ स्तब्ध होतीं.

नंतर शशांक कांहींसा निश्चयी स्वरांत म्हणाला,

" शेवंती, तूं खुशाल जा तिथें. गंगारामाची समजूत मी घालीन. तो यायच्या आंत तुझं सर्व कर्ज फिटलं तर ठीकच झालं. प्रकाशचा एक स्नेही त्या सिनेटोन-मध्यें डायरेक्टर आहे. त्यालाहि मी तुझ्याविषयीं सांगून ठेवतों. तूं कांहीं काळजी करूं नकोस."

" दादा, माझी काळजी दूर झाली. " कृतज्ञतेनें अंतःकरण भारावल्यामुळें दुसरे कांहीं शब्द तिच्या तोंडून बाहेर पडेनात.

" आईसाहेबाकडं जातें मी. "

" बरं, बरं. "

शेवंती निघून गेली.

" मोठी सोज्ज्वल दिसते बाई ही. काय रे हिची हकीकत आहे ? "

" ही आमची मोलकरीण; हिचा नवरा गंगाराम फळें विकत असे. पुढं ही फार आजारी पडली. आजारांतून उठल्यावर रक्तक्षय झाल्यासारखें झालें. गंगाराम तिची जिवापाड शुश्रूषा करी. पण एके दिवशीं तो पकडला गेला आणि त्याला दीड वर्षांची शिक्षा झाली. "

" अरेरे !..." छाया कळवळून म्हणाली.

" तेव्हांपासून ही कोणाचीं मुलं संभाळून अन् तसंच कांहीं काम करून पोट भरते. हिचं आजारीपण आणि गंगारामाचा खटला यामुळं फार कर्ज झालं आहे. चांगली मोठ्या कुळांतली आहे बिचारी. पण हे दिवस आले ! " असें म्हणून शशांकनें एक सुस्कारा सोडला.

मध्येंच शेवंतीची ही करुण हकीकत ऐकल्यामुळें विशेषतः तिची सुंदर मूर्ति, तिची शालीनता, ही प्रत्यक्षच पाहिल्यामुळें छायाचा उल्हास मावळूं लागला. परंतु तो अजिबात नाहींसा झाला नाहीं.

थोड्या उदास झालेल्या वातावरणाला पुनः प्रफुल्ल करण्याकरितां शशांक म्हणाला,

" पुनः रेडियो सुरू करतों. खांसाहेब आतां दुसरा एखादा राग आळवीत असतील. "

असें म्हणून तो बटन फिरवूं लागणार तों जिन्यावर कोणाचीं तरी पाउलें ऐकूं आलीं. पाउलांचा आवाज दणदणीत होता.

शशांकनें बटनवरील हात काढला. तो अगदीं आतुर होऊन दाराकडे धावला—

" प्रकाश ! "

प्रकाश दारांत पोहोंचलाच होता. तो आणि शशांक दोघे आंत आले. प्रकाशनें या वेळीं हिरव्या रंगाच्या खादीचा कोट अंगांत घातला होता. तो बऱ्याच लांबून जाऊन आलेला असावा. कारण त्याचा चेहरा थोडा अधिक लाल झालेला दिसत

होता. त्यानें चेहऱ्याची सफाई अजून केली नसावी, असें दिसत होतें. पण कोणत्याहि स्थितींत तेजस्वी दिसणाऱ्या त्याच्या चेहऱ्याला ही उणीव शोभाच देत होती.

" प्रकाश, ही आमची छायाताई. हिच्याविषयीं काल तुला थोडीफार माहिती दिलीच होती; इतकी निर्भय, हुशार, कलाचतुर, आणि प्रेमळ मुलगी मिळावयाची नाहीं कुठं. "

"अगदीं खरं आहे." सुलभा शशांकला पुष्टि देण्याच्या उद्देशानें म्हणाली.

वास्तविक अशी कोणीं स्तुति केली कीं जें औपचारिक वातावरण निर्माण होतें तें नाहींसें करण्याकरितां कांहींतरी चटकदार विनोद करावयाचा, ही छायाची नेहमींची रीत असे. संभाषण नीरस किंवा कृत्रिम होऊं द्यावयाचें नाहीं ही कला छायाला अतिशय चांगली अवगत होती. परंतु तिचा तो हजरजबाबीपणा आणि विनोदवृत्ति आज पार मावळली होती. तिचा आपल्या बुद्धीवर ताबा नव्हता. प्रकाशला आपादमस्तक न्याहाळावें असें तिला वाटे. परंतु तिची नजर एवढी धीट होईना. मधून मधून छाया त्याच्याकडे पाही. परंतु एकादें उत्कृष्ट चित्र आपण दृष्टि स्थिरावून जसें घटकाभर तल्लीन होऊन पाहतों तसें तिला प्रकाशला पाहतां येईना. अननुभूत आनंदाचें कारण सांपडावें, चिंतनाच्या सृष्टींतल्या साऱ्या सुंदर कल्पना मूर्तरूप होऊन पुढें याव्या असें तिला वाटलें. म्हणूनच आयुष्यांत प्रथमच आनंदकल्लोळांनीं तिची बुद्धि गुदमरून गेली.

प्रकाश मुग्ध झाला होता, तरी छायाइतकी त्याची अवस्था झाली नव्हती. म्हणूनच औपचारिकता घालविण्याकरितां तो हसत हसत शशांकला म्हणाला,

" अरे, तूं इंग्रजी पद्धतीनें ओळख करून द्यायची चतुराई दाखविलीस खरी; पण अजून हिंदुपणा कांहीं सुटत नाहीं. माझी यांना ओळख करून द्यायची नाहीं वाटतं ! "

शशांकनें किंचित् हंसून छायाकडे पाहिलें. ती अधिकच लज्जित झाली होती. 'तुला ओळख करून द्यायलाच पाहिजे का?' असा भाव शशांकच्या चेहऱ्यांत दिसला.

इतक्यांत सुलभा म्हणाली, " कालपासून तेंच तर काम दादा करतोय्. प्रकाश कोणत्या वेळीं कसा दिसतो, तो सभेंत बोलतांना कसा आवेशांत येतो, त्याला समाज-

हिताची कशी कळकळ आहे, तो दोन महिन्यांच्या अभ्यासानं एलएल. बीं. त कसा वर आला, गांधी नेहरूनीं त्याचें कसें कौतुक केलं, या साऱ्या गोष्टी अगदीं रसभरीत करून सांगण्यांत कालपासून दादाचा सारा वेळ गेला. ”

“ वाः, शशांकला एकादी गोष्ट रंगवून कशी सांगावी हें चांगलं कळतं. रंग आणि रस हे दोन्ही भरण्यांत त्यांचा हातखंडा आहे.” प्रकाश इतकें जरी म्हणाला, तरी शशांकनें या मुलीजवळ आपलें वर्णन जिव्हाळयानें केलें याचा अंतर्यामीं झालेला आनंद त्याच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता.

“ काय, तुमचा मुक्काम किती दिवस आहे ?”

“ दोन-तीन दिवस राहीन म्हणतें आहें. ”

“ पण कदाचित् मुक्काम वाढेलहि. ” सुलभा चेष्टेनें म्हणाली.

छाया आणि प्रकाश दोघेंहि गोंधळलीं.

इतक्यांत प्रकाशला कोणी बोलवीत आहे असें सांगत गडी वर आला. प्रकाश घाईघाईनें खालीं गेला.

सुमारें पांच मिनिटें स्तब्धता होती.

प्रकाश घाईघाईनें वर आला. त्याचा चेहरा गंभीर दिसत होता. त्यानें शशांकला गॅलरींत बोलाविलें. त्याच्याशीं हलक्या आवाजांत कांहीं तो बोलत होता. बोलणें ऐकतां ऐकतां चिंता, खेद, संताप इ. विकार शशांकच्या चेहऱ्यावर उमटत होते.

बोलणें झाल्यावर प्रकाश आंत आला.

“ बरं, येतों छायाताई; मला कांहीं निकडीच्या कामाकरितां जावें लागत आहे. पुनः भेटूंच. ”

प्रकाश तांतडीनें निघून गेला. सूर्यासारखा प्रकाश शुक्रताऱ्यासारखा थोडावेळ चमकून गेला असें तिला वाटलें. समोर दिसणारे गुलाबाचे ताटवे, तारेवर बसलेलीं पांखरें किंवा कांहींहि रम्य गोष्टी आतां वेगळयाच स्वरूपांत आपणांस दिसूं लागल्या आहेत असा तिला भास होत होता.

## .४. किशोरचे विचारतरंग

शांतिनिकेतनांत स्वर्गीय संगीताचे सूर उमटत होते त्याच वेळीं भवानी-पेठेंतील एका घरांत सारीं खेडवळ व भीरू माणसें हवालदील होऊन बसलीं होतीं. घराचा मालक सावळ्या बिचारा एकमार्गी शिंपी. प्रामाणिकपणें धंदा करून काटकसरीनें प्रपंच करावा असा त्याचा जीवनक्रम चाललेला. पण आज सरकारी दूतांचें पथक त्याच्या घरांत शिरून झडती घेण्यांत दंग झालें होतें!

कच्च्याबच्च्यांना शेजारच्या आळींत पाठविण्यांत आलें होतें!

तरुण लहान मुली स्वयंपाकघरांत रडत होत्या!

प्रौढ बाया शिपायांशीं कांहीं अर्जवानें तर कांहीं त्राग्यानें बोलत होत्या.

'आम्हांला कश्यापायीं हा त्रास?–आमी काय केलंय् तुमचं! सावळ्या बिचारा घराबाहेर नाहीं जात? कुना मेल्यानं हें किटाळ आमच्यावर आनलं–" अशींच वाक्यें त्या बोलत. शिपाई त्यांना उत्तर देण्याच्या भानगडींत पडत नव्हते. त्यांची वागणूक सभ्यपणाची होती आणि त्यांचें काम धिमेपणानें चाललें होतें.

सावळ्या घराच्या बाहेरील ओसरीवर सुन्न मनानें उभा होता. त्याच्या शेजारीं एक उच्चकुलीन दिसणारा युरोपियन् धर्तीचा पोषाख केलेला युवक उभा होता.

युवकाचा वर्ण श्यामल, ताम्बूस, व सतेज होता. त्याच्या काळ्याभोर केसांवर कुरळेपणाच्या लहरी उमटल्यामुळें त्यांत एक तऱ्हेचा जिवंतपणा दिसे. त्याचें नाक सरळ पण टोकाशीं किंचित् फुगीर झालेलें दिसें. जिवणी आणि हनुवटी फारच प्रमाणबद्ध आणि नाजुक होती. कपाळ नितळ, भव्य, आणि थोडें पुढें आलेलें होतें. सर्व शिल्प पुरें झाल्यावर कालनामाची नोंद करण्यास एक संगमरवरी चिरा त्या शिल्पाच्या शिरोभागीं

बसवावा त्याप्रमाणें हें भव्य कपाळ दिसे. डोळे मोठे करारी व तेजस्वी दिसत. लोकांवर छाप पाडणाऱ्या जबरदस्त माणसाचे सर्व विशेष चेहऱ्यांत होते. परंतु भावनेच्या आंदोलनाबरोबर चेहऱ्यांत होणारे बदल, गालाला मधून मधून पडणारी खळी, डोळ्यांत क्वचित् चमकून जाणारी सलज्जता, आणि विशेषतः बोलतांना होणारी जिवणीची लाडिक उघडझांप यांमुळें चेहऱ्यांतील करारीपणाला रम्यतेची जोड मिळे. आदर आणि आकर्षण एकदमच उत्पन्न करणारे जे चेहरे असतात त्यांपैकीं हा चेहरा होता. युवकाची उंची मध्यम होती. त्याचा पोषाक भारीपैकीं असून रंगाची निवड यथातथ्य होती.

युवकाचें नांव किशोर.

–किशोरनें निरोप पाठविला म्हणूनच प्रकाश 'शांतिनिकेतन' मधून तांतडीनें बाहेर पडला.

–तो तडक सावळयाच्या घरापुढें येऊन सायकल वरून उतरला.

"ही काय भानगड आहे ?"

"सावळ्याच्या घराची झडती चालली आहे." किशोरनें सांगितलें.

"हो, तें कळलं, पण कां ?"

"तुझ्यासारख्या देशोद्धारकाची भक्ति करण्याचं पाप त्यानं केलं म्हणून !"

"मला नाहीं याचा अर्थ कळला !"

"सावळ्याच्या घरांत आक्षिप्त वाङ्मय तुम्हीं मंडळींनीं दडवून ठेविलं आहे असं सरकारला वाटल्यामुळं ही झडती घेण्यांत येत आहे."

"पण आमच्या चळवळींत गुप्त आणि हिंसात्मक असं कांहींच नसतं. सारं कांहीं उघड उघड. नसत्या शंका घेऊन आपल्या अधिकाराचं.... "

प्रकाशच्या या बोलण्यानें त्या गंभीर वातावरणांत देखील किशोरला हसूं आल्या-खेरीज राहिलें नाहीं. किती साधा सरळ जीव ! जणूं कांहीं संकटें यायला आपलेंच वर्तन चुकावें लागतें ! प्रकाशला अर्धवटच थांबवून किशोर म्हणाला,

"अरे, असं रागावून अन् सीधं बोलून सरकारची खात्री होणार आहे का ? यांत आपल्या कार्यक्रमांतील उणीवांपासून तों सरकारला वर्दी देणाऱ्या आपल्या प्रच्छन्न शत्रूपर्यंत सारं कांहीं नीट तपासलं पाहिजे."

किशोर बोलला त्यांत खूप अर्थ भरला होता. पण प्रकाशची मनःस्थिति क्षुब्ध व संतप्त झाली होती. किशोरच्या बोलण्याचा विचार न करतां तो भावनावशतेनें सावळ्याला म्हणाला,

—" सावळ्या, पाहिलं तुझ्या प्रकाशदादाशीं गोड वागलं म्हणजे असं होतं. तुला मी सांगत होतों आपल्या सुखावर निखारा ठेवावा अन् मग आमच्यासारख्याशीं संबंध जोडावा ! "

" दादा, असं काय बोलतां ? मला का तुम्हीं सांगितलं होतं माझ्याकड येत जा म्हणून. मीच होऊन आलों ना. "

इतक्यांत झडती घेणारे लोक बाहेर पडले. प्रकाश एकदम उसळून त्यांना म्हणाला,–

" अहो, आमच्या पाठीमागें लागा. या गरिबांना कां तुमचा जाच ? "

" मिस्टर प्रकाश, सरकारला याचा वहीम आला म्हणून याची झडती घेण्याचा हुकूम सुटला, आम्हीं फक्त हुकुमाची अमलबजावणी केली. यांत कोणाला जाच करण्याचा काय संबंध ? "

यावर प्रकाश रागानें कांहीं दुरुत्तरें करील अशी किशोरला खात्री होतीच, म्हणून प्रथम त्यानें प्रकाशला आवरिलें आणि राजदूतांना थोड्या सहजपणें तो म्हणाला, "जाऊं द्या हो, तुमचा काय यांत दोष ? मला वाईट वाटतं तें एवढंच कीं तुमचे दोन अडीच तासांचे सारे श्रम फुकट गेले."

राजदूत किशोरकडे पहात निघून गेले.

प्रकाश व किशोर यांनीं सावळ्याच्या घरांतल्या माणसांना थोडेंसें समजावलें आणि 'आत्तां पुनः तुमच्यावर असा प्रसंग येणार नाहीं,' म्हणून धीर दिला. एवढीं मोठीं शिकलेलीं माणसें आपल्या घरांतल्यासारखीं वागतात, या गोष्टीनें जो कृतज्ञतेचा आनंद त्या मंडळींना झाला होता, त्याच्या भरांत सरकारी रोषाचा लागलेला धक्का तीं सहज विसरलीं.

प्रकाश आणि किशोर सावळ्याचा निरोप घेऊन निघाले.

" प्रकाश, माझ्या बंगल्यावर येतोस? चित्ररेखा विचारीत होती कीं प्रकाश दोन दिवसांत कां आले नाहींत ? चल, चहा घे आणि जा मग."

" बरं, चल."

" तुला या झडतीच्या प्रकरणाबद्दल काय वाटतं ?"

" कांहीं नाहीं. सावळ्यासारख्या सामान्य जनतेंतल्या एका घटकाला दहशत घातली म्हणजे आमच्या चळवळीला त्या वर्गांतून फारसे अनुयायी मिळणार नाहींत असें सरकारला वाटत असावं."

" पण सावळ्यालाच कां धरण्यांत आलं ?"

" तो माझ्याकडे कधींमधीं येतो म्हणून !"

" प्रकाश, मला असं वाटत नाहीं. तुमचे मार्ग गुप्त आणि हिंसात्मक असते तर कदाचित् असा अचानक छापा सरकारनं घातला असता."

" मग तुला काय वाटतं."

" मला जें वाटतं तें विस्तारपूर्वक सांगायचं म्हटलं तर तूं माझ्यावर भलत्या हेतूचा आरोप करशील. पण मी जों जों या प्रकरणाचा विचार करूं लागलों तों तों सर्व दुवे अगदीं बेमालुम सांपडले. सावळ्याच्या घरांत जप्त वाङ्मय आहे अशी वर्दी कोणीं सरकारांत दिली असेल असं तुला वाटतं ?"

" वर्दी कशाला द्यायला पाहिजे. सरकारचा तो तर्क असेल."

" बाबारे, सरकार असे वृथा तर्क करीत बसत नाहीं. त्याला कांहींतरी सुगावा मिळावा लागतो."

" मग कोणीं दिली असं तुझं म्हणणं ?"

" नुसत्या जहाल मतांचा उच्चार करून आपणांला शंभर नंबरी कम्युनिस्ट म्हणविणारा आणि बेबंद विचारांच्या, कलाविलासाच्या, आणि ढोंगी ध्येयवादाच्या नांवावर आपल्या वासनापूर्तीची सोय पाहणारा तो कॉम्रेड सदानंद. तोच या प्रकरणाच्या मुळाशीं आहे."

" म्हणतोस काय हें किशोर ! छे, मला हें नाहीं खरं वाटतं."

" नाहींच वाटायचं तुला हें खरं. तुझ्यासारखे खरे ध्येयवादी असे सरळ आणि भोसळट आहेत, म्हणून तर यांचं फावतं. पण राजकारणांत अज्ञात ठिकाणांहून तुझ्या-

वर विषारी फुत्कार सोडणारा हा कालिया माझ्या जीवनडोहांत कायमचा वस्ती करायला आला आहे."

"काय म्हणतो आहेस हें तूं ?"

"आतां तुला स्पष्ट सांगतों. स्त्रियांच्या विवेकशक्तीवर माझा पूर्वीपासून बेताचाच विश्वास आहे. त्यांतून सुलभासारखी लाडावलेली, लहरी, व नखरेल मुलगी विवेकाला पूर्ण पारखी असावयाची. अलीकडे सदानंदाचा तिनं जो ध्यास घेतलाय् तो तुझ्या नीट ध्यानांत आला आहे का ?"

"नाहीं बुवा. ती त्याच्यासंबंधीं आदरानं बोलते एवढं खरं."

"हं. ह्या आदरांतून प्रीतीचे कोंब फुटत आहेत, परवां स्मारकमंदिरांतील सभेंत सदानंदाचं बेफाम भाषण ऐकतांना ती किती तल्लीन होती हें मीं प्रत्यक्ष पाहिलं. 'आजपर्यंत फोफावलेल्या या भांडवलशाही कलेचा नायनाट केला पाहिजे' असें वाक्य सदानंदानं उच्चारतांच एकच टाळी पडली आणि ती त्या चिमुकल्या गोंडस हातांची. अन् पुढें मीं सदानंदाचे आक्षेप खोडून काढले तेव्हां टाळ्यांचा गजर झाला. पण नाखुषीचा चेहरा करून आपल्या कानांवरील केसांच्या फुग्यांवर सुलभा दोन्ही हात फिरवीत होती."

"आश्चर्य आहे. पण तिचं तुझ्यावर प्रेमच नाहीं असं तुझं म्हणणं."

"तसं असतं तर मी तिच्या वर्तनाबद्दल इतकं कळकळीनं बोललों नसतों; पण या मुलींचीं मनं इतकीं विकृत झालेलीं असतात कीं खोल अंतःकरणांत दडलेल्या खऱ्या भावना त्यांना उमगत नाहींत. आणि हुल्लडीची आवड हेंच त्यांचं सर्वस्व होऊन बसतं."

"पण आबांसारख्या जुन्या वळणाच्या माणसाला हें कसं चालतं रे ?"

"हं, सांगतों त्याचं कारण. आबा मतानं जुने असले तरी ज्ञानाची मजल आपण आजतागायत गांठावी असा त्यांचा हव्यास असतो. किंबहुना सनातनी समाजांत आपलं हें वैशिष्ट्य त्यांना टिकवायचं आहे. सदानंद त्यांना नेहमीं मार्क्स, लेनिन, बुखारिन्, प्लेकेनाव्ह, स्टूची, पाम दत्त, गोर्की अशा सर्व कम्युनिस्ट महर्षींच्या श्रुति-स्मृति ऐकवीत असतो. त्यांना तो अभ्यासी व गाढा विद्वान् वाटतो. आणि तुझ्या-सारखे जातिवंत कार्यकर्ते व त्यांचे मित्र हे निव्वळ चळवळे वाटतात. माझ्या

नाजुक भावनांना कष्ट देणारा हा प्रश्न कसा गुंतागुंतीचा होत चालला आहे. पाहि-लास ना ? ”

“ पण शशांकला हें ठाऊक आहे ना ? ”

“ आहे तर. माझ्या निरीक्षणाला त्याची मदत तर फारच होत आहे. ”

“ पण सावळ्याच्या झडतीशीं या प्रकरणाचा संबंध कसा पोंचतो ? ”

“ ऐकावें महाराज. कायकर्त्यांच्या मार्गांत विघ्न आणणं एवढंच या नकली ध्येयवाद्याचं रिकाम्या वेळांतलं कार्य असतं. सावळ्या, तुला हा कोट द्यायला आला तेव्हां शेजारच्या खोलींत सदानंद होता. सावळ्याचं तुझ्यावरील प्रेम हें बहुजन-समाजाला तुझ्याबद्दल वाटणाऱ्या आदराचं प्रतीक आहे हें सदानंदानं ओळखलं नसेल असं नाहीं. साहजिकच त्याच्या मत्सराग्नीची ज्वाला बरीच भडकली. पुनः सावळ्याच्या एका दूरच्या सुंदर बहिणीला सिनेमांत घेण्याची सदानंद खटपट करीत होता. त्यांत त्याला चांगलीच थप्पड मिळाली. सकाळीं झडती सुरू झाल्या-नंतर दूर अंतरावरून तो बैल एकदां प्रसन्न चित्तानें सर्व कांहीं नीट चाललं आहे ना हें पाहून गेला. बोल, आतां या सर्व पुराव्याविरुद्ध तुला काय म्हणायचं आहे तें ? ”

“ किशोर, कायदा आणि मानसशास्त्र यांतलं तुझं गाढ ज्ञान हें निव्वळ पुस्तकी नाहीं याचा अनुभव आजपर्यंत कितीदां तरी आलाच आहे. ही तुझी कुशाग्रता पाहिली म्हणजे मला स्वतःला मी ठेंगणा वाटूं लागतों. ”

“ छे, छे; असं म्हणूं नकोस. शेलीसंबंधीं असं म्हटलं आहे कीं, आपणांसारखी इतिहास, समाज, आणि संस्कृति यांतून त्याची व्यक्तिमत्ता बनली नव्हती. निसर्गानेंच त्याला आपल्या पद्धतीनं पूर्ण करून जगांत धाडलं. त्यामुळें शेलीला जगाचे मार्ग कधींच उमगले नाहींत. मला तुझ्याबद्दल अगदीं हेंच वाटतं. सदानंदाचं ढोंग तुला उमगलं नाहीं हा तुझा दोष नव्हे. कारण तुझ्या शौर्याच्या प्रचंड प्रवाहांत हा क्षुद्र पानपाचोळा तूं सहज वाहून नेशील; व्यावहारिक पद्धतीनं प्रत्येक बाबतींत सावधा-नपणा ठेवणं तुझ्याच्यानं होणार नाहीं. ”

इतक्यांत किशोरचा बंगला आलाच. लष्कर आणि शहर यांच्या सरहद्दीवर हा बंगला होता. पुढें प्रशस्त पटांगण आणि मध्यवर्ती कारंजाच्या आसऱ्यानें वाढलेली

बाग, मधील इमारतीची दुमदार रचना, निळसर रंगांच्या भितींवर वेलीच्या सुट-लेल्या सांखळ्या, आणि एकंदर नागर वातावरणाला जानपदाचा उठाव देणारीं शिंदीचीं झाडें या सर्वांचा देखावा मोठा सुंदर होता.

पोर्चमध्यें सायकल ठेवून प्रकाश किशोरच्या पाठोपाठ बंगल्याच्या पायऱ्या चढूं लागल्या.

जिना चढतांना 'राजनके राजा महाराजा' ही चीज गोड आवाजांत कोणी गुणगुणत असल्याचें प्रकाशला ऐकूं आलें.

किशोरच्या दिवाणखान्यांत ते शिरले तोंच एक रूपसंपन्न युवती आंतून आली आणि प्रकाशला पाहतांच आनंदित होऊन म्हणाली,

"ओहो पंडितजी, पधारो."

चित्रलेखा किशोरची धाकटी बहीण. गुजराती आणि दक्षिणी संस्कृतीचा सुंदर मिलाफ तिच्यांत झालेला दृष्टीस पडे. ती मध्यम उंचीची आणि थोडी स्थूल होती. चेहरा अगदीं वाटोळा असून नाक सरळ पण टोकाशीं पसरट वाटे. हास्याचे वेळीं तिच्या शुभ्र व रेखीव दांतांपेक्षां नाजुक गुलाबी हिरड्याच प्रामुख्यानें दिसत. तिच्या वर्णनांत श्यामलता, तांबुसपणा, गोरेपणा यांचें बेमालुम मिश्रण होतें. ती यावेळीं जरीच्या किनारीची निळसर साडी गुजराथी धर्तीनें नेसली होती. रंगीबेरंगी कापडाचा ब्लाऊज तिच्या दंडांत अगदीं रुतल्यासारखा दिसे. सहृदय, काव्यात्मक बुद्धिशाली स्वभावाचें पाणी तिच्या शांत व विशाल चक्षूंत स्पष्टपणें दिसे.

"चहा लेंएंगे"

"हां, क्यौं नहीं ?"

प्रकाशकडून उत्तर मिळतांच नोकरास तिनें चहाची व्यवस्था करण्यास सांगितलें आणि ती स्वतः समोरील वेताच्या खुर्चीत बसली.

"सावळ्याकडे काय सापडलं !"

"काय सापडणार ?" किशोर वेष उतरवीत होता. तो वहिणीच्या प्रश्नाला उत्तर देत म्हणाला, "अगा जें झालेंचि नाहीं–तयाची वार्ता पुससी कांई. अशी सावळ्यावरील आरोपाची स्थिति. बाकी आमच्या या प्रखर प्रकाशाचा चांगला

चटका बसला, बरं का त्या बिचाऱ्याला? चित्रलेखे, तुला मलासुद्धां सावध असलं पाहिजे."

"त्यांतून किशोर, तुला फार सावध राहिलं पाहिजे. कारण सरकारांत वर्दी देणाऱ्यांची खरी स्पर्धा तुझ्याशीं आहे."

"म्हणजे, तुमच्याजवळ सदानंदप्रकरण किशोरनें सांगितलं वाटतं सारं."

"अरे, हिनंच तर पुष्कळ गोष्टींवर प्रकाश पाडला. हिचं जीवन असं एकांतिक असलं तरी मनुष्यस्वभावाची पारख हिला फार आहे हो."

"यांतल्या स्तुतीबद्दल मला कांहीं बोलायचं नाहीं. पण प्रकाश, माझं म्हणणं दादाच्याहून वेगळं आहे. मनुष्यस्वभावाची थोडीफार पारख आहे म्हणूनच मी अशी एकांतिक बनलें आहें. हा तुमचा सदानंद कॉलेजच्या रेसिडेन्सीभोंवतीं घिरट्या घाली. टेकडीवर आमच्या नजरेच्या टापूंत हिंडे. आणि एकदा तर यानं मला रेसिडेन्सींत चिट्ठी पाठविलीन् कीं 'मला तुमच्याशीं सार्वजनिक विषयावर बोलायचं आहे. तुम्ही अमुक ठिकाणीं या.' म्हणून मी सरळ तिथें गेलें आणि याला सांगितलं कीं, तुमच्या पुस्तकी ज्ञानाची मला मुळींच कदर नाहीं. मला सामाजिक अथवा राजकीय महत्त्वाकांक्षा नाहींत. आणि असल्या तरी तुम्हांला गुरुदेव करण्यापर्यंत पाळी कधींच येणार नाहीं. तेव्हांपासून स्वारीनं माझं नांव टाकलं."

एवढें बोलणें होत आहे तों चहा आला. आणि तिघेजण चहा घेऊं लागले. चहाचीं उपकरणें इंग्रजी धर्तीचीं होतीं. चित्रलेखानें कपांत चहा ओतून यथाप्रमाण दूधसाखर मिसळलीं. या वेळीं तिच्या मोत्यांच्या बांगड्यांची व हिरव्या खड्याच्या अंगठीची प्रभा टेबल, ट्रे व कपबशा यांच्या चकचकीतपणांत चमकून जात होती.

"लेखाताईसारखं उत्तर सुलभेनं दिलं असतं म्हणजे सदानंदाचं तिच्या बाबतींतलं वर्तन आजच्यासारखं चालू राहिलं नसतं." प्रकाशनें उद्गार काढले.

"प्रकाश, किती सरळ तुझी विचारसरणी आहे! ढोंगीपणाचा भपकारा येतांच तिरस्कारानं मागं सरणारी मुलगी सुलभा असती तर केवढे प्रश्न सुटले असते? पण तिच्यांतली हीच उणीव मोठी आहे. चांगल्याकडे तिचं मन आकर्षिलं जात नाहीं असं नाहीं. परंतु अस्सल पदार्थाइतकीच नकली मालावरहि तिची दृष्टि स्थिरावते. हा तिचा एकटीचा दोष आहे असें नाहीं. नव्या पिढींत असा विपरीत वृत्तीचा झालेला मोठा वर्ग आपल्या समाजांत वाढत आहे."

" अरे, हो तुम्हांला सांगायचं राहिलंच. शशांकची ती मामेबहीण छाया काल येथें आली. आज सकाळीं तिची ओळख झाली. " प्रकाश मध्येंच म्हणाला.

" कशी काय आहे छाया ?" किशोर आणि चित्रलेखा यांनीं एकदम विचारिलें.

प्रकाश किंचित् गोंधळला. आणि चित्रलेखेची दृष्टि आपल्या चेहऱ्यांतील बारीक फरकांचें निरीक्षण करण्यांत रोखलेली आहे, हें पाहून तर त्याच्या मानसिक गोंधळांत भर पडली.

" मुलगी मोठी आकर्षक अन् मोकळ्या मनाची दिसली. बाकी तिच्याशीं दोन वाक्यं सुद्धां मीं बोललों नाहीं. नुसती ओळख झाली तों किशोरचा निरोप आला. तेव्हां दहापांच मिनिटांत काय समजणार ? "

किशोर एवढ्या माहितीनें विचारमग्न झाला. इतक्यांत त्यानें विचारलें, " काय रे, सुलभाचे आणि तिचे संबंध कसे दिसले ? "

"बरेच जिव्हाळ्याचे वाटले मला. कारण एकाद्या लहान मुलाप्रमाणें सुलभा तिच्याजवळ खेळत होती. "

अकराचे ठोके पडले.

प्रकाश त्या बहीणभावंडांचा निरोप घेऊन निघाला.

छाया व सुलभा यांचे परस्पर संबंध दाट आहेत, या माहितीनें किशोरच्या मनांत कितीतरी विचारतरंग उमटत होते.

इकडे चित्रलेखा मनाशीं म्हणत होती " मुलगी मोठी आकर्षक अन् मोकळ्या मनाची असें प्रकाश म्हणतात. पाहिलें पाहिजे एकदां या छायाला. "

## .५. पांच श्रमी प्रेमिक

शशांकचा तो दिवस चमत्कारिकच गेला. सकाळचें सुंदर संगीत, त्यानंतर शेवंतीची ती भेट, प्रकाशचें आगमन, आणि त्या खेदजनक वार्तेमुळें त्याचें अकस्मात् निघून जाणें अशा अनेक घटनांमुळें त्याच्या मनाला पुरेशीं आंदोलनें बसलीं होतीं, आणि तो अस्वस्थ झाला होता. परंतु त्याच्या उत्कटतेला सुख-लोलुपतेच्या अशा कांहीं मर्यादा पडल्या होत्या कीं, विचित्र घटनांनीं मन अस्वस्थ झालें म्हणजे तळमळत न राहतां तो नव्या गोड अनुभवाच्या शोधार्थ निघे. लहानशा दुःखानेंहि आपल्या मनाचा टवटवीतपणा कोमेजेल कीं काय अशी त्याला जणूं काय भीति वाटे. प्रकाश आणि किशोर यांना देखील कित्येकदां शशांकचा असाच राग येई. मग तिऱ्हाइतांच्या दृष्टीनें तो बेपर्वा, स्वार्थी, व चैनी ठरावा यांत काय नवल? त्याच्या वृत्तीस अनुसरूनच आज तो वागला. सावळ्याच्या झडतीचें काय झालें, प्रकाश काय करीत आहे याची त्यानें दिवसभरांत चौकशीहि केली नाहीं. मनांत हुरहूर होती, पण प्रत्यक्ष जाऊन चौकशी करण्याचा तत्परपणा कांहीं त्यानें दाखविला नाहीं. छाया व सुलभा यांना घेऊन तो संध्याकाळीं सिनेमास निघाला.

पण मन सुखलोलुप असलें तरी दैवाचा वारा सदैव अनुकूल असतो असें थोडेंच आहे!

अगोदर सुलभाच्या शृंगारसाजामुळें निघायला उशीर झाला होता.

त्यांतच वाटेंत सदानंद भेटला.

"काय, सिनेमाला निघालांत वाटतं?"

"हो, तुम्ही पाहिलात का हो! कसा काय आहे?"

"हो. मी मॅटिनीलाच गेलों होतों. पण माझं मत जगावेगळं असायचं. तुम्हांला नाहीं पटायचं तें शशांक!"

"अहो सांगा तर, जगावेगळं म्हणजे काय असतं, याची आम्हांलाहि कल्पना आहे!"

"तुमचं मत म्हणजे खरोखरच ऐकण्यासारखं असायचं." सुलभा लाडिक आवाजांत म्हणाली.

प्रफुल्लित होऊन सदानंद सांगूं लागला, "मला कांहीं बुवा हें पिक्चर आवडलं नाहीं. भांडवलशाहीला आपलं बस्तान दृढ करायचं असतं म्हणून ती सिनेमासारख्या कलांनासुद्धां आपल्या कार्याला राबवून घेते. यांत बंडाचा बींमोड केलेला दाखविला आहे. बहुजनसमाजांतली बंडखोर वृत्ति मारण्याचं सारं कारस्थान. नुसत्या भूतदयेनं खुनी माणसं सुधारलेलीं दाखविलीं म्हणजे मला त्या वेडसरपणाचं हसूं येतं. माणसं खुनी कां होतात याचा शास्त्रशुद्ध विचार यांच्या टाळक्यांत येणार नाहीं, आणि आला तरी ते तो प्रकट करणार नाहींत."

सुलभानें आनंदित मुद्रेनें छायाकडे पाहिलें. 'पहा, मी सांगत होतें तसा अद्वितीय माणूस हा आहे कीं नाहीं!' असाच अर्थ तिच्या त्या दृष्टींत होता.

शशांक थोड्या तुटकपणेंच म्हणाला, "हें पहा, ही तुमची तांबडी कावीळ तुम्हांला सर्वत्र नडते. कणाकणांत भांडवलशाहीचा दुष्टपणा भरलेला तुम्हांला दिसतो. भूतदयेनं जगाला सुधारूं पाहणारे महात्मे जर वेडसर तर शास्त्रीय दृष्टीच्या आधारें मत्सर, स्पर्धा इ० भावनांचें उच्चाटण करूं पाहणारे तुम्ही हजारपटीनं वेडसर आहांत असं म्हणतां येईल.....पण आतां ६ वाजले. अगोदरच उशीर झाला आहे. आपले वाद नेहमींचेच आहेत. हो; पण थांबा, आय् ॲम् सॉरी. ही माझी मामेबहीण छायाताई–ओळख करून द्यायची राहिली."

"नेव्हर माइंड. हे तुमच्या 'कल्चर्ड' वर्गाचे शिष्टाचार आहेत." सदानंदानें छायाकडे सहास्य मुद्रेनें पहात आणि छायानें थंडपणें केलेल्या नमस्काराला उलट नमस्कार करीत शेरा मारला–आणि लगेच तो विरुद्ध दिशेला वळला.

वास्तविक पहिल्यापासून त्याचें सारें लक्ष छायाकडेच होतें. आणि सुलभाच्या लक्षांत हें पूर्णपणें येऊन ती कांहींशी अस्वस्थहि झाली होती. सिनेमागृहांत शिरेपर्यंत ती कांहींएक बोलली नाहीं.

सिनेमा सुरू झाला होता. दुसऱ्या मजल्यावर द्वारपालकानें दाखविलेल्या टॉर्चच्या प्रकाशांत या मंडळींनीं खुर्च्या गांठल्या. तो सारा मजला प्रेक्षकांनीं भरून गेला होता. अंधारांतून रुपेरी पडद्यावर गेलेल्या प्रकाशाच्या झोतामुळें जवळचे कांहीं चेहरे व पातळाचे अस्पष्ट रंग दिसत. एक उन्मादक गंध त्या काळोखाच्या वातावरणांत दरवळत होता. अंधाऱ्या रात्रीं एकाद्या प्रफुल्ल उद्यानांत बसल्यासारखें त्या मंडळींना वाटलें.

विश्रांतीची वेळ येतांच लख्ख दिवे लागले. ओळखीचीं माणसें दिसतात का म्हणून शशांक चौफेर नजर फिरवूं लागला. तोंच चार रांगांमागें बसलेलीं किशोर व चित्रलेखा त्याला दिसलीं.

दोघांनीं रुमाल उडविले व किशोर चित्रलेखेला घेऊन या मंडळीजवळ आला.

किशोर चेष्टेनें शशांकला म्हणाला, "तुझ्या कलात्मक दृष्टीला न्याहाळण्याला इतकी सामुग्री होती कीं माझ्यापर्यंत ती येऊन पोचते कीं नाहीं याची मला भीति वाटली."

"वा महाराज, माझ्या या बहिणीदेखत तरी असे उद्गार काढूं नका म्हटलं!"

"बहिणी या उद्गारांना साथच देतील. कारण यांत त्यांना नवं असं कांहीं नाहीं." छाया हंसत हंसत म्हणाली.

ओळख करून देण्याच्या उपचारावांचूनच छाया, किशोर व चित्रलेखा एकमेकांच्या परिचयाचीं झालीं. सुलभा सलज्ज व मुग्ध झाली होती आणि मधून मधून किशोरकडे कटाक्ष फेकीत होती. किशोर व शशांक महिलामंडळींना लेमन आणण्याकरितां बाहेर पडले.

"आज सकाळीं प्रकाश तुमच्याबद्दल बोलत होते. तेव्हांपासून तुम्हांला भेटण्याची उत्कंठा मला लागली होती." चित्रलेखा म्हणाली.

"कोण प्रकाश, माझ्याबद्दल? काय सांगत होते?" अधीरपणें छायानें विचारलें.

"ते एकच वाक्य बोलले, मोठी आकर्षक अन् मोकळ्या मनाची मुलगी आहे. पण इतके साधे अन् एकांडे आहेत ते, कीं एकाद्या व्यक्तीबद्दल एवढंसुद्धां बोलण्याचं त्यांच्या लक्षांत नसतं. तुमच्या प्रथमदर्शनानं ते भारावलेले दिसतात."

छायाला स्वतःबद्दल वाटणारी धन्यता तिच्या चेहऱ्यावर दिसत होती.

इतक्यांत सुलभा म्हणाली, " लेखाताई, प्रकाशला कां ग नाहीं घेऊन आलांत?"

" अग, किशोर त्यांना आग्रह करीत होता, पण त्यांच्याकडे कृष्णचंद्र नांवाचे कोणी पाहुणे आले वाटतं. "

इतक्यांत एका पोऱ्यानें लेमनचे तीन ग्लास आणून दिले. दारांत किशोर आणि शशांक बोलत उभे होते. दोघांचेहि चेहरे विचारमग्न दिसले. किशोर मधून मधून सिगारेटचे झुरके घेऊन धूम्रवलयें हवेंत सोडी. त्याच्या गंभीरपणांत कांहींशी बेफिकीरी आणि औदासिन्य दिसत होतें.

"तुझी ही हकीकत ऐकून वाटतं कीं हें प्रकरण मोठं बिकट होत जाणार."

" हो; आणि यांत आपल्या दोन माणसांना जपलं पाहिजे. प्रकाशला जगाचे मार्ग कधीं कळायचे नाहींत आणि सुलभा उथळ आणि दिखाऊपणाला भाळलेली."

"हें कसं जमावं ?"

"काय रे, ही तुझी छायाताई किती दिवस इथं राहणार आहे ?" किशोरनें कांहीं धोरणानें बोलावें तसें विचारलें.

" ती जाईन म्हणते आहे लौकर; पण मी तिला आठ–पंधरा दिवस ठेवून घेईन म्हणतों. "

पहिली घंटा झाल्यामुळें दोघे आंत आले. शशांकच्या शेजारीं अनायासें दोन जागा रिकाम्या होत्या. किशोर आणि चित्रलेखा यांनीं तेथेंच मुक्काम केला.

" चित्रलेखे, छायाताईंना आपल्या बंगल्यावर यायचं आमंत्रण दे. "

" हो, तें मी कसं विसरेन ! "

" म्हणजे त्यांच्याबरोबर सुलभाहि येईल. नाहींतर आपल्या भांडवलवाल्यांच्या घराला या 'भाई' लोकांचे पाय कशानं लागताहेत ? "

किशोरच्या बोलण्यांतली खोच सुलभाच्या लक्षांत येऊन ती त्रस्त झालेली दिसली–पण छाया तिच्या पाठीवर हात ठेवून म्हणाली, "अरे वा, हें आमचं बाळ कॉम्रेड झालं वाटतं ?"

"—आणि शशांकला बोलाव बरं का. अलीकडे कुंचली आणि लेखणी अशा दोघींच्या सहवासामुळं स्वारी जगाला पारखी झाली आहे."

" टोचून बोलावं तर आमच्या किशोरनंच ! " शशांक उद्गारला.

पण एवढ्या अवधींत पडद्यावरील पेढे, धान्य, फोटोग्राफी, फोटोग्राफ इ० विषयांतील तज्ञ दुकानदारांच्या मनोरंजक जाहिराती संपून चित्रपटाला सुरुवात झाली.

सिनेमा संपल्यानंतर त्या अरुंद बोळांतील गर्दी हटेपर्यंत ही पांच मंडळी बाजूला उभी होती. छाया, सुलभा, व चित्रलेखा यांचीं परस्परनिरोपघेणीं चाललेलीं होतीं. एकीकडे शशांक किशोरला म्हणाला, "काय रे हा कृष्णचंद्र कोण आलाय् प्रकाशा-कडे ? तूं पाहिलास त्याला ?"

"हा एक अबोल खादीवेषधारी माणूस आहे. माणूस बावळा दिसला. पण अंतरीं नाना कळा असल्यास न कळे. प्रकाश म्हणत होता फार बुद्धिमान् आणि विद्वान माणूस आहे म्हणून. परंतु प्रकाशच्या असीम औदार्यानें कितीतरी साधीं माणसें महत्पदाला चढविलीं आहेत. त्यांतलाच हा प्रकार असायचा!"

"हो बाकी तेंहि शक्य आहे."

* * *

पांच मंडळी सिनेमाला येऊन गेली. यांत मोठीशी ती कोणती घटना घडली ?

पण जीवनांतील अगदीं साध्या प्रसंगांत देखील अंतःकरणांतील कितीतरी भावनांची बांधणी आणि मोडणी होत असते.

आज ते पांचहि जीव विकल होऊन आपापल्या निवासाकडे चालले होते.

सकाळीं झालेल्या झडतीच्या पाठीमागलें कारस्थान आणि प्रकाशच्या सार्वजनिक जीवनाला लागलेला अज्ञात भुंगा यांच्या विचारानें शशांक श्रमी झाला होता. त्यांतच हा कृष्णचंद्र कोण याबद्दल एक कुतूहल लागलेलें! प्रकाशच्या अंतःकरणाच्या सरहद्दी ओलांडून एकादी व्यक्ति आंत येत आहे असें पाहिलें कीं शशांकचा जीव कांहींसा अज्ञात मत्सरग्रस्त भीतीनें कासावीस होई. तसाच तो आज झाला होता!

आपण प्रकाशला पुरेसें मोहित केलें याची जाणीव होऊन छाया संतोष पावली खरी, 'पण प्रकाशच्या हृदयावर कांहीं ताबा असल्यासारखी बोलणारी ही चित्रलेखा कोण ? मुलगी मोठी सुंदर दिसते. पण प्रकाशशीं हिचे संबंध कसे असतील बरें!'

सदानंद आणि किशोर हे दोघेहि थोड्या अंतरानें भेटल्यानें एकाबद्दल उघड वाटणारी ओढ आणि दुसऱ्याबद्दल अंतर्मनांत असलेली प्रीति यांचें तुमुल संगर सुलभाच्या कोवळ्या अंतःकरणांत चाललें होतें.

चित्रलेखेला छायेच्या ओळखीनें समाधान लाभलें. पण प्रकाशवर परिणाम करण्याइतकी खरोखरीच ती आहे याबद्दल किंचित् विषाद वाटला. ती थोडीशी कमी पूर्ण असती तर—!

किशोर सुलभाच्या सहवासानें उत्फुल्ल झाला होता. “What a pretty child....पण इतकी मूर्ख असावी ना?” असें मनाशीं म्हणत तो बंगल्यांत शिरला.

.६.

# बदललेला ओघ

"आतां जा, तुम्ही. उद्यां संध्याकाळीं आपण पुनः जमणारच आहोंत."

हॉटेलकामगारांच्या दोघां मोहरक्यांना निरोप देत प्रकाश म्हणाला. त्याचा चेहरा थोडा त्रस्त झालेला दिसत होता. हॉटेल कामगारांचा संघ काढण्याची नुसती कल्पना निघतांच गांवांतल्या हॉटेलचे कांहीं मालक आपल्या नोकरांना कशीं उद्दाम उत्तरें करूं लागले याच्या कहाण्या आज दिवसभर तो ऐकत होता. थोडीशी कुरबुर होतांच नोकराला हाकलून देणें, कपबशांच्या अपघातांची नुकसानभरपाई नोकरांकडून मागणें, खाजगी जीवनाच्या व करमणुकीच्या शीतल झुळुका कामगारांच्या कष्टी आयुष्यक्रमांत न याव्या याची खबरदारी घेणें या व दुसऱ्या अनेक तक्रारी कामगारांना नवीन नाहींत. त्या दूर करण्याकरितां प्रकाशनें संघाची कल्पना फैलावण्यास सुरवात केली होती. पण या संघापूर्वींच मालकांनींहि संघशक्ति वाढविण्यास आरंभ केला.

कामगारांना पोचवून खोलींत परत येतांच प्रकाश दिव्याशेजारीं वाचत बसलेल्या कृष्णचंद्रांना थोड्या रुक्षपणें म्हणाला, "पाहिलंत कृष्णजी, असं हें आमच्या चळवळीचं तंत्र आहे. रोगावर उपाययोजना म्हणून करायला जावं तों तिची चाहूल लागतांच रोग अधिकच दुःसाध्य बनत जातो. कित्येकदां निराशेचा असा आवेग येतो आणि सारखं वाटूं लागतें कीं हें आपण कशासाठीं करीत आहों? समाजांतील कांहीं सज्जन व्यक्तींचा भिंधेपणा पत्करून चरितार्थ चालवायचा आणि ज्या चळवळींतून कांहीं निष्पन्न होण्याची आशा नाहीं अशी चळवळ करीत बसायचें!"

"अरे, यांतूनच आपला आत्मविकास होत असतो. बुद्धमहंमदांनीं जग सुधारण्याकरितां नवी धर्मस्थापना केली. ते स्वतः झटले, झगडले. पण जग सुधारलें का? नाहीं. पण जगाची सुधारणा करतां करतां ते मात्र निर्वाणाला गेले."

"ही आत्मविकासाची तुमची कल्पना अगदीं निर्जीव आहे. मला जर कोणीं विचारलं कीं तूं या दगदगींत कां पडतोस तर मी सांगेन हा माझा एक हौशीचा मामला आहे. ही हौस भागविल्याशिवाय मला राहवत नाहीं म्हणून ही धकाधक मीं चालविली आहे."

"पीडितांच्या कल्याणाकरितां फुलांचा राजमार्ग सोडून कांट्यांची पाऊलवाट चोखाळणारा माणूस एककली ठरेल काय? लौकिक दृष्ट्या सुखाचा संसार करून तुला आपल्या बुद्धीची चमक दाखवायला हवें तेवढं क्षेत्र होतें. पण समाजांतील बहुसंख्याक भागाला उपाशीं ठेवून आपण मिष्टान्न खाणें तुझ्या कोमल नि धीरोदात्त मनाला रुचेना......."

प्रकाश यावर मध्येंच मोठमोठ्यानें हासूं लागला. "कृष्णजी, तुम्ही 'केसरी'च्या फायलींतून गोखल्यांवरचा मृत्युलेख पाठ म्हणतां आहांत असं वाटतं. अहो, गोखल्यांच्या काळीं सुशिक्षित आणि कर्तृत्वशाली माणसांना दोन मार्ग मोकळे होते. सुखानं संसार करावा किंवा देशासाठीं दारिद्र्य पत्करावं. आज दारिद्र्य हा एकच मार्ग मोकळा आहे. नाइलाजानं तोच मार्ग मला पत्करावा लागत आहे. मग उगीच भलतं श्रेय मला कशाला देतां?"

"आत्मस्तुतीबद्दलची तुझी ही अनिच्छा तुझ्या मोठेपणास शोभेशीच आहे. आज ज्या असंख्य सुशिक्षित तरुणांना पराक्रमाचीं किंवा अर्थसंपादनाचीं क्षेत्रें मोकळीं नाहींत अशा किती जणांनीं आपलें जीवित तुझ्यासारखें कष्टापदांच्या स्वाधीन केलं आहे? कोणत्याना कोणत्या तरी मार्गानें जीवनार्थाची भली बुरी सोय लावण्याची खटपटच ते करीत नाहींत काय? बेकारीनें असंतुष्ट असा मोठा वर्ग समाजांत वाढत जातो आणि तोच वर्ग अखेर समाजक्रांति घडवून आणतो, हा यांत्रिक सिद्धांत झाला. पण त्या सिद्धांतावर घासल्यानें कांहीं व्यक्तींतला दैवी अंश हिणकस ठरत नाहीं. तुमचा तो महर्षि मार्क्स कांहीं बेकार मजूर आईबापाच्या पोटीं जन्मास आला नव्हता. वडिलोपार्जित ज्यूचें कनक आणि श्रीमंत घराण्यांतील कांता यांच्यासमवेत तो जन्मभर सुखानें राहिला असता. मग त्यानें क्रांतीचें एवढें

तत्त्वज्ञान फैलावून आपली जीवनयात्रा खडतर कां करून घेतली ? या वृत्तीलाच आम्ही दैवी अंश म्हणतों."

इतक्यांत जिन्यावर पाउलें वाजूं लागलीं.

रात्रीं दहा वाजण्याच्या सुमारास कोण आलें असावें ?

खोलीचें दार उघडलें. शशांक, छाया, सुलभा, चित्रलेखा, व किशोर आंत आले.

प्रकाशचा गोंधळ उडाला.

"या....या" असें म्हणत तो मंडळींना बसण्यास जागा करून देऊं लागला.

छायानें तेवढ्यांत खोली न्याहाळून घेतली. एक लाकडी फळ्यांची कॉट, दोन साध्या खुर्च्या, एक आरामखुर्ची, एक लिहिण्यावाचण्याचें टेबल, आणि एक लहान चहाचें टेबल. सारा सरंजाम एवढाच होता. याच खोलीच्या मागें आणखी एक लहान खोली होती. खोलीच्या भिंतीवरील एक दोन सामान्य कॅलेंडरें आणि मित्राचे दोनचार फोटो सोडले तर दुसरी कसलीच रोषनाई तेथें नव्हती. टेबलावरील पुस्तकांत कायदा, समाजवाद, आणि एकाददुसरी आधुनिक मराठी कादंबरी, इतकेंच.

प्रकाशकडे मंडळी आलेली पाहतांच कृष्णचंद्र उठून आंतल्या खोलींत गेले. मंडळीच्या बसण्याची व्यवस्था करण्याचे नादांत प्रकाशच्या हें लक्षांतहि आलें नाहीं.

"आज यावेळीं सर्वजण कसे काय आलां ?" प्रकाशनें स्मित करून विचारलें. सर्वांचे चेहरे कांहींसे विषण्ण दिसत होते. प्रकाशच्या कांहींच लक्षांत येईना.

"आमच्या मामांची आज संध्याकाळीं तार आली. प्रकृति बिघडल्यामुळें ते मुंबईला जात आहेत अन् छायाला त्यांनीं उद्यांच तिकडे बोलाविलें आहे. उद्यां सकाळच्या मेलनं ती जाईन म्हणते. म्हणून किशोरकडला कार्यक्रम उरकला आणि म्हटलं तुलाहि भेटावं–" शशांकनें सांगितलें.

"अरे रे..." प्रकाश छायाकडे खिन्नपणें पहात म्हणाला, "तुम्हांला फारच लौकर जावं लागतंय्."

यावेळीं चित्रलेखानें छायाकडे पाहिलें. या पुरुषाकडून एवढे स्नेहार्द उद्गार ऐकायला मिळणें म्हणजे केवढें भाग्य तुझें ! असाच अर्थ जणूं चित्रलेखाच्या कटाक्षांत होता.

सर्वजणें स्तब्ध झालीं. तितक्यांत किशोर म्हणाला, "अरे प्रकाश, तसं कांहीं तुला वाटायला नको. मामांची प्रकृति लौकरच सुधारून छायाताई पुनः इकडे येण्या-

चीहि शक्यता आहे. मुंबई म्हणजे कांहीं दिल्लीआग्र्यासारखी लांब नाहीं. शिवाय मुंबई म्हणजे साम्यवादाचें माहेरघर ! तेथें तुझ्याहि सफरी आतां कांहीं कमी होतील असं नाहीं. ”

प्रकाश थोडासा ओशाळला. विषय बदलण्याच्या उद्देशानें तो सुलभाला उद्देशून म्हणाला, “ काय सुलभा, कॉफी घेणार का ? ” एकादी सर्वांना प्रिय होणारी साधी गोष्ट काढायची झाल्यास सुलभासारखीं लहान, भाबडीं आणि चित्ताकर्षक माणसें फार उपयोगीं पडतात.

“ सर्वांचं घे मत. मला नको. ” असें म्हणून तिनें बसलेल्या मंडळीवरून झट-कन् दृष्टी फिरविली.

“ नको, नको, आतां कशाला ? किशोरकडे पोटभर झालं आहे. ” असें बरीच मंडळी म्हणूं लागली. अर्थात् तो बेत तिथेंच थांबला.

मध्येंच प्रकाशला आठवण झाली. “ अरे, खरंच आमच्या एका नवीन विद्वान् मित्रांची तुम्हांला ओळख करून द्यायची राहिली. किशोरनं पाहिलं आहे त्यांना. कृष्णजी—अहो, आंत कां गेलांत ? या ना बाहेर. आपलीच मंडळी आहेत..... ह्यांचा माझा परिचय ३-४ वर्षांपूर्वी कराचीला झाला. पण विशेष गांठीभेटी झाल्या नाहींत. गृहस्थ फार विद्वान्–विशेषतः तत्त्वज्ञान नि संगीत यांत मोठे प्रवीण आहेत. ”

एवढ्यांत कृष्णचंद्र बाहेर आले. प्रकाश आपल्या मित्र-मंडळीचा त्यांना परिचय करून देऊं लागला. इतक्यांत छायाची दृष्टि त्यांच्या चेहऱ्यावर खिळतांच तिनें थोड्या अधीरपणें विचारलें, “ काय मास्तरसाहेब, ओळखलंत का मला ? ”

“ कोण छाया पंडित ! ” कृष्णचंद्र चपापून म्हणाले.

“ होय, तीच मी. आपल्या मात्र चेहऱ्यांत फार बदल झालेला दिसतो. आपण लाहोर सोडून किती दिवस झाले ? मध्यंतरीं कुठें कुठें गेलां होतां ? आपली प्रकृति बरेच दिवस नादुरुस्त होती का ? ”

“ तुम्ही निघालांत त्यानंतर थोडेच दिवसांनीं मीं लाहोर सोडलें. कांहीं दिवस कराचीला होतों. तेथील कॉंग्रेसच्या उत्सवांतच हें रत्न आढळलं. प्रकाशाला पाहिल्या-पासून त्याच्याबद्दल कमालीचा आदर वाटूं लागला. इच्छाशक्तीचा अभाव आणि

अनेक नैसर्गिक दोष यांमुळें माझ्यासारख्या बुद्धिमंताचें ध्येय कल्पनेंतच राहिलं. पण परिचित जगांत मात्र कोणीच आपणापेक्षां मोठा वाटेना. प्रकाशनें माझा अहंकार नाहींसा केला आहे.....आतां प्रकृतीबद्दल विचारशील तर कांहीं विशेष होतं असं नाहीं. पण निराशा आणि हेळसांड यांमुळं खालावलेला दिसत असेन "—

कृष्णचंद्रांची आणि छायेची ओळख निघाली हेंच सर्वांना आश्चर्य वाटत होतें. त्यांतून छायेशीं बोलतांना ते अगदीं आवेगानें बोलूं लागले. आपण नकळत आत्म-निवेदनांत शिरलों, अद्यापि भोंवतालची मंडळी पुरी ओळखीचीहि झाली नाहीं हें लौकरच कृष्णचंद्रांच्या ध्यानांत आलें. त्यांनीं आपलें बोलणें थांबविलें. छायाहि भानावर आली. सर्व मंडळीच्या चेहऱ्यावर दिसणाऱ्या प्रश्नचिन्हाचें निराकरण करण्याचे उद्देशानें ती म्हणाली, "हे कृष्णचंद्र, लाहोरच्या हायस्कूलमध्यें माझे शिक्षक होते. आमचा यांचा फार घरोबा होता....आज बरेच दिवसांनीं यांची गांठ पडत आहे."

अंतःकरणावरचें मोठें ओझें उतरावें म्हणजे जसें समाधान होतें तसें तें कृष्ण-चंद्राच्या मुद्रेवर दिसूं लागलें.

थोडा वेळ गोष्टी होऊन मंडळी उठली.

"आतां मुंबईला केव्हां येणार आहांत?"

छायानें प्रकाशला विचारलें.

"सध्यां मुंबईला तर नाहीं, पण पुढील महिन्यांत नागपुरला जाणार आहें. अर्थात् कल्याणवरून—"

"मग मला अगोदर कळवाल? मी येईन कल्याणला." छायानें आर्जवानें विचारलें.

"हो हो जरूर."

"मास्तरसाहेब–नमस्ते"

"नमस्ते"

छायाला आकस्मिकपणें मुंबईला जावें लागत असल्यानें सर्वांनाच आपापल्या परीनें वाईट वाटत होतें. नदीचा ओघ बदलला म्हणजे तिच्या कांठीं पूर्वी असलेलीं गांवें उध्वस्त होतात. सर्वांच्या गोड संकल्पांचें निधान झालेल्या व्यक्तीचा

जीवनक्रम अचानक बदलला म्हणजे त्या संकल्पांची अशीच वाताहत होत नाहीं काय ? खुद्द छायाची मनःस्थिति तर फार वाईट झाली. वडिलांची प्रकृति कशी असेल या उत्कंठेनें मुंबईकडे मन ओढ घेत होतें. इकडे गाईच्या स्तनांशीं नेऊन वासराला ओढून घ्यावें, त्याप्रमाणें एका नव्या रम्य सृष्टीच्या महाद्वाराजवळ नेऊन दैव तिला मागें खेचीत होतें. त्यांतच कृष्णचंद्राच्या पुनर्दर्शनानें विस्मय व कांहीं अज्ञात भीति यांचें थैमान तिच्या मनांत चालू होतें.

## .७. छायाचें पत्र

छायेच्या अकस्मात् जाण्यानें आलेलें औदासीन्य घालविण्यास सर्वांना-विशेषतः सुलभा व प्रकाश यांना-बरेच कष्ट पडले. सुलभाचें जीवन फुलपांखरासारखें होतें, आणि तिच्या खेळकरपणाचे चित्रविचित्र रंग थोडेसुद्धां पुसटू नयेत म्हणून जो तो काळजी घेई. पण छायेला तिचें जें कौतुक होतें तसें तें कोणालाहि नव्हतें. म्हणूनच छाया गेल्यामुळें सुलभा फार खिन्न झाली. इकडे प्रकाशहि एका विशिष्ट आकर्षणाचा अनुभव पहिल्यानेंच घेत होता. जीवनार्थासाठीं शिकवण्या, लेखन असे कांहीं व्यवसाय त्याला करावे लागत आणि राहिलेला त्याचा सारा वेळ आपल्या पक्षाचें तत्त्वज्ञान प्रसृत करणें, घटना तयार करणें, सभासद मिळविणें, निरनिराळ्या धंद्यांतील मजुरांचे संघ काढण्याची शक्यता अजमावणें, व्याख्यानें देणें इत्यादि कामांत जाई. त्याच्या दैनिक जीवनांत रिकामपणाचे क्षण असे वांट्यास येतच नसत. निसर्गाला पोकळी सहन होत नाहीं त्याप्रमाणें प्रकाशला रिकामपण कसें तें सहनच होत नसे. पण एकाद वेळ मनाला विसांवा मिळालाच तर छायेच्या मनोहर मूर्तीचें तेज हृदयाकाशांत पसरलें आहे असा भास त्याला होई.

* * *

छाया गेल्यानंतर दोन आठवडे लोटले असतील. संध्याकाळीं सुलभा हिंडून परत येत होती. ती कधीं चिंतनांत मग्न होऊन एकांतांत हिंडणारी मुलगी नव्हती. मैत्रिणींशीं हंसत बोलत जावयाचें हा तिचा नेहमींचा क्रम असे. पण आज तिला कोणी मैत्रिणीच भेटल्या नाहींत. थवा सोडून दूर आलेलें पाखरूं, अंधार पडलेला पाहतांच जसें वेगानें पंख मारीत घरट्याकडे जाऊं लागतें, तशी ती बंगल्याकडे जात होती.

इतक्यांत एक मोटर तिच्या जवळून गेली. आणि त्याच वेळीं समोरून येत असलेल्या दुसऱ्या एका मोटरच्या दिव्याचा प्रकाश या मोटरींत पडला.

आणि सुलभाला एक चमत्कारिक दृश्य दिसलें.

शुभ्र पण छानछोकीचा पेहराव करून तोंडें रंगविलेल्या दोन स्त्रिया आणि त्यांच्यामध्यें सदानंद बेहोष होऊन हसत खिदळत बसलेला ! !

सुलभाला कसेंसेंच झालें. जगांतील चांगलेंवाईट कळण्याइतकी ती प्रौढ नव्हती किंवा हुच्चपणाचा तिटकारा यावा इतक्या तिच्या आवडीनिवडी अभिजात नव्हत्या. पण तिच्या पोरमनालादेखील मोटारींतील तो प्रकार मोठासा सभ्य वाटला नाहीं.

त्रस्त मनानें ती पुढें चालूं लागली. एक दोन फर्लांग गेली असेल नसेल तों एका छोट्या पुलावर सदानंद बसलेला तिला आढळला.

"ओहो–सुलभा, तुझीच वाट पहात होतों. आज तूं एकटी कशी ? तुमचा नेहमीं रंगीबेरंगी फुलांचा फुलोरा असायचा. सोनचाफा, बटमोगरा, जुई...."

"पुरे पुरे-मोटरींतल्या रंगेल वातावरणानं काव्य आठवलं वाटतं !"

यावर मनांत कांहींसा चपापून सदानंद मोठ्यानें हसला–"असं असं–आतां गेलेली आमची मोटार पाहिलीस वाटतं; त्या एकदोन होतकरू तारका आहेत. त्यांना मी मुंबईच्या एका फिल्मकंपनींत नेणार आहें."

"तें तुम्ही काय वाटेल तें करा. तुमचं हसणंखिदळणं मात्र मोठंसं सभ्य होतं असं मला नाहीं वाटत."

"सभ्य म्हणजे काय ग ? सभ्य शब्दाची व्याख्या कर पाहूं ?"

"व्याख्या न् बिख्या मला नाहीं करतां येत. पण सभ्य म्हणजे काय नि असभ्य म्हणजे काय तें पाहिल्याबरोबर कळतं."

"नाहींच करतां यायची व्याख्या–तुमच्या शिष्ट आणि धनिक समाजांत जें चांगलं तें सभ्य. आणि बाकीचं असभ्य. असा तुमचा उघड हिशेब असतो. बरं, तुझ्या मतानं मी असभ्यासारखं वागलों तर त्यांत तुला कां वाईट वाटावं ?"

"सदानंद," सुलभा किंचित् आरक्त होऊन बोलूं लागली, "असा निष्ठुरपणा अन् घालवेडेपणा तुम्हांलाच शोभतो."

"समजलों, सुलभा, आपल्या प्रेमाचं माणूस दुसऱ्याबरोबर रंगांत आलेलें पाहून कोणालाहि राग येतो. पण खरं सांगूं ? आमच्या नवमतवादी दृष्टीनें हा सगळा

भ्रमिष्टपणा आहे. माझं घर, माझं शेत, माझी संपत्ति या माझेपणाच्या-या मालकी हक्काच्या भावनेनं माणसांचीं मनं सडलीं आहेत. पुरुष बायकोकडे ही आपल्या मालकीची वस्तु या नात्यानं पाहतो आणि बायको पुरुषाकडे हा आपला पोशिंदा या नात्यानं पाहते. एकदां हा मालकी हक्क समाजानं नाहींसा केला, स्त्रिया स्वतंत्र झाल्या म्हणजे प्रेम, मत्सर, झुरणं, विव्हळणं, प्रेमभंग सारं कांहीं जाईल."

"तें मला कांहीं कळत नाहीं. आपण ज्याच्यावर प्रेम करतों त्यानं दुसरीकडे पाहूं नये एवढंच मी जाणतें."

"वाः सुलभा, तुझा हा भाबडेपणा मोहक नाहीं असं कोण म्हणेल? जाऊं दे. तुझ्याकरितां तूं म्हणशील तसं वागायला मी तयार आहें. अर्थात् आमच्या धंद्यांत असे कांहीं चमत्कारिक प्रसंग येतात. पण कृपा करून गैरसमज करून घेऊं नको. बरं, गेल्या दोन तीन आठवडे तुझी हालहवाल काय आहे?"

"तुम्हांलाच उलट हा प्रश्न मीं विचारतें."

"माझं काय? माझ्याकडे कांहीं माझी एकादी सुरेख चतुर मामेबहीण आली नाहीं किंवा एकादा उत्तर हिंदुस्थान सोडून आलेला दक्षिणी तत्त्वज्ञानी ठाण मांडून बसलेला नाहीं."

"सदानंद, छायाताई किंवा कृष्णचंद्र यांच्याबद्दलचं तुमचं हें बोलणं कांहीं चांगलं नाहीं. मला साफ नाहीं खपायचं."

"बरं बुवा राहूंदे. पण काय ग, तुमची ती छाया इतक्या तांतडीनं परत कां गेली? अन् कृष्णचंद्रानं तुमच्याकडे कां मुक्काम ठोकला आहे?"

"आमचे मामा आजारी पडले म्हणून छायाताईला तातडीनं जावं लागलं. खरंच काय मला वाईट वाटलं? छायाताई गेल्यानंतर दोन दिवस जेवण सुद्धां गेलं नाहीं...मध्यें प्रकाश कुठं शेतकऱ्यांच्या स्थितीची पहाणी करायला म्हणून गेला. तेव्हां शशांकदादानं कृष्णचंद्रांना आमच्याकडे येऊन राहायचा फार आग्रह केला म्हणून ते आले. आबांचं आणि त्यांचं चांगलं जमलंय्."

"काय ग, या कृष्णचंद्राची आणि तुमच्या छायेची कांहीं ओळख होती वाटतं पूर्वींची?"

"हो. ते तिला मास्तर होते लाहोरला. त्यांचा पंडितांशीं फार घरोबा होता."

"मग आपली ही प्रियशिष्या लाहोरहून इकडे आली म्हणून हा तत्त्वज्ञानाचा सिंधुनद पंजाबांतून मुंबई इलाख्यांत घुसला वाटतं ?"

"सदानंद, तुम्ही पुनः लागलांत वाहायला. मला हें साफ खपायचं नाहीं. छायाताई मला देवतेसारखी वाटते. तिच्याबद्दल बोलतांना तोंड संभाळून बोलत जा." सुलभा रागानें लाल झाली होती.

"तसं नव्हे," सदानंद जरा नरमाईनें म्हणाला, "तुमची छाया खरोखरीचीच चांगली असेल. पण हा कृष्णचंद्र कांहीं भला मनुष्य दिसत नाहीं. माझा एक पंजाबमधला मित्र परवां आला तो सांगत होता कीं, ह्या माणसाचा तिकडे कांहीं चांगला लौकिक नाहीं. प्रेमाचीं अनेक लफडीं आहेत याचीं. इतका राष्ट्राभिमान दाखवितो ना पण म्हणे हा हेर होता."

"तुमच्याबद्दलसुद्धां लोक असंच म्हणतील म्हणून त्याच्यावर विश्वास ठेवायचा का ?" सुलभा सहज म्हणून गेली. पण सदानंद तेवढ्यांत सर्द झाला होता!

"पण काय हो, या कृष्णचंद्रांना तुम्हीं पाहिलं तरी आहे का ?" सुलभानें विचारलें.

"हो, हो. परवां आमच्या अभ्यासमंडळांत आला होता तो. मधून मधून सूचक प्रश्न करी. अर्थात् आमच्या शास्त्रशुद्ध विचारसरणीपुढें त्याचा काय पाड लागणार आहे म्हणा !"

"बरं, सदानंद जातें मी. उशीर झाला. गुड् नाईट." असें म्हणून ती निघून गेली. सदानंद ती दृष्टीआड होईपर्यंत तिच्याकडे पहात होता. रस्त्यावरील विद्युद्दीपांखालून जातांना प्रकाशाचा झोत तिच्या अंगावर येई. तिचे डूल आणि पातळाची किनार त्या प्रकाशांत झळकत. पाठीवरील वेणीच्या पेडावर प्रकाशकिरणें चकाकल्यानें वेणीला हिरेच बसविले आहेत कीं काय असें वाटे. सदानंद तें दृश्य पाहण्यांत रमला. सुलभा दृष्टिआड होतांच त्यानें सिगारेट पेटविली आणि तो घराची वाट चालूं लागला.

इकडे सुलभा घरीं येईपर्यंत सदानंदाच्या बोलण्यावर विचार करीत होती. हा सर्वच माणसांबद्दल उपरोधिक बोलतो. मग चांगलें तरी आहे कोण ? जग कीं सदानंद ? अशा घोटाळ्यांत ती नेहमींप्रमाणें सांपडली होती. परंतु कोणी कांहीं

बोललें तरी छायाताईबद्दल शंकेची एक अस्पष्ट छटा देखील तिनें आपल्या मनांत उमटूं दिली नसती.

बंगल्याच्या फाटकांत आबा उभे होते.

" आलं का हें चिमणं पाखरूं परत घरट्यांत ?"

सुलभाच्या पाठीवरून हात फिरवीत ते म्हणाले,

" आज एका माणसाच्या टेबलावर काय खाऊ ठेवलाय् ?"

" काय, काय आबा ?"

" पहा, तूंच तें."

सुलभा धांवतच आपल्या खोलीत गेली.

तिच्या टेबलावर सुंदर हस्ताक्षरांत लिहिलेलें एक पत्र होतें.

छायाचें होतें तें पत्र.

सुलभा आनंदित झाली.

ती अधीरपणें वाचूं लागली.

'चंद्रसदन,' हिंदुकॉलनी
दादर, मुंबई ( १४ ). ता....

" प्रिय सुलभा.

गेल्यापासून तुला एक चिटोरेंहि लिहिलं नाहीं म्हणून तूं रागावली असशील, नाहीं ? पण बाबांच्या प्रकृतीला इतके दिवस आरामच पडेना. मग कसें सुचेल बरें मला पत्रलेखन ? आतां त्यांचं जरा बरें आहे म्हणून ही गोड कामगिरी प्रथम हातीं घेत आहें.

"माझी पुण्याची सफर मोठी चमत्कारिकच झाली. प्रकाश, किशोर, चित्रलेखा अशीं किती चांगलीं माणसं परिचयाचीं झालीं. दोनतीन दिवस आपण खेळलों, बागडलों, गाणीं म्हटलीं, पण एकाएकीं ढग जमून यावेत तसें झालें, आणि त्या ढगांत मध्येंच वीज चमकून कडकडाट व्हावा त्याप्रमाणें कृष्णचंद्राची ओझरती भेट झाली. सर्वच कांहीं अद्भुत !

"सुलभा ! जगांतले आपले संबंध नातेवाईक आणि स्नेही यांत विभागलेले असतात. नातेवाईकांच्या संबंधांत कर्तव्याचा भाग बराच अधिक तर स्नेह्यांत काव्यच फार. तुझ्यासारख्या संबंधांत मात्र मला काव्य, कर्तव्य, सर्व कांहीं एकवटलेलीं

दिसतात. तुझी माझी परवांची भेट कितीतरी वर्षांनीं झाल्यासारखी वाटली. तसें म्हटलें तर मागल्याच वर्षीं तूं आमच्याकडे दोन महिने राहायला आली होतीस नाहीं का ? पण यावेळीं मला फार दिवसांनीं भेटल्यासारखें वाटलें. याला कारण तुझ्यांत एका वर्षांत झालेली विलक्षण वाढ असो कीं विरहाची तीव्रता असो !

"तुला मानपत्र देतें असें समजूं नकोस. पण सुलभा, तूं भारीच मनोवेधक आहेस. चित्रांतले सुंदर रंग, काव्यांतले मधुर रस, आणि संगीतांतले गोड स्वर तुझ्या रूपानें प्रकट होत आहेत असें वाटतें. पण तुझ्या आकर्षकपणाचा विचार मनांत आला कीं मी लगेच थोडी उदासीन होतें. कां कोणास ठाऊक ! बहुधा अशा उत्कृष्ट कृति उत्पन्न करून परमेश्वर त्यांबद्दल बेफिकीर राहतो. माझ्या या आवडत्या रत्नाला नीट पैलू पडून चांगलें कोंदण मिळेल कीं नाहीं ही चिंता मनाला सारखी खिन्न करीत असते.

"सुलभा, तुझें मन चांगलें पण फार भाबडें आहे. चांगलें वाईट कळण्याइतकें अवधान तूं ठेवीत नाहींस. नादिष्टपणांत वाऱ्यावर उडणाऱ्या एखाद्या वाळल्या पानालाच धरायला जाशील आणि पुढें कडा आहे हें भान कदाचित् तुला राहणारहि नाहीं ! ती कल्पना आली म्हणजे भीति वाटते.

"मी तुला भिववीत नाहीं, पण सांगतें कीं तुला जें मनमोकळें करून बोलायचें तें माझ्याशीं बोलत जा. तूं तशी भाग्यशालिनी आहेस. सर्व असेंच चांगलें घडत गेलें तर तुला काय कमी आहे ? तसेंच व्हावें अशी इच्छा.

"किशोर अलीकडे केव्हां आले होते ? नुसतें मोघमांत उत्तर दिलेस तरी चालेल म्हटलें ! बाकी तूं 'कॉम्रेड' आहेस. तूं काय लाजणार आहेस नांव घ्यायला ? उद्यां 'किशा' म्हटलं नाहींस म्हणजे मिळविली. शशांकदादाचा स्टूडियो आणि चित्रकला काय म्हणते आहे ? तो एक कलंदरच आहे. कृष्णचंद्रांचा मुक्काम तुमच्याकडे आहे म्हणे ! आबांसारख्या सनातनी सुधारकाला ही तत्त्वज्ञान्याची जोड बरी मिळाली. चित्रलेखाताईंना मीं फार फार विचारलें आहे म्हणून सांग. प्रकाशना माझे नमस्कार कळीव. ते येत असतील दररोजच नाहीं तुमच्याकडे ? ते नागपुरला केव्हां जाणार आहेत, तुला ठाऊक आहे का ?...ती. आबा व आत्याबाई यांना सा. न.

तुझी आवडती—**छायाताई**

ता. क. माझ्या चिमण्या फुलपाखरा, पत्राचें उत्तर पाठवशील का सविस्तर? नाहीं तर छायाताईचें पत्र आलें आहे या आनंदांतच गर्क होऊन उत्तर धाडायला विसरशील. **छा.**"

सुलभानें तें पत्र कितीदां तरी वाचलें. स्तुतीनें ती पराकाष्ठेची संतुष्ट झाली होती. तिनें तें पत्र मोठ्या दक्षतेनें अगदीं ब्लाऊजच्या खिशांत ठेवून दिलें होतें. त्या रात्रीं तिच्या रम्य मुखमंडळाकडे कोणीं पाहिलें असतें तर त्याला आनंद व स्मित यांचें पुसट मिश्रण तिच्या तोंडावर दिसलें असतें.

## ८. गत गोष्टी

कॉलेज सुरू होऊन एक आठवडा झाला होता. मुंबईवर पर्जन्याची कृपादृष्टि वळली होती. छाया ग्रँटरोड स्टेशनच्या बाहेर आली तोंच घडीभर विसांवा घेऊन ताजातवाना झालेला पाऊस जोरानें पडूं लागला. तिनें तांबड्या रंगाचा ओव्हरकोट अंगांत चढविला आणि छत्रीहि उघडली. पण असल्या कोणत्याहि संरक्षणाला दाद न देणारा समुद्रकांठचा पाऊस तिला चहुंबाजूंनीं भिजवूं लागला.

समुद्रावर आकाशापर्यंत एक झिरझिरीत पडदा सोडावा तसें दिसत होतें. पडद्यामागें लाटांचा खेळ चाललेला; किनाऱ्यावर एक लाट आपटतांच फुटून पांगलेले फेंसाचे तुकडे मागील लाट गोळा करीत येई. पण आपल्या मागावर आणखीहि एक मोठी लाट येत आहे, ही जाणीव होऊनच कीं काय, ते तुकडे पुनः किनाऱ्यावर टाकून ती परत जाई. एकादा कुशल दुकानदार गिऱ्हाइकाला मुग्ध करण्याकरितां, ज्याप्रमाणें कापडांच्या घड्यांच्या घड्या पुढें टाकीत असतो, त्याप्रमाणें क्षितिजापासून लाटा उलगडल्या जात होत्या. एका बाजूला समुद्रांत शिरलेला भूभाग समुद्राचें विशालत्व सूचित करीत होता, तर दूर आकाशांत शिरलेला राजाबाई टॉवर आकाशाच्या अनंतत्वाची कल्पना आणून देत होता.

छाया हा देखावा पाहाण्यांत रमली. दुसरी घंटा झाल्याचेंहि तिच्या लक्षांत आलें नाहीं.

इतक्यांत फ्रेनी इंजिनीअर आणि ललितागौरी त्रिवेदी या तिच्या चेष्टेखोर मैत्रिणी तिला शोधीत आल्या.

" पंडित, आज एकटीच उभी ? "

" बायबलला नाहीं का यायचं ?

“ काय ग, अलीकड तूं मोकळेपणानें वागतांना नाहीं दिसत ती ?”

“ हें पहा फ्रेनी, मी सांगूं त्याचं कारण ? ”

“ सांग ग ललिताबेन ! ”

“ अग, ही उन्हाळ्यांत कुठं गेली होती ? तिकडे लोणावळा पूना या बाजूला. तिकडे एकादा ‘ हायलडर ’ शिलेदार भरला असेल मनांत....”

“ क्वाईट राईट....” फ्रेनी मोठ्यानें हंसत म्हणाली.

यावर छाया प्रेमळपणानें हंसत त्या मैत्रिणींशीं बोलूं लागली, “ हें पहा, तुम्ही फार अलीकडे चहाटळ झालां आहां. मध्यें दोन महिने माझं तुमच्यावर लक्ष नव्हतं त्याचा हा परिणाम. एवढ्या लहान मुलींना कशाला हव्यात ग या गोष्टी ! ”

असें म्हणून त्या दोघांच्या गालावर छायानें चापट्या मारल्या, आणि मग एक-मेकींच्या हातांत हात घालून हंसत हंसत त्या तिघी आपल्या वर्गाकडे गेल्या.

कॉलेज सुटल्यानंतर छाया स्टेशनवर न जातां गिरगांवांत आली. पावसाचा मारा आतां बराच थांबला होता. ती आपल्या एकदोघी मैत्रिणींकडे गेली, तिनें कांहीं जिनसा खरेदी केल्या आणि ट्रॅममधून ती दादरला जायला निघाली. आज ती विचारांत मग्न होती. ट्रॅममध्यें शिरून वरचा मजला गांठणें, तिकीट घेणें या गोष्टी ती अगदीं यांत्रिक पद्धतीनें करीत होती.

भौतिक गतीचा परिणाम मनावरहि होतो म्हणतात. ट्रॅम सुरू झाल्यानंतर छायाच्या मनांत चाललेला विचारांचा गोंधळ निवळूं लागला. भूतकालीन गोष्टी जणूं समोरच्या पडद्यावर पहाव्या तशा तिला स्पष्ट दिसूं लागल्या.

छायाला कृष्णचंद्रांच्या पहिल्या भेटीचा प्रसंग आठवला.—

लाहोरला कांहीं वर्षांपूर्वी संमेलनप्रसंगीं, महाराष्ट्रीय मंडळी एकत्र जमली असतां त्यांत गायक कोण आहे याची चौकशी सुरू झाली. छायेची गाण्याबद्दल प्रसिद्धि होतीच. अर्थात् सर्वांनीं तिलाच प्रथम आग्रह केला. तिनेंहि एक सुरेख चीज गाऊन दाखविली. त्यावेळीं कोपऱ्यांत एक दिसायला साधा, नीटनेटका पोषाख केलेला गृहस्थ बसला होता. ( कृष्णचंद्र त्यावेळीं पोषाखाकडे बरेंच लक्ष पुरवीत. ) एका प्रतिष्ठित माणसानें कृष्णचंद्रांना म्हणण्याचा आग्रह केला. छायाच्या गानमाधुरीनें मुग्ध झालेले कृष्णचंद्र कांहीं केल्या म्हणेनात. पण फारच आग्रह केला गेला तेव्हां त्यांनीं एक गाणें म्हटलें.—

[ चाल–फूल मँगावो ]

**भूमि सुगंधित करके नंदित**
**बादलछाया छाई ॥ धृ० ॥**
**देख हृदयमें विरहि शिखीने**
**कितनी धूम मचाई ॥**

*　　*　　*

हें गाणें आपण तेथच्या तेथेंच रचिलें असें कृष्णचंद्रांनीं नंतर एकेवेळीं छायाला सांगितलें. संमेलनप्रसंगानंतर कृष्णचंद्र हे पंडित मंडळीच्या चांगले परिचयाचे झाले. कृष्णचंद्र तरुण असून मर्यादशील होते. पंडितांच्या घरीं एकंदर वातावरण पूर्ण स्वातंत्र्याचें होतें. तथापि स्वातंत्र्याचा दुरुपयोग हा मनुष्य कधीं करणार नाहीं अशी त्यांच्या चेहऱ्यावरून खात्री होई. म्हणूनच पंडितांच्या घरीं त्यांचा घरोबा वाढत गेला.

कृष्णचंद्र स्वभावानें नादी होते. पाठशाळा आणि वाचनलेखन यांत जाणारा काळ सोडून बाकी बहुतेक वेळ ते पंडितांकडे असत. छायाला नव्या नव्या पुस्तकांची माहिती द्यावी, नवीं जुनीं गाणीं दाखवावीं, चर्चा करावी असें चाले. छाया यौवनाच्या देहलीपर्यंत पोंचली होती, आणि तिच्या वयाच्या मानानें तिचा बौद्धिक विकास फारच झाला होता, त्यामुळें कृष्णचंद्रांसारख्या रसज्ञ व बुद्धिमान् माणसाचा सहवास तिला प्रिय वाटावा यांत नवल नाहीं.

परंतु या पलीकडेहि कांहीं सूक्ष्म धागेदोरे होते. छायाला कृष्णचंद्र प्रिय वाटले, ते त्यांच्या तत्त्वज्ञानाकरितां अथवा संगीताकरितां नव्हे. एवढा बुद्धिमान् माणूस आपला पूजक झाला यांत तिला आपल्या यौवनाचा, सौंदर्याचा आणि रसिकतेचा खरा गौरव झाल्यासारखा वाटे. तिच्या हृदयमंदिराच्या दाराशीं भक्तगणांचे थवे उभे होते, पण त्या मंदिराचा सभामंडप एकट्या कृष्णचंद्रांनीं गांठला. दुर्दैवानें या आनंदाच्या भरांत कृष्णचंद्रांना छायाच्या मनोभावनेंतले इतर बारकावे दिसले नाहींत ! आपल्या बुद्धिगुणाबद्दल छायाला वाटणारा आदर हाच त्या श्यामलेचा प्रणय होय असें त्यांच्या मनानें घेतलें. आणि आपल्या प्रेमदेवतेची उपासना ते निष्ठेनें करूं लागले.

–आणि आज छायाला त्या सर्व गोष्टींतलें रहस्य पूर्ण प्रतीत होत होतें ! प्रकाशला पाहिल्यानंतर आणि मनानें त्याला आत्मसमर्पण केल्यानंतर, एका काळीं कृष्ण-चंद्रांबद्दल वाटणाऱ्या तिच्या गाढ आदराचें खरें स्वरूप तिला कळून आलें. एके दिवशीं कृष्णचंद्र आरामखुर्चीवर बसले असतां आपण फोटोचें आल्बम दाखवीत होतों. आल्बम त्यांच्या मांडीवर होतें, आणि मध्येंच झोक जाऊन आपल्या हातांचीं दोनहि कोपरें कृष्णचंद्रांच्या मांडीवर टेकलीं गेलीं. त्यावेळीं झालेला कृष्ण-चंद्रांचा गोरामोरा चेहरा आणि आपल्या मनांत चाललेली प्रचंड खळबळ छायाला आठवली. तसेंच एकदा वाऱ्यानें खिडकीचें दार जोरानें आंत आलें तेव्हां आपण मागें सरलों. तों मागें येऊन उभें असलेल्या कृष्णचंद्रांचा सर्वांगस्पर्श झाला याचें स्मरण होऊन छायाला कसेंसेंच वाटलें. एकवेळ रात्रीं आपण कृष्णचंद्रांशेजारीं वाचीत असतां विजेचे दिवे गेले त्या प्रसंगींचा मनांतील गोंधळहि तिला स्मरला.

शाळेच्या एका विवाद सभेंत भाग घेण्यासाठीं आपण निघालों असतां, कृष्णचंद्र मध्येंच आले आणि म्हणाले, " छाया, तूं आज जाऊं नको. आपण बोलत बसूं." पण तें न जुमानतां आपण जाऊं लागलों आणि भावनाप्रधान होऊन कृष्णचंद्रांनीं आपला हात धरला. ह्या अखेरच्या प्रसंगाची स्मृति होऊन छाया खिन्न झाली. त्या वेळीं कृष्णचंद्रांनीं केलेला आपल्या प्रीतीचा आविष्कार छायाला त्रस्त करीत होता. " माझ्यापेक्षां तुला चार लोकांत आपल्या सौंदर्याचं आणि बुद्धीचं प्रदर्शन करणं जास्त प्रिय वाटतं " असें त्यांनीं म्हणतांच, आपण कृष्णचंद्रांना जीं कटु वचनें बोललों तीं छायाला अजूनहि योग्य वाटत होतीं. पण आपल्या वाग्बाणांनीं त्यांच्या मनावर कसा भयंकर परिणाम झाला त्याची जाणीव छायाला होऊन तिला वाईट वाटलें; विशेषतः आपण सोडल्यानंतर कृष्णचंद्रांच्या मत्सरग्रस्त हितशत्रूंनीं त्यांचा कसा छळ केला हें आठवून ती फारच उदासीन झाली.

* * *

छायाला आजच हें सर्व आठवण्याचें कारण, सकाळींच तिनें नागपूर येथें युवक पुढाऱ्यांची परिषद या आठवड्यांत भरणार आहे असें वाचलें होतें. तेव्हां आतां प्रकाश तिकडे जाण्यास निघेल आणि कल्याणस्टेशनवर आपण त्याला भेटायला जाऊं या गोड कल्पनेंत ती होती. तथापि कृष्णचंद्र प्रकाशच्या संगतींत आहेत, तेव्हां त्यांनीं आपल्याबद्दल काय काय सांगितलें असेल नकळे असाहि संशय तिला आला. आणि

म्हणूनच मधुर कल्पनेच्या संवादी सुरांत मधूनच या संशयाचा विसंवादी नाद उमटत होता.

या कल्पनाकल्लोळांत सांपडल्यामुळें, भायखळ्याचा पूल ओलांडून ट्रॅमनें परळच्या कामगारसृष्टींत केव्हां प्रवेश केला हें तिला कळलेंहि नाहीं. पूर्वी येथून ती कितीवेळ तरी गेली असेल, पण पुण्याहून आल्यापासून हीच सृष्टि तिला जवळची वाटूं लागली होती. 'जेथें मजूर राबतो आहे, तेथें उन्हांत तापत तुझा देव कष्ट करीत आहे.' या आशयाचें 'गीतांजलीं'तलें गीत छायाला अगदीं नव्या अर्थानें मोहक वाटूं लागलें होतें. हृदयाच्या व्यापारांत बिघाड झाला म्हणजे सर्व शरीर अस्वस्थ होतें, त्याप्रमाणें यांत्रिक सुधारणेचें हें हृदय ( हें कामगारांचें जग ) जायबंदी झालें आहे, हें सुधारल्याशिवाय एकंदर संस्कृतीला लागलेला रक्तक्षय कसा थांबणार? असा विचार करीत छाया आर्त अंतःकरणानें बाहेर पाहत होती. आपल्या हृदयनाथाचें हें गोकुळ! त्याला नव्या तत्त्वाचा खरा साक्षात्कार येथेंच झाला! सहानुकंप आणि प्रणय अशा मिश्र भावनांनीं, एका काळीं उपेक्षणीय वाटणारें तें परेळचें जग तिला आतां आकर्षक वाटूं लागलें होतें.

दादरला उतरून ती आपल्या निवासांत त्वरेनें आली. कदाचित् आज आपणाला कांहींतरी पत्र यावें अशी तिची अटकळ होती.

—आणि ती खरीहि ठरली.

कारण घरीं येतांच बाबांनीं तिला एक पत्र दिलें. पत्रावरील सुंदर व झपाटेबाज हस्ताक्षर तिच्या परिचयाचें नव्हतें. अर्थात् तें प्रकाशाचें पत्र होतें. कापऱ्या हातांनीं छायानें तें पत्र फोडलें. त्या फक्त ५–६ ओळी होत्या.

आनंदभुवन, पुणें.

स. न. वि.

मी परवां ( रविवार ) दुपारच्या गाडीनें नागपुरास आमच्या परिषदेकरितां जात आहें. मी साडेचारला कल्याणला पोहचेन. नागपूरची गाडी रात्रीं आठला आहे. आपण भेटलांत तर अर्थातच आनंद होईल.

आपले वडिलांची प्रकृति कशी आहे? त्यांना माझे नमस्कार.

आपला

**प्रकाश**

पहिल्या प्रथम छायाला पत्र तोकडें वाटलें. पण कामाच्या गडबडींत जास्त लिहायला कुठून वेळ मिळणार? असें तिनें मनाचें समाधान करून घेतलें. ती सरळ लेखनपद्धति, तें गोल व झपाटेबाज हस्ताक्षर सारेंच तिला आल्हादकारक वाटत होतें.

त्या एवढ्याशा पत्रानें तिच्यांत एवढी चलबिचल झाली कीं तिचीं अकारण हसणीं, विलक्षण उत्साह, प्रफुल्ल संभाषणें, बाबांच्या लक्षांत आल्याखेरीज राहिलीं नाहींत.

## .९. आत्मनिवेदन

कोणतेंहि काम नेहमींच टापटीपीनें व दक्षतेनें करणारी छाया सकाळपासून सारखी घोटाळ्यांत पडत होती. कल्याणला जाण्यासाठीं दुपारीं ३–१५ ची लोकल गांठायला ती धांवत स्टेशनवर आली, तों तिला कळून आलें कीं, आज रविवार असल्यानें ती लोकल सुटणार नाहीं. आतां मागून गाडी दीड तासानें! म्हणजे पुण्याची मंडळी तेथें उतरल्यानंतर दोन तासांनीं आपण कल्याणला पोंचणार! प्रकाश गाडींतून उतरतांच उत्कठेनें चोंहीकडे दृष्टि टाकील आणि आपण नाहीं असें पाहून निराश होईल अशी कल्पना येऊन ती अतिशय खिन्न झाली. तिला स्वतःच्या बेसावधपणाचा राग आला. इतकी शांत मनाची ती, पण तिला अगदीं रडूं यायच्या बेतांत होतें.

पण अडचणीप्रमाणें सुसंधीलाहि केव्हां केव्हां अकल्पितपणें प्रकट होण्याची वेळ येते. आज तसेंच झालें. छाया त्रस्त होऊन लोकलच्या प्लॅटफॉर्मवर हिंडत असतांना, समोर पुण्याकडे जाणारी एक्स्प्रेस येऊन उभी राहिली. छायानें तडक ही संधि साधून ती गाडी पकडली.

कल्याणला तिला फार वेळ तिष्ठत राहावें लागलें नाहीं. आणि तरीदेखील तो थोडा वेळ तिला अगदीं कंटाळवाणा वाटूं लागला. पावसाळ्यांत खंडाळ्याचे घाटांत नादुरुस्ती होऊन गाडीला यायला उशीर तर नाहीं ना होणार, अशीहि थोडी बायकी भीति तिला वाटल्यावांचून राहिली नाहीं.

प्लॅटफॉर्मवर कांहीं स्थानिक राष्ट्रीयसभावाले, कामगार पुढारी, एकदोघे वकील आले होते. पुण्याहून येणाऱ्या समाजसत्तावादी पुढाऱ्यांच्या स्वागताकरितांच तेहि आले असावे हें उघड होतें.

साडेचाराच्या ठोक्याला गाडी स्टेशनांत शिरली. प्रकाश दारांतच उभा होता.

छायाला पाहतांच त्यानें हंसून हात वर केला. मागें शांतपणें सिगारेट ओढीत उभा असलेला किशोरहि छायाला दिसला.

गाडी थांबतांच प्रकाश, किशोर प्रथम खालीं उतरले. "तुम्ही आलांत, चांगलं झालं" एवढेंच छायाशीं बोलून प्रकाश तेथें जमलेल्या कामगार व कॉंग्रेस पुढाऱ्यांत मिसळला. किशोरनें हमालाकडून सामान उतरवून घेतलें, आणि तो एका बाजूला जाऊन छायाशीं संभाषण करूं लागला.

प्रकाशबरोबर आणखीहि कित्येक युवक आले होते. किशोर दुरूनच छायाला त्यांची माहिती करून देत होता.

"तो पहा छायाताई, किंचित् कलून बसविलेली गांधी टोपी, जवाहर जाकीट, तरतरीत नाक, गोरापान वर्ण असलेला, महाराष्ट्रांतल्या पिढीजाद श्रीमंत घराण्यापैकीं आहे. मोहक शिष्टाचार आणि इंग्रजी–हिंदी–मिश्रित सुंदर संभाषणें यांत त्याचा हातखंडा. आकर्षकपणाच्या अवगुंठनांत दडलेला याचा मुत्सद्दीपणा भल्या चतुरांना दिसून यायचा नाहीं....तो दुसरा पुण्याचा तरुण वकील. मोठा हुशार नि चतुर आहे. पण देशभक्तींत रोमँटिक व्हायचा यत्न मोठा. पंजाबी चढाव, नेहरू शर्ट, मराठेशाही मांडचोळणा–साऱ्या संस्कृतींचं हें 'पोषाकी' प्रदर्शनच आहे चालतं बोलतं....तो तिसरा. दिसायला अगदीं साधा व दुर्बळ दिसेल. पण बुद्धीला त्याच्या नाकाइतकंच तीक्ष्ण टोंक आहे.....

"बाई बाई, किशोर, तुमच्या तिखट आणि मर्मभेदक भाषणाची कीर्ति ऐकत होतें ती खरीच आहे म्हणायची. एवढ्या घाईघाईत एकाद्या कादंबरीकारासारखं यांचं बारीक अन् भेदक वर्णन करीत आहांत."

"छे, छे, भेदक वर्णन नाहीं हें, हे सर्व माझे अगदीं बालमित्र आहेत. पण त्यांच्या माझ्या विरोधी प्रेमाला मधून मधून नेहमीं भरती येते."

आणखीहि कांहीं माहिती किशोर छायाला सांगत होता. इतक्यांत प्रकाश परत आला आणि छायाकडे पहात म्हणाला, "येथली मंडळी गांवांत चलायचं म्हणताहेत. त्यांनीं एक सभा बोलावली आहे वाटतं. किशोर, यांना चलायला मला वाटतं कांहीं हरकत नसावी."

"प्रकाश एवढ्या साध्या अर्जाकरितां देखील माझ्यासारखा वकील द्यावा लागतो आहे ना तुला! अरे, स्पष्ट म्हण त्यांना कीं, अहो छायाताई, आमच्याबरोबर गांवांत

चला. तुझा सरळपणा पुष्कळदा अगदीं आडदांडपणाच्या वळणावर जातो, अन् याच वेळीं तूं इतका नम्र कसा ?"

प्रकाश व छाया दोघेंहि हंसूं लागलीं.

गांवांत एका प्रतिष्ठित वकिलांकडे ही पाहुणेमंडळी उतरली. चहाउपाहार झाला. किशोरच्या भाषणांच्या फैरी मधून मधून झडत होत्या. छायाला तो संच एकंदर अपूर्वच वाटला. आजपर्यंत पुरुषमंडळीच्या बोलण्याचालण्यांत तिनें भाग घेतला नव्हता असें नाहीं, पण या ठिकाणचें वातावरण तिनें पूर्वी कोठेंहि अनुभविलेलें नव्हतें. किशोरनें तिची ओळख सर्वांना इतक्या मजेदार पद्धतीनें करून दिली कीं थोड्याच अवकाशांत छायाचा परकेपणा पुष्कळच कमी झाला. तथापि तेथें चाललेलीं तात्त्विक, मोकळेपणाचीं, व परंपराविध्वंसक बोलणीं ऐकून ती कांहींशी गोंधळली होती एवढें मात्र खरें.

प्रकाशला बोलायला वेळच नव्हता. स्थानिक कामगार मुलाखतीकरितां आले होते. त्यांच्यांत तो मिसळला आणि त्यांचीं गाऱ्हाणीं समजून घेणें व त्यांवर उपाययोजना सांगणें यांत गढून गेला.

पावसाचा संभव असूनहि कल्याणकर पुढाऱ्यांनीं सभा बोलाविली होती. सभेला बरेच कामगार, कांहीं विद्यार्थी, थोडेसे कॉंग्रेसवाले असे लोक जमले होते. अध्यक्षस्थानीं असलेले गृहस्थ त्या प्रांतांत विख्यात होते. पण सरकारपासून क्रांतिकारकापर्यंत कोणत्याहि पक्षानें त्यांच्यावर थोडा विश्वास टाकावा किंवा त्यांना कांहींसें विरोधी समजावें इतकें त्यांचें सार्वजनिक जीवन सर्वव्यापी होतें.

पाहुण्यांची ओळख करून देतांना अध्यक्षांनीं केलेलें भाषण त्यांच्या कीर्तीला साजेसेंच होतें. "बंधूंनो, आज नागपूरच्या परिषदेकरितां जात असतां हे समाजवादी पुढारी येथें आले आहेत. श्रीयुत प्रकाश हे महाराष्ट्रीय युवकांतले 'जवाहर' आहेत. त्यांचा माझा तत्त्वाचे बाबतींत बराच मतभेद असला आणि समाजवादानें जगाचें कल्याण होईल कीं नाहीं याबद्दल आज मी पूर्ण साशंक असलों तरी प्रकाश यांच्या बुद्धि, धैर्य, स्वार्थत्याग वगैरे गुणांबद्दल मला आदर आहे." प्रामाणिक मतभेदाचा इषारा देत इतरहि तरुण पुढाऱ्यांचीं गुणवर्णनें अध्यक्षांनीं केलीं.

पाहुण्यातर्फे प्रकाशचें भाषण पहिल्यानें झालें. प्रथम विनयाचा डोलारा उभारून त्यांत आपली स्तुति सुरक्षित ठेवावयाची असला ढोंगीपणा न करतां त्यानें एकदम

विषयालाच हात घातला. शेतकऱ्यांचें वाढतें दैन्य व कामगारांतली वाढती बेकारी, गुन्ह्यांची फुगत जाणारी संख्या, जातिजातींतली अधिकाधिक प्रखर होत चाललेली द्वेषबुद्धि यांचें यथार्थ चित्र साध्या व सावेश भाषेंत त्यानें रेखाटिलें. "या सर्व रोगांचें मूळ आर्थिक विषमतेंत आहे. ही विषमता दूर करण्याचे मूलगामी उपाय योजले पाहिजेत. नुसत्या कागदी घटनांनीं हे प्रश्न सुटणार नाहींत." असें सांगून अखेर हे प्रश्न सोडविण्यास आपला पक्ष कोणता कार्यक्रम आंखीत आहे याचें थोडक्यांत निवेदन करून तो टाळ्यांच्या गजरांत खालीं बसला.

छायानें प्रकाशचें भाषण कधींच ऐकलें नव्हतें. भाषण चालू असतां त्यांतले शब्द किंवा विचार ग्रहण करण्याचें भान तिला थोडेंच होतें! प्रकाशचा आवेश, त्याचा क्षणोक्षणीं लाल होत जाणारा चेहरा आणि उंचावत जाणारा आवाज, त्याच्या भाषणांतल्या तळमळीनें अधिकाधिक सुंदर दिसूं लागणारें मुखमंडल यांचें निरीक्षण करण्यांत छाया दंग होती. प्रकाशचें भाषण चालू असतां एकाद दुसऱ्या जहाल वाक्यानें जनसमूह प्रक्षुब्ध होत होता. भाषण संपतांच ती जवळच बसलेल्या किशोरला सद्गदित होऊन म्हणाली, "असेंच बोलतात का हो हे नेहमीं?"

"अगदीं असेंच. आज पण त्यानें एकदोन वाक्यें बोलायला नको होतीं. असो म्हणा." किशोर थोड्या सचिंत मुद्रेनें म्हणाला. छायाला भीतीमुळें कसेंसेंच झालें.

एकदोन समाजवाद्यांचीं भाषणें झाल्यानंतर अध्यक्षांनीं समारोप केला. समारोपांतल्या परस्परविरोधी विधानांची वजाबाकी केली असती तर बहुधा शून्यच उत्तर आलें असतें. एकदम तत्त्व कबूल करावयाचें; लगेच एकादी मार्मिक शंका प्रदर्शित करावयाची, आपलें ठाम मत कशावरच द्यायचें नाहीं, आणि श्रोतृवर्गामध्यें आपण विचारप्रवर्तक भाषण करीत आहोंत असा भास उत्पन्न करावयाचा असें अध्यक्षीय भाषणाचें स्वरूप होतें!

रात्रीं जेवण करून मंडळी स्टेशनवर आली. स्थानिक पुढाऱ्यांनीं छायाला निरोप देतांना कल्याणला व्याख्यानाकरितां यायचा आग्रह केला. त्यावर हंसत हंसत छाया म्हणाली, "मी अद्यापि पुढारीण झालें नाहीं. झालें म्हणजे पहिल्यानें कल्याणलाच माझें 'मेडन स्पीच्' करीन." किशोरनें लगेच एकीकडे म्हटलें, "पुढारीण होण्याचा प्रसंग तुमच्यावर वर्षाच्या आंत बाहेर येईल. पण त्यानंतरच्या तुमच्या भाषणाला

‘ मेडन स्पीच् ’ कोण म्हणणार ? तें कौमार्य-भाषण नसून सौभाग्य भाषण ठरेल.”

छाया आणि प्रकाश या दोघांनाहि लाजल्यासारखें झालें.

गाडीला अर्धातास अवकाश होता. किशोर, छाया आणि प्रकाश फिरत फिरत प्लॅटफॉर्मच्या अगदीं एका टोकाला गेले. किशोरनें चतुराईनें सिगारेट आणायला जायचा बहाणा केला आणि त्या दोघांना अवश्य तो एकांत मिळवून दिला. हा प्रसंग दोघांनाहि नवीन होता.

प्रकाशच्या एकदोन गांठी या पूर्वी पडल्या होत्या. तेवढ्या दर्शनानें मुग्ध झालेली छाया आपल्या हृदयेश्वराची स्मरणभक्तीच तेवढी करीत होती. त्याच्या मित्रांनीं त्याच्या चरित्राचें केलेलं वर्णन श्रवण करून त्या प्रकाशांत आपल्या मनोमन मूर्तीचें ध्यान ती आजवर करीत होती. त्याची श्रेष्ठता खरीखुरी कळावी, भक्तीला ज्ञानाची जोड मिळावी म्हणून तिनें नव्या तत्त्वज्ञानाचीदेखील थोडीबहुत ओळख करून घेण्याचा प्रयत्न केला होता. पण आज त्या जीवितेश्वराची गांठ पडून आत्मनिवेद-नाची वेळ येतांच तिची उत्कटता बधीर झाली, तिच्या धिटाईला कंप सुटला, आणि नाना शंकाकुशंकांच्या कुंपणांत अडकलेले शब्द ओठांबाहेर येईनात.

अखेर तिनें धीर करून निःशब्दतेचा भंग केला.

“ जातांना येणार आहांत मुंबईला ?”

“ नाहीं. मला नाशिकला उतरायचं आहे. तेथून आम्ही मोटारनेंच पुण्याला जाऊं.”

“ मग केव्हांतरी मुद्दाम आमच्याकडे याना ?”

“ छायाताई, तुम्हांला जरा स्पष्ट सांगूं का ?”

“ म्हणजे काय ? तुम्ही जें बोलाल तें ऐकायला मी अधीरच आहें.”

“ माझ्या स्नेहाचे धागे विणूं लागण्यापूर्वी कोणींहि प्रथम विचार करावा असा माझा इषारा असतो.”

“ मी नाहीं याचा अर्थ समजलें !”

“ माझं जीवन असें आहे कीं त्यांत सुख आणि सुरक्षितपणा यांना अवसर आहेसें दिसत नाहीं. माणसांची–त्यांतून स्त्रियांची ओढ–साधारणपणं नेहमीं सुखाकडे असते. युद्धाच्या वार्ता रम्य असतात, पण ‘ रात्रंदिवस आम्हां युद्धाचा प्रसंग ’ अशा जीवनांत प्रत्यक्ष भाग घेणें हें फार कठीण असतं. मी माझा मोठेपणा म्हणून सांगत

नाहीं. हें असलें जीवन मीं मुद्दाम पत्करलं आहे. यांत इतरांनीं गुरफटून पस्तावावं असं मला वाटत नाहीं."

"समरस होतां आलं नाहीं म्हणून स्नेहाला कां बाध यावा?" छायानें थोडा डावपेचाचा प्रश्न केला.

"हें पहा छायाताई, ही मनाची फसवणूक करून घेण्यांत कांहीं अर्थ नाहीं." प्रकाश कांहींसा उसळून म्हणाला, "तुम्ही तरुण, सुंदर, अन् हुशार आहांत. माझ्याहि वांट्याला दैवयोगानं कांहीं गुण आले आहेत. आपली मैत्री टिकून राहिली तर अमुकच स्वरूपाची आणि अमुकच मर्यादेपर्यंत राहील असं मला वाटत नाहीं. निदान माझ्यापुरती तरी मी ग्वाही देऊं शकत नाहीं."

या थोड्या सडेतोड भाषणानें छाया जरा विरमली. तिला दुःख झालें, पण प्रकाशच्या या सरळपणानें त्या दुःखांत आनंदयुक्त समाधानाचें मिश्रणहि झालें होतें. पण ती थोड्या बायकी त्राग्यानें म्हणाली—

"मग तुम्हांला असं वाटतं असं मी समजूं काय कीं, तुमच्या जीवनाच्या चौकटींत बसायची लायकी माझ्या अंगीं नाहीं?"

"छायाताई, तुम्ही मला विलक्षण घोटाळ्यांत पाडीत आहांत. मीं लायकीचा प्रश्न काढला का? तुमच्या सान्निध्यांत मला संकोच वाटतो इतके तुमचे गुण मोठे आहेत. माझ्या सदैव क्षुब्ध असलेल्या मनाला स्त्रीप्रेमाची अत्यंत जरूरी आहे. आणि माझ्या मनावर नियंत्रण चालवील अशी तरुण स्त्री तुमच्याखेरीज मला कोणीहि आढळलेली नाहीं. पण प्रणय भावनाप्रधान असतो, बुद्धि कठोर असते. तिला पुढचं सर्व आकलन करतां येतं. आज माझ्या जीवनांत तुम्हांला अद्भुतपणा आणि काव्य दिसत आहे, पण उद्यां प्रत्यक्ष भाग घेण्याचा प्रसंग आला म्हणजे त्यांतला प्रखरपणा कळून येईल. वणव्याचा प्रकाश काळोखांत दहाबारा मैलांवरून मोहक दिसतो, पण जसजसं जवळ जाऊं लागावं तसतसा त्याचा दाहकपणा प्रत्ययाला येतो."

"प्रकाश, आज मी मोकळं मन करून बोलतेंच. तुम्हांला माझं मुळींच आकर्षण वाटलं नसतं, तर झाल्या एवढ्या भेटीगांठीची गोड आठवण ठेवून मी स्वस्थ बसलें असतें. पण तुम्हांला मी अनुरूप सहचारिणी वाटतें. तुम्हीच कबूल करतां हें. मग मी स्वस्थ कशी बसूं? प्रेमी माणूस इतकें वेडसर आशावादी असतें कीं, निराशेच्या

बंद दारांवर सदैव डोकें आपटून, केव्हांतरी ध्येयसिद्धि होईल अशी समजूत तें उराशीं बाळगून असतं. आणि मला तर तुम्ही केवढी आशा दाखवीत आहां. मी म्हणतें तुम्ही एवढे साहसी आहांत, निधड्या छातीचे आहांत. माझ्यासारख्या प्रेमिक जीवाला पावन करून घेण्याचं साहस तुम्हीं कां करूं नये ? मोठमोठ्या गोष्टी नुसत्या अंतःस्फूर्तीच्या आवेशानं करणारे प्रकाश, याच बाबतींत व्यवहारी दक्षता पाळण्याची कां शिकस्त करतात ?"

"कारण यांत निराशा झाली तर कांहीं काळ तरी मी निष्क्रिय होईन ही भीति मनाला सारखी वाटते. माझ्या ध्येयमार्गांत अडचणी आल्या, अपयशं आलीं, तरी आपण पुढें जात आहोंत या एका विचारानं हुरूप नाहींसा होत नाहीं. प्रेमाचं तसं नाहीं. आमच्या तत्त्वज्ञानाप्रमाणं प्रेम म्हणजे एकादी दिव्य गोष्ट नाहीं; जीवशास्त्र आणि संस्कार यांवर पोसलेली ती एक भावना इतकेंच. पण हें जरी खरं असलें तरी प्रेमभंगाचा परिणाम माझ्या कार्यावर होईल ह्याची धास्ती आहे. आणि कार्य-नाश होईल अशा कोणत्याहि गोष्टींत बेदरकारपणें उडी घ्यायला मी तयार नाहीं."

"तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं मी ऐनवेळीं तुमच्या प्रखर जीवनांत दगा देईन असं मला वाटत नाहीं. पण ही खात्री तुम्हांला कशी पटवायची ! ती जर मला केव्हां-काळीं पटवितां आली तर मग प्रेमाची सांगता होईल असं मानायला तुमची हरकत नाहीं ना ?"

"छाया" प्रकाश गहिवरून म्हणाला, "माझे इषाऱ्याचे शब्द ऐकून मला कठोर ठरवूं नकोस. मला मनांतल्या भावना लपवितां येत नाहींत म्हणून कठोर शब्दांत सारं मीं उघडपणं सांगितलं. पण त्या कठोर शब्दाच्या मागचं माझं हृदय तुला उमगेल असं वाटतं."

"हो तर. मी इतकी शहाणी आहें." हृदयांतली धडधड थांबत असतां प्रेमपूर्ण कटाक्ष टाकून छाया म्हणाली. यावेळीं तिच्या ओंठावर हास्य चमकत होतें.

याच सुमारास गाडी येणार अशी इषाऱ्याची घंटा झाली. छाया व प्रकाश मंडळीकडे परतले. किशोर त्यांना मध्येंच येऊन मिळाला.

सामानसुमानाची जुळवाजुळव होत आहे तों गाडी आलीच–त्या गाडींत मुंबईहून कांहीं पारशी खोजे 'भाई' आलेच होते. त्यांनीं अगोदर जागा करून ठेविली होती, तिकडे सामानासह सर्व मंडळी गेली.

सर्व मंडळींनीं छाया व किशोर यांचा निरोप घेतला. गाडी सुटण्यापूर्वी प्रकाश किशोरला म्हणाला, "छायाला नीट नेऊन पोचीव बरं का?"

"शाबास, बहुवचन जाऊन दहापंधरा मिनिटांत एकेरीवर आलास कीं! बरं, त्यांना मी थेटपर्यंत सोबत करीन. काळजी नको तुला."

इतक्यांत गाडी निघाली. छाया आर्त दृष्टीनें गाडी अंधारांत नाहींशी होईपर्यंत पहात होती.

## .१०. मेधाविनी

पहिलें उत्कट संभाषण आणि नंतर प्रकाशचें प्रयाण या दोनहि गोष्टींचा छायाच्या मनावर झालेला परिणाम तिच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसत होता. प्रकाशनें कोणताहि आडपडदा न ठेवतां आपल्या खऱ्या भावनांची ओळख छायाला करून दिली आणि छायानेंहि जें सांगावयाचें तें सर्व सांगितलें होतें. परंतु अगदीं ओझरतीच अशी एक शंका छायाला वारंवार येई. कृष्णचंद्रांनीं आपला सारा इतिहास प्रकाशला सांगितला असेल काय ? तो तसा सांगितला असल्यास त्यांनीं आपलीच बाजू कौशल्यानें मांडली असेल. आणि प्रथम मोह पाडणारी आणि नंतर दगा देणारी ही कोणीतरी ' नियमविघ्नकारिणी ' प्रमदा आहे असा त्यांनीं प्रकाशचा समज करून दिला असेल ! नाहींतर प्रकाशचा साहसी स्वभाव लक्षांत घेतां त्यांनीं प्रेमाच्या बाबतींत इतकें दक्ष रहावें हें कसें होईल ?

पण एका गोष्टीच्या विचारानें हें संशयाचें धुकें दूर जाई. प्रकाशनें आपल्याबद्दलचा प्रणय स्पष्ट शब्दांत व्यक्त केला, अखेर औपचारिकपणा सोडून ते एकवचनी संबोधनापर्यंत आले हें छायाला विशेष वाटत होतें.

याच सुमारास मुंबईची लोकल आली. अर्धा तासानें हीच परत मुंबईला जाणार होती. इतका वेळ थांबलेला पाऊस जोरजोरानें पडूं लागला. छाया आणि किशोर यांनीं लोकलचा डबा गांठला. पावसाचा मारा चहूंबाजूंनीं होऊं लागला म्हणून किशोरनें दारें खिडक्या बंद करून डब्याची अगदीं बंद पेटी करून टाकिली, आणि नंतर छायाच्या समोरच्या बाकावर तो येऊन बसला.

"तुम्ही आतां आमच्याकडेच चला."

"पण तुम्ही काय सांगणार आपल्या वडिलांना ? ऐनवेळीं अगाऊ सूचना न देतां असा पाहुणा नेणं बरं नाहीं."

"नाहीं. घरांत तशी गैरसोय होणार नाहीं. प्रकाश इतक्या मंडळी बरोबर आहेत हें मला पत्रावरून कळलं नाहीं. म्हणून मीं बाबांना सांगितलं होतं कीं, त्यांना एक दिवस आपल्याइकडे यायचा आग्रह करीन. तेव्हां मी कोणातरी पाहुण्यास घेऊन येणार आहें अशा अटकळींत घरची मंडळी असतीलच."

"वाः वाः, नगाला नग पाहिजे म्हणून प्रकाशऐवजीं किशोरला घेऊन जाणार वाटतं तुम्ही. तुमचे बाबा म्हणतील हिंदुस्थानला शोधायला निघालीस आणि हें अमेरिकाखंड मध्यें सांपडलेलं दिसतंय्."

छाया यावर मनापासून हसली.

"हें पहा किशोर, तुम्ही नीट सांगा आमच्याकडे येणार कीं नाहीं तें !"

"यायला काय हरकत आहे ? तुम्हांला शेवटपर्यंत पोचवीन असं मीं वचनच दिलं आहे प्रकाशला. तुम्ही मला घरीं घेऊन गेलांत तर तें वचन अनायासें पाळलं जाणार आहे. पण घरीं तुम्ही माझ्याबद्दल काय सांगणार ?"

"अहो, एवढीच ना तुम्हांला काळजी. मी इतकी तुमची सुरेख 'इन्ट्रोडक्शन' करून देतें. हे ॲडव्होकेट किशोर, पुण्याचे तरुण व नामांकित वकील, रावबहादूर विद्यासागर यांचे चिरंजीव, कायदा व मानसशास्त्र यांतले पंडित—"

"तरुण व नामांकित हा वकिलीच्या धंद्यांतला सध्या पुण्याला तरी विरोधाभास आहे. तसेंच 'वडिलांची कीर्ति सांगे तो एक मूर्ख–'–निदान शहाणा तरी खास नाहीं. आणि न कळवितां अनोळखी घरांत, अपरात्रीं, एका तरुण मुलीबरोबर शिरणारा माणूस, कायदा किती जाणतो अन् मानसशास्त्रांत किती प्रवीण आहे हें दिसतंच आहे."

"मग नाहीं का येत तुम्ही आमच्याकडे ?" छायानें अगदीं रडकुंडीस येऊन विचारलें.

"वा–असं मीं म्हटलं का तुम्हांला ? माझं एवढंच म्हणणं कीं तुम्ही सांगणार काय आपल्या वडिलांना ?"

इतक्यांत छायाला एक कल्पना सुचली आणि तिच्या डोळ्यांत कांहींशी खोडकरपणाची चमक दिसूं लागली. ती लागलीच म्हणाली—

" अहो, मी विसरतच होतें. तुमची ओळख आमच्या घरीं इतक्या आडवळणांनीं करून द्यायची जरूरच नाहीं. हे आपल्या आबांचे भावी जामात म्हणून सांगितलं कीं तुम्हांला आमच्या घरांत अढळपद मिळालंच. "

" अखेर तुम्हीं काढलातच तो विषय म्हणायचा. " किशोरची मुद्रा पालटली. तो कांहींसा गंभीर झाला. दुसऱ्याच्या तोंडावर बुद्धीचा झोत टाकून त्याची नजरबंदी करण्याची नेहमींची वृत्ति बदलून तो कळकळीनं बोलूं लागला, " छायाताई, तुम्हांला शशांकनं सांगितलं असेल किंवा नाहीं हें मला माहीत नाहीं. पण पुण्याच्या तीन चार दिवसांच्या मुक्कामांत तुमच्या चाणाक्ष दृष्टींतून पुष्कळ गोष्टी सुटल्या नसतील असं मला वाटतं ."

" तुमचा रोख सुलभाच्या वागणुकीवरच आहे ना ?"

"हो, अर्थात्च."

"मला तिच्या वागण्यांत स्वच्छंदीपणा दिसतो, पण याखेरीज दुसरा कांहीं विशेष दोष आढळला नाहीं. स्वभावानं भाबडी, रूपानं परीसारखी, बुद्धीनं चलाख. खरंच आमची सुलभा म्हणजे एक गोड पोर आहे नाहीं ?"

"छायाताई, रसिक पुरुषी दृष्टीला ती किती आल्हाददायक वाटत असेल याची आतां तुम्हांला कल्पना येईलच. पण भाबडेपणानं तिनं भलत्याच गोष्टीचा ध्यास घेतला, रूपाच्यापुढें तिला कशाचीच मातब्बरी वाटेनाशी झाली आणि बुद्धीला विकृति येऊं लागली तर हे सर्व गुण नुसते असून काय कामाचे ?"

"असं झालंय् कीं नाहीं हें प्रथम पाहिलं पाहिजे, अन् समजा तसं झालं असलं तरी त्यांत तिचा किती दोष आहे, आणि इतरांचा किती दोष आहे याचा आढावा घेतला पाहिजे."

"माझ्याकडून कांहीं चुकलं असेल असं मला वाटत नाहीं."

" तुमच्या दोघांच्या सहवासांत मी फारच थोडा वेळ होतें. पण तेवढ्यांत पाहिलं, तर तुम्ही इतक्या कठोरपणानं नि कुचेष्टेनं बोलत होतां कीं रागानं थरथरत ती बिचारी स्तब्ध बसून राहिली होती. माझ्या पत्राला तिचं उत्तर आलं त्यांत देखील तिचा तो तुमच्यावरचा राग स्पष्ट दिसला. "

" काय आलंय् हो पत्र ? " किशोरनें अधीरपणें विचारलें.

" इतक्यांत नाहीं दाखविणार महाराज, तें आपणांला " छाया हंसत म्हणाली " किशोर, तुमचं मानसशास्त्राचं ज्ञान प्रणयाराधनेंत कांहीं प्रभावी ठरत नाहीं असं दिसतं. प्रत्येकवेळीं दुसऱ्याला दिपवायचा प्रयत्न करणं ही तुमची खोड अशा वेळीं नडते. झाडाच्या फांद्या तोडायला कुऱ्हाड वापरावी हें ठीक आहे. पण तीच कुऱ्हाड वेलीचं नाजुक फूल तोडायलाहि वापरणं योग्य होईल का ? सुलभाचे दोष नाहींसे व्हावे यासाठीं जरूर तेवढं कडक बोला तुम्ही. पण केव्हांतरी मधुर शब्दांचं सिंचन कराल कीं नाहीं ? रोप वाढायला वरून सूर्यप्रकाश पाहिजे. तसं मुळाशीं पाणीहि घातलं पाहिजे. पाण्यावांचून नुसता सूर्यप्रकाशच अन् तोही प्रखर मिळत राहिला तर रोप वाळून सुकून जाईल. "

किशोर कांहीं न बोलतां विचार करूं लागला. त्याच्या त्या स्तब्ध बसण्यामुळें छायाला थोडी भीतीहि वाटली. ती म्हणाली, " किशोर, मी उगीच टाकून बोललें तुम्हांला–पण काय करूं ? सुलभाचा विषय निघाला म्हणून इतकं बोलावंसं वाटलं–"

" छे, छे, तुमच्या बोलण्याचा मला मुळींच राग आला नाहीं. मी फारच थोड्या लोकांच्या बोलण्याचा विचार करतों. त्या थोड्या लोकांच्या यादींत आज तुमचं नांव दाखल केलं आहे. "

" थँक यू–पण काय हो—" छाया कांहीं गोष्ट लक्षांत आल्यासारखा चेहरा करून म्हणाली, " मघांपासून तुमचें अग्निहोत्र कसं थंडावलं ? माझा कांहीं अडथळा आहे असं समजूं नका हो. "

आपली अडचण ओळखून ती छायानें दूर केली, याबद्दल तिचे आभार मानून किशोरनें आपली सिगारेट केस काढली, आणि त्यांतील उंची सिगारेटपैकीं एक शिलगावली.

" बरं आमच्या कलावंत बंधुराजाचं कसं काय चाललं आहे ? त्यानं म्हणे आतां स्टूडियो काढला आहे. "

" शशांकचं ना ? " किशोर सांगूं लागला, " आतां त्यानं फार मनावर घेतलेलं दिसतं. स्टूडियोंत पुष्कळ विद्यार्थी आणि विद्यार्थिनी जमतात. तथापि स्वतः शशांकला पैसे मिळविण्याच्या दृष्टीनं व्यापारी कलाच थोडाफार हात देते. सध्यां

एका प्रमुख संस्थेकडून मागणी आल्यावरून त्या संस्थेच्या संस्थापकाचें मोठें तैल-चित्र रंगविणं त्यानं चालविलं आहे. त्यांतले गमतीदार अनुभव तो परवां सांगत होता."

"रंगविण्यांत कसले हो विचित्र अनुभव ?"

"अहो, दिवंगत महात्म्याचं चित्र हुबेहूब दिसावं म्हणून संस्थेंतले सदस्य, विशेषतः त्यांना ज्यांनीं प्रत्यक्ष पाहिलं आहे असे जुने लोक वेळोवेळीं येऊन परस्पर-विरोधी सूचना देत असतात. कोणी म्हणतो, 'ते वर्णानं जरा सावळेच होते.' दुसरा त्यांच्या केतकीसारख्या वर्णाची स्तुति करतो. तिसरा त्यांना बावळ्या वेषाचे न बनविल्याबद्दल चित्रकाराला दोष देतो, तर चौथा त्यांच्यासारखा 'वेलड्रेस्ड' मनुष्य मीं पाहिला नाहीं असें ठांसून सांगतो. शशांक अगदीं त्रासून गेला आहे. परवांच तो अगदीं चिडून मला म्हणाला कीं, मूळ छायाचित्र आणि या वुद्धांच्या तऱ्हेवाईक सूचना यांचा मेळ घालतां घालतां, विनायकाचा वानर व्हायची वेळ आली आहे."

"पण हे लोक अशा परस्परविरोधी सूचना करतात तरी कसे ?" छायानें विचारलें.

"त्याचं कारण प्रत्येकाचा अहंकार. त्या स्वर्गस्थ पुढाऱ्याला मीं पाहिलं हा एक अभिमान असतो त्यांना, आणि मी सूक्ष्म दृष्टीनें इतरांहून कांहीं वेगळं पाहिलं असंहि त्यांना वाटत असतं.......हो, शशांकच्या मागचं दुसरं त्रासदायक काम म्हणजे चित्रासाठीं 'मॉडेल्स' मिळविणं."

"ही काय भानगड आहे आणखी ?"

"आम्हांलाहि ती तुमच्याप्रमाणंच नव्यानं कळली आहे. चित्रकलेच्या उच्च अभ्यास-क्रमांत पुढें मनुष्य बसवून चित्र काढण्याचा एक विषय आहे. त्याचा अभ्यास स्टूडि-योंत विद्यार्थ्यांकडून करून घ्यावा लागतो. पण 'मॉडेल' म्हणून पुढें बसायला स्त्रिया मिळत नाहींत. आपल्या समाजांतील नीतीच्या कल्पना फार विचित्र आहेत. खालील वर्गांतदेखील 'चित्रजीवि' स्त्रिया मुष्किलीनेंच मिळतात. आपलं उत्तम शरीरसौष्ठव चित्रकारापुढं आदर्श म्हणून मांडणं हें पाप वाटतं त्यांना. परवां एका सुंदर अंग-लटीच्या मोलकरणीला शशांकनं विचारलन् कीं, 'तूं स्टूडियोंत दोन दिवस बसशील

का ? आठ दिवस सतत काम करून मिळणार नाहीं इतका मोबदला तुला दोन दिवस नुसतं स्वस्थ बसून मिळेल!' ती एकदम फणकाऱ्यानं म्हणाली, 'वा दादा, असला पापाचा पैसा मला नको. अन् अंगमेहनत केल्याविण, स्वस्थ बसून कुणी पैसा देईल व्हय् ? उगाच कां आम्हां गरिबाची फसवणूक करतां ?' आतां आमचा चित्रकार तिला काय सांगणार बोला."

"काय एक एक गमती असतात!" छाया हंसत हंसत म्हणाली, थोडा वेळ थांबल्यानंतर एक कल्पना तिला सुचली. तिनें विचारिलें, "काय हो, शशांकदादाला 'मॉडेल'च्या बाबतींत सदानंद मदत करूं शकेल कीं. त्याचं अशा सिनेमा तारकांत पुष्कळच जाणंयेणं असेल. गोड बोलून त्याच्या सारख्याचा असा उपयोग करून घ्यायला काय हरकत आहे ?"

"वाः छायाताई, तीन चार दिवसांच्या पुण्याच्या मुक्कामांत तुम्हीं बरंच संशोधन केलंत कीं. तरीच जेव्हां प्रकाशनं एकदोन वाक्यांत तुमचं वर्णन मला सांगितलं, तेव्हांच मीं ताडलं—"

"काय—काय ताडलंत ?"

"कीं हें प्रकरण कांहीं सामान्य नाहीं."

"वाः, अहो ॲडव्होकेट, स्तुतीची गुंगी देऊन उलट तपासणींत कांहीं रहस्य काढून घेणार कीं काय माझ्याकडून ?"

"मुळींच नाहीं. आमचा साक्षीदार आपल्या जबानींतच ईश्वरसाक्ष खरं सांगत असतांना ह्या डावपेचाचं काय कारण ?"

नंतर बराच वेळ दोघेंजणें कांहींहि बोललीं नाहींत. किशोरला आज मोठी अद्भुत घटना अनुभवायला मिळाली होती असें नाहीं, तरीपण त्याच्या अंतःकरणांत मोठी चलबिचल झाली होती. कांहीं प्रसंगच नव्हे एकादें मार्मिक भाषण देखील भूकंपाप्रमाणें मनःसृष्टींत अनेक विचारांची उलथापालथ करतें. कित्येक पूर्वग्रहांचीं उंचावलेलीं शिखरें ढासळून ठेंगणीं होतात, तर कोठें नवीन कल्पनांचे भूभाग वर येतात. किशोर स्त्रियांच्या बुद्धिप्रकर्षाबद्दल कधीं उत्साहानें बोलत नसे. चित्रलेखेचा अपवाद त्याला मान्य होता, पण एकंदर स्त्रियांच्या आकर्षकतेचें अधिष्ठान बुद्धि हें मुळींच नव्हे असें मात्र त्याला वाटे. छायाशीं झालेल्या आजच्या संभाषणानें त्याचें तें ठाम

मत आज डळमळूं लागलें. आपलें कोठें चुकत आहे कीं काय असें वाटायला लावणारी तरुण व रसिक ललना आज त्याला प्रथम आढळली.

—इकडे छायाची स्थिति कांहींशी वेगळी झाली होती. आजचें एकंदर सर्वच अकल्पित ! प्रकाशाची भेट झाली...ती होणार यांत अनपेक्षित असें कांहींच नव्हतें. परंतु आपण इतक्या थोड्या वेळांत अगदीं जिवाभावाची गोष्ट बोलण्याइतके कसे जवळ आलों याचें तिला राहून राहून आश्चर्य वाटत होतें. असें सांगतात कीं, बारीक आवाजाचा नवशिका गायक एकाद्या पल्लेदार पहाडी आवाजाच्या गवयाबरोबर सुरांत सूर मिसळून गाऊं लागला, म्हणजे त्या नवथर गवयाचा आवाज कमाल मर्यादेपेक्षांहि एकाददुसऱ्या उंच सुरापर्यंत चढतो. छायाचेंहि असेंच नाहीं का झालें ? प्रकाशाच्या प्रभावी सहवासांत तिचा स्त्रीसुलभ संकोच दूर झाला, ती धीट झाली आणि भावनांच्या अनेक थरांखालीं झाकून ठेवलेलें रहस्य तिनें सहज प्रकट केलें.

खिडक्यांच्या तावदानावर झिरपणारी जलबिंदूंची माला खंडित झाली म्हणून छायानें खिडकी उघडली. गाडी कुर्ल्याच्या पुढें आली होती. वेणी घालण्याकरितां केशकलापाचे दोन पेड करून त्यांतला एक विंचरण्यासाठीं बाजूला घ्यावा, त्याप्रमाणें मुख्य रेल्वे लाईनपासून समुद्रकिनाऱ्यानें गेलेली रेल्वेची शाखा Harbour Branch वेगळी केलेली दिसत होती. आजूबाजूला दिव्याच्या प्रकाशांतून दूर आरक्त झालेली खाडी मधूनच चकाकतांना दिसत होती. तीहि आपल्याप्रमाणेंच 'प्रकाशा'च्या पुनर्मीलनाची वाट पहात तळमळत असावी अशी एक कल्पना छायाच्या मनांत चमकून गेली.

## .११. 'प्रकाश चित्रमंदिर'

'**प्रकाश चित्रमंदिर**' हा पुणें शहरांतील सुशिक्षित समाजाच्या बोलण्याचा आजकाल विषयच झाला होता. प्रतिष्ठित मंडळींना भेट द्यायला एक नवें स्थळ पुण्यांत झालें. आबासाहेबाची सांपत्तिक स्थिति बेताचीच असली तरी लौकिक मोठा होता. तेव्हां त्यांच्या मुलाचें नवें धाडस पुष्कळांना कुतूहलास्पद वाटावें यांत नवल नाहीं. कांहीं तरुण मुलींनीं चित्रमंदिरांत नांव दाखल केलें, तर कांहींना घरची परवानगी नाहीं म्हणून त्या मनांत हळहळूं लागल्या. कित्येक कलावंत सम-जल्या जाणाऱ्या तरुणांचें कलाप्रेम सध्या विशेष भराला आलेलें होतें. शशांकच्या चित्रमंदिरांत त्यांना प्रवेश पाहिजे होता, तो तेथील वातावरणाकरितां कीं शशांकच्या चित्रणकौशल्याकरितां याचा निर्णय त्यांच्या वृत्तीवरून कोणालाहि देतां आला असता. आज सकाळीं कृष्णचंद्रांना घेऊन शशांक चित्रमदिरांत आला. त्यांच्या सुखलोलुप जीवाला हें नयें साहस न झेपण्यासारखेंच होतें आणि त्याच्या बोलण्यांत हें दिसूनहि येई. आजच मुलांमुलींना चित्ररेखनाच्या सूचना देऊन झाल्यानंतर तो गॅलरींत येऊन कृष्णचंद्रांना म्हणाला, "काय त्रास आहे पहा कृष्णजी! जाहिरात करायची, पाट्या रंगवून घ्यायच्या, प्रतिष्ठित लोकांना भेट द्यायला आणायचें—अगदीं कंटाळलों मी. उगाच केला हा व्याप असं वाटतं."

"शशांक, असं कंटाळून कसं चालेल? तुमच्या सारखे आणखी कांहीं कलावंत निर्माण झाले म्हणजेच अनेक शशांक निर्माण झाले असं होईल. आणि आपल्या व्यक्तित्वाचं प्रतिबिंब इतक्या विविध ठिकाणीं पडलेलं पाहिलं म्हणजे जो तुम्हांला आनंद होईल त्याला कांहीं पार आहे का? अहो, एकजिनसी ब्रम्हाला देखील

आपलं रूप अनेक ठिकाणीं प्रकट व्हावें असं वाटलं, म्हणून तर त्यानं हा जगाचा पसारा मांडला. "

"हें मीं कबूल करतों हो. पण मला वाईट वाटतं तें माझ्या कलेबद्दल. आबांच्या लौकिकाच्या मानानं जिंदगी फार थोडी. म्हणून हा व्याप मला मांडावा लागला आहे. पण माझ्यासारखी ज्याची अव्यवहारी वृत्ति आहे तो या व्यापांत पिळून निघतो. कलाकृति निर्माण करणारी प्रतिभा ही नदीसारखी आहे, ती अंतःकरणांत उगम पावते आणि निसर्गाच्या भव्य कलासागराशीं एकरूप होण्याकरितां वाहत जाते. पण मध्यंतरीं हें व्यवहाराचं रुक्ष वाळवंट आहे ना, त्यांत ती लुप्त होण्याची सदैव भीति असते. त्याच भीतीनं मला पछाडलं आहे. "

कृष्णचंद्र हंसून म्हणाले, " भीतीनं पछाडलं आहे म्हणतां म्हणून मला धीर आला. भीतीनं पछाडलेलीं माणसंच नेहमीं निराशेची कल्पना काढीत असतात. प्रतिभेला दिलेली नदीची उपमा योग्य आहे खरी, पण तुमची प्रतिभा 'लुनी' न होतां 'नाईल' होणार नाहीं कशावरून ? "

" व्यवहाराशीं झगडण्यांत माझ्या शक्तीचा ऱ्हास झाला नसता तर मीं निराशेचे सूर काढले नसते."

" तुमचं असं म्हणणं आहे का कीं आजपर्यंतच्या विख्यात कलावंतांना व्यवहाराची झळ लागलीच नाहीं ? "

" छे, छे, असं मुळींच नाहीं. भौतिक परिस्थितीचा एवढा बागुलबुवा करायला मी अजून शंभरनंबरी समाजवादी बनलों नाहीं. आमचा प्रकाश मला नेहमीं म्हणतो कीं, सध्यांच्या भांडवलशाही परतंत्र समाजांत कलावंताला प्रतिकूल परिस्थितीशीं झगडावं लागतं म्हणून कलेला ऊर्जित दशा येत नाहीं; पण कलावंतांना एकदा राष्ट्रानं संरक्षण दिलं म्हणजे कला फोफावेल. मला प्रकाशचं म्हणणं इतकंसं अद्याप पटलेलं नाहीं. बॉयस्काउटप्रमाणें साम्यवादी समाजांत कलावंतांच्या पलटणी उभारतां येतील हें वेडगळ मनोराज्य आहे. पण कला वाढीला लागायला थोडं स्वास्थ्य पाहिजे हें मात्र खरं. तुम्ही प्रतिकूल परिस्थितींत मोठ्या झालेल्या ज्या कलावंतांचा उल्लेख करतां आहांत त्यांची इच्छाशक्ति फार प्रबल होती. मी हें कबूलच करतों कीं त्या बाबतींत मी अगदीं दरिद्री आहें. माझे मोठे विचार

कल्पनेंत ढगासारखे तरंगतात, पण व्यवहाराच्या भूमीवर येण्यापूर्वीच त्यांचं पाणी होऊन जातं.”

कृष्णचंद्रांनीं कांहीं न बोलतां एक दीर्घ सुसकारा टाकला. जणूं कांहीं आपल्या मनांत चाललेल्या विचारांना यानें वाचा फोडली असा भाव त्यांच्या मुद्रेवर उमटला. ते कांहीं बोलणार इतक्यांत खालून एक माणूस जिना चढून वर आला. तो शशांकला नमस्कार करून म्हणाला, “साहेब, आपणांला पाहिजे असलेलं मॉडेल आणलं आहे.”

“हं. काल म्हणालास ती. आण तिला वर.”

तो माणूस खालीं गेला. आतां कांहीं नाजुक बोलणीं सुरू होतील हें जाणून कृष्ण-चंद्रांनीं शशांकचा निरोप घेतला. ते जाण्यास निघाले तों ती स्त्री शशांकपर्यंत येऊन पोंचलीहि होती.

कृष्णचंद्र जिना उतरत असतां त्यांना पुढील आश्चर्योद्गार ऐकूं आले.

“कोण शेवंती ?”

“होय तीच मी दादा.”

ती शेवंतीच होती. तिच्या पेहरावांत शशांकला विलक्षण पालट झालेला आढळून आला. पांढरें शुभ्र मलमलीचें पातळ तिच्या उंच, प्रमाणबद्ध शरिराला खुलवीत होतें. अंगांतील चोळीहि पांढरीच होती. परंतु उन्नत वक्षस्थळ, सुरेख कंठ, पुष्ट नितंब या सर्वांमुळें वेषाच्या शुभ्रपणावर यथातथ्य छाया दिसून सौंदर्याला उठाव मिळे. कोपऱ्यांत वहाणा काढून ठेवण्याकरितां ती वळली, तेव्हां डोक्यावरील पदराखालून निघालेली आणि पाठीवरील पदराखालून गेलेली रुंद लांब-सडक वेणी शशांकला गुप्तगंगेसारखी वाटली. चेहऱ्यावर तीच सात्विकता, तोच आर्जवीपणा, आणि प्रियकराला आत्मसमर्पण करण्यास दिसून येणारी उत्सुकता ! नाकांत चमकी नव्हती, परंतु ती त्रासदायक झाल्यामुळें काढून ठेविली असावी हें किंचित् लालसर झालेल्या नाकपुडीवरून कळून येण्यासारखें होतें. आपल्या नजरेस नजर न भिडवितां, आपल्याला न्याहाळत उभी असलेली ती मनोहारिणी पाहून शशांक कांहींसा कंपित झाला.

“शेवंती, तुझ्यांत किती बदल झालाय् ! कसं काय चाललंय् तुझं. एक चित्रपट संपला म्हणून ऐकलं. दुसऱ्या नव्या चित्रपटांत तुझ्याकडे मोठं काम आलं असेल.”

"मोठं काय दादा, अगदीं नायिकेचं सुद्धां मिळालं असतं पण..."

"पण काय झालं ?

"तिथलं कारस्थान आपणासारख्यांना साधत नाहीं. तुम्हांला ठाऊक आहेना माझं माहेर मोठ्याचं आहे, मला थोडंफार शिक्षणहि मिळालं आहे. आमच्या कंपनींत स्वतंत्रपणानं कोणाशीं लगट न करतां राहणारी म्हणून माझा बोभाटा आहे. घरून स्टूडियोंत जायला मोटरसुद्धां मला मिळेल, पण वाटतं नको तो मिंधेपणा. मी आपली पायींच जातें."

"इतका त्रास तूं कां घेतेस ? मोटर मिळत असल्यास खुशाल वापरावी."

"दादा, एक लहानशी सवलत माझ्यासारख्या तरुण बाईनं मान्य केली कीं सुखाचे धागे जास्त जास्त पसरूं लागतील अन् मी त्या जाळ्यांत जास्त जास्त गुरफटेन. दुखणं वाढल्यावर बरं करणं कठीण आहे. त्यापेक्षां अगोदरच जपून असावं हें चांगलं नाहीं का ? समजलं ना मी काय म्हणतें तें ?"

"आलं ध्यानांत सारं, एकंदरीनं तूं तिथं कांहीं चैनींत नाहींस; अन् तुला तें कामहि मोठंसं मनापासून आवडत नाहीं; पण अशा वृत्तीनं कामांत कांहीं कमीपणा येत नाहीं ना ?"

"छे, छे, लहानपणापासून जें काम करायचं तें मनापासून करायचं असा माझा स्वभाव. साधी भातुकली असली तरी अगदीं पहांटे उठून मी लग्नकार्यांतल्या सारखं काम करायची. तो माझा स्वभाव अजून कायम आहे. माझं काम अगदीं चोख होतं असं डायरेक्टर नेहमीं म्हणतात. पण मला मात्र आतां कंटाळा आला आहे कामाचा. हा चित्रपट एकदा संपला म्हणजे माझं कर्जहि फिटेल, मग पुनः आपलं नेहमींचं जिणं बरं."

"इथल्या कामांची कल्पना दिली असेल तुला आमच्या माणसानं. तूं आहेस ना कबूल ?"

शेवंती कांहींशी गोंधळली. पण जरा धीर करून ती म्हणाली, "दादा, इथं येई-पर्यंत त्या कामाला माझी खुषी होती..."

"मग इथं आल्यावर काय झालं ?"

"मला बापडीला काय ठाऊक तुमच्याकडचं हें काम आहे म्हणून. नाहींतर मी मुळींच कबूल झालें नसतें."

शशांक गोडसें हंसून तिला म्हणाला, " शेवंती, आतां तूं प्रख्यात सिनेमा नटी होणार आणि अजून इतका संकोच. विजेच्या झगझगीत प्रकाशांत हावभाव करणं, लाडिक भाषणं करणं हें तुला अवघड वाटत नाहीं. माझ्या इथं तसं कांहीं करायचं नाहीं. स्वस्थ अगदीं देवासारखं बसायचं. माणसंहि नाहींत फार...."

" पण दादा, तुमच्या समोर चित्रासाठीं बसायचं म्हणजे..." शेवंती मध्येंच अडखळली.

" मी शशांकदादा आहें हे विचार काढूनच टाक मनांतून. त्या तिऱ्हाईत डायरेक्टरच्या समोर कशी प्रथम उभी राहिलीस ? अगदीं तस्संच समज म्हणजे झालं."

शेवंती कांहीं न बोलतां क्षणभर उभी राहिली. तिच्या मनांत नाना कल्पनातरंग आणि विकल्प येत होते. आपण या ठिकाणीं येऊं लागलों तर तें लपून राहाणार नाहीं, शहरांत ती बातमी पसरून आबासाहेबांपर्यंतदेखील पोंचेल, ते शशांकला म्हणतील काय पोर निलाजरा झाला, एका काळच्या आपल्या मोलकरणीला समोर राजाच्या राणीसारखं बसवून चित्र काढतो!... काय म्हणावें याला ? कल्पनातरंगावरून जातां जातां जनापवादाचे आणखीहि मोठमोठे खडक तिला दिसूं लागले. शेवंती सिनेमांत काम करायला गेली, तेव्हांपासून अपवाद आणि निंदा यांचा अनुभव तिला प्रत्यहीं येत होता. पण आतां आपण जें करणार आहोंत त्यांत शशांकच्या कीर्तीला धोका आहे ही तिला जाणीव होती. आणि म्हणून तिचें अंतःकरण होकार देतांना कातर होत होतें.

पण शशांकचा शब्द कसा मोडायचा असें वाटलें म्हणून म्हणा, किंवा आणखी कसल्यातरी अत्यंत गूढ आकर्षणानें अंतःकरणाचीं सूत्रें हालविलीं म्हणून म्हणा शेवंती एकदम सलज्ज होऊन उद्गारली,

" दादा, येईन मी कामाला. "

" दॅट्स् राईट, शेवंती, मग सकाळची वेळ तुला जुळेल ? "

मानेनेंच होकार देऊन शेवंती जायला निघाली. शशांक तिला पोंचवायला खालपर्यंत आला. जिन्याच्या शेवटच्या पायरीवर शेवंती आली असेल तों दाराच्या चौकटींतील एका खिळ्यांत तिचें मलमली पातळ अडकून डोक्यावरील पदर खालीं पडला. शशांक मागें होता. वेणीच्या काळ्याभोर शेपट्याच्या दोन्ही बाजूंस दिसणारा

शेवंतीच्या मानेचा गोरापान भाग, आणि पदर पडला या जाणिवेनें उत्पन्न झालेल्या लज्जेमुळें लाल झालेले तिचे कान हें पाहून शशांकला अननुभूत आनंद होत होता. पण मन आवरून तो तिचा पदर खिळ्यांतून सोडवूं लागला. शेवंती लज्जेनें चूर झाली होती.

पदर खिळ्यांतून सुटून शेवंती तो परत डोक्यावर घेत आहे तोंच समोर सुलभाची सायकल थांबली. तिनें टेनिसचा पांढरा बूट घातला होता आणि तिचा सर्व पोषाखच शुभ्र होता. गोजिरवाणें पांढरें कबूतर एका डाहळीवरून टुणकन् खालच्या डाहळीवर उतरतें त्याप्रमाणें सुलभा आपल्या सायकलवरून उतरली. शेवंती तिच्याशीं दोन कुशल शब्द बोलून मार्गाला लागली. शेवंती येथें या वेळीं कशी हें तिला कळेना.

“काय रे दादा, शेवंती कशी इथं या वेळेला ?”

“तें सांगतों तुला. पण ताईसाहेब, आबांच्या जवळ रिपोर्ट नको जायला बरं का लागलीच.”

“हें रे काय ? मी इकडचं तिकडं करणारी आहे वाटतं ? तसं असलं तर नको सांगूं जा.”

“अग असं रागावतेस काय ? तूं शाहाणी आहेस तशी. पण बोलण्याच्या भरांत माणूस जातं सहज बोलून, म्हणून इषारा दिला. बरं आपली स्वारी इकडं कां वळली ?”

“किशोर येऊन बसले आहेत, अन् तुला बोलावलंय् त्यांनीं.” एकीकडे पाहत घाईघाईनें सुलभेनें सांगून टाकिलें.

“ओ, आय् सी ! म्हणून ताईसाहेब आपली धांदल होय ? चल, चल, मी निघालोंच.”

## .१२. छायाकडून आलेली देणगी

" तुम्ही अगदीं एका दिवसांतच कंटाळलां मुंबईला." चहा घेतां घेतां आबा किशोरला म्हणाले.

" नाहीं. राहिलों असतों आणखी एकदोन दिवस. पण एक तर मी एकटा होतों. बरोबर कुणी मित्रमंडळी असती म्हणजे बरं असतं. अन् सध्या मुंबईत पावसानं इतका कहर केला आहे कीं बाहेर तोंड काढणं मुष्किल असतं. म्हणून काल दुपारीं काम संपतांच डेक्कन क्वीन गांठली."

आबा आणि किशोर शशांकच्या खोलींत बसले होते. शशांक येईतोंपर्यंत किशोरला एकटें वाटूं नये म्हणून आबा येऊन बसले. आबांना तरुण आणि कुशाग्र बुद्धीचीं माणसें विशेष प्रिय असत. त्यांतून किशोरसंबंधीं त्यांनीं फारच मोठ्या आकांक्षा बाळगल्या होत्या. रमाबाईचें बोलून चालून स्त्रीहृदय! हा 'तरुण, कुलिन...चतुर, सद्गुणी सुंदरसा' पति आपल्या गोजिरवाण्या कन्येला किती अनुरूप आहे, या नुसत्या विचारानेंदेखील वत्सल रमाबाईच्या डोळ्यांत पाणी चमकूं लागे. आज किशोर वर जाऊन बसला असेल नसेल तोंच चहा आणि फराळाचें घेऊन त्या वर आल्या. चहापान चालू असतां टेबलाजवळ उभ्या राहून त्या एकादा शब्द किशोरला विचारीत होत्या.

"उतरलां होतां कुठं ?"

" माझा एक गुजराथी व्यापारी स्नेही जयंत देसाई म्हणून आहे, त्याच्याकडे मी नेहमीं उतरतों. पण छायाताई कल्याणला भेटल्या. त्यांनीं अति आग्रह केला. त्यामुळें त्यांच्याकडे जावं लागलं, पण फार मंडळी अगत्याची."

"मंडळी तर आहेतच. पण तुम्ही काय, कुठंहि गेलांत तर सर्वांना हवेहवेसे व्हाल !" रमाबाई कौतुकाच्या स्वरांत म्हणाल्या.

हा स्तुतीचा धागा आबा हातांत घेणार असा रंग दिसतांच, किशोरनें तो मध्येंच तोडून टाकण्याच्या उद्देशानें म्हटलें, "खरंच, तुम्हांला छायाताईंनीं आणि सर्वच मंडळींनीं येत्या दिवाळींत अगदीं आग्रहानं बोलावलं आहे मुंबईला. 'पुरुषांचं नेहमीं येणं होतं, पण बायकांना बाहेर पडायला होत नाहीं. म्हणून आत्याबाईंना म्हणावं मुद्दाम सवड काढून या मुंबईला' असं छायाताईंनीं सांगितलं आहे."

रमाबाई आबांकडे पहात किंचित् हंसून 'ठीक' एवढेंच उद्गारल्या.

इतक्यांत शशांक आणि सुलभा दोघेंजण येऊन पोचलीं. शशांक घाईघाईनें आंत येऊन किशोरचा हात हातांत घेत म्हणाला, "काय महाराज, मुंबईला एक दिवस सुद्धां काढवेना ना तुम्हांला ! असं काय आकर्षण आहे रे तुला पुण्यांत ?"

"अरे, खुद्द पुणं हेंच नाहीं का आकर्षण. उष्णतेनें विरल झालेल्या वातावरणांत दूरची हवा येते. पण माणसं मात्र उष्ण वातावरणापासून दूर जाऊं पाहतात. मुंबईला बाहेर पाऊस अन् आंत उकाडा. त्रासून गेलों अगदीं. लोणावळ्याला आल्याबरोबर असं छान वाटलं."

आपल्या चेष्टेला किशोरानें मजेदार हुलकावणी दिली याची शशांकला गंमत वाटली. आबांचा चहा संपला होता. ते म्हणाले, "बरं येतों किशोर, चालूंद्या तुमची युवक परिषद आतां."

"आबासाहेब, युवक परिषदेला अध्यक्ष पुष्कळदां पोक्तच असतो. आपण जायचीच कांहीं गरज नाहीं."

इतक्यांत कृष्णचंद्र आंत आले.

"हे घ्या अध्यक्ष" आबा हंसत म्हणाले, "आमच्यापेक्षां तरुणांना कितीतरी जवळ. पुनः वयानें मध्यम अन् विचारानं वृद्ध."

"छे, युवक परिषदेचा अध्यक्ष वयानं वृद्ध असला तरी चालेल. पण विचारानं तरुण पाहिजे." किशोरानें उलट बोलणें परतविलें.

आबा बाहेर आले. रमाबाई खालीं निघून गेल्या.

शशांक कपडे काढीत म्हणाला, "काय रे, कल्याणला छाया आली होती ना?"

खुर्चीवर आसन घालून बसलेले कृष्णचंद्र छायाचें नांव निघतांच विशेष आस्थेवाईकपणें संभाषण ऐकूं लागले. सुलभा टेबलावर चढून बसली होती. तिला तर अत्यंत प्रिय तोच विषय निघाला.

"अरे, आली होती म्हणून काय विचारतोस? आणाभाकापर्यंत पाळी आली असावी असं वाटतं."

"होय का? दॅट्स् अ गुड् न्यूज्."

कृष्णचंद्र तेथें आहेत हें लक्षांत घेऊन किशोरनें थोडक्यांत मोघमपणें सर्व हकीकत सांगितली. तथापि त्यांच्यासारख्या चाणाक्ष माणसाला तेवढ्यावरून छाया आणि प्रकाश यांच्यांतील आकर्षण किती वाढत आहे याची सहज कल्पना आली. आपल्या चेहऱ्यावर औदासीन्याची छटा न येऊं देण्यासाठीं कृष्णचंद्रांना फार कष्ट पडत होते.

"मुंबईला आणखी काय मजा केलीस सांग ना किशोर?"

"अरे, अर्ध्या दिवसांत काय मजा करायची? हो बरी आठवण झाली. आपला 'बुखारीन' भेटला होता."

"सदानंद? तो कुठं? मुंबईला केव्हां गेला? का प्रकाश वगैरे मंडळीवर मुंबईपर्यंत टेहळणी करण्याचं काम त्यानं पत्करलं होतं?"

"तसंहि असेल." किशोर सांगूं लागला, "हायकोर्टांतलं काम आटोपून मी एका रेस्टारंटमध्यें चहा घ्यायला गेलों. तों दोन तीन बोडके लोक भोवतीं आणि मध्यें स्वारी बसलेली. एक पिवळया पुठ्याचं हातोडाकोयता छाप पुस्तक होतं काखोटीला."

"बहुतेक गेल्या शुक्रवारच्या बोटीनं आलेलं असायचं!"

"हो तसंच. आपल्या भगतांना त्या पुस्तकांतलं कांहीं ज्ञानामृत पाजीत होता. मला पाहतांच एकदम दांत विचकून म्हणाला, 'वाः ॲडव्होकेट साहेब, या. तुम्ही कोणीकडे?' मीं म्हटलं, कोर्टाचं काम होतं. त्यांतून आमचे प्रकाश वगैरे पुण्याचे पुढारी नागपुरला जाणार होते परिषदेला म्हणून म्हटलं जावं!"

"प्रकाशचं नांव काढतांच भडकला असेल तो!" शशांकनें विचारिलें.

" भडकून काय करणार माझ्यापुढें तो ! मला आपलीच कहाणी मग सांगत होता. परळला कुठल्याशा एका फिल्म कंपनींत त्याला असिस्टंट डायरेक्टरची जागा मिळणार आहे म्हणे. त्याच्या खटपटींत तो आहे. पावसाळा सपतांच तो तिथं जाईल असं त्याच्या बोलण्यावरून दिसलं फिल्म कंपनींत नोकरी करून परळच्या मजूर-वस्तींतहि थोडंफार काम करावं असं त्याचं धोरण आहे. "

हें सर्व सांगत असतां किशोर सुलभाच्या चेहऱ्याकडे मधूनच पण सूक्ष्म दृष्टीनें पहात होता. टेनिसची रॅकेट टेबलावर उलटी ठेऊन मुठीवर तिनें आपली चिमुकली हनुवटी ठेवली होती किशोरचें बोलणें ऐकतांना ती त्याला न्याहाळून घेत होती. किशोरचा पोषाख आणि रुबाब तिला आज विशेष आवडला. गडद निळा सूट घालून नेक्टॉय वगैरे न चढवितां किशोरनें आज पोलोकॉलर कोटावर सोडली होती. त्यामुळें त्याचा मोहक पण रुबाबदार चेहरा विशेष सुंदर दिसत होता. त्याचे विपुल काळेभोर कुरळे केस भांगानें विभागले असून, जणूं काय दोन नद्यांचा प्रीतिसंगम होऊन संगमरेषेच्या आसपास लहरी उमटल्या आहेत व त्यांची शोभा काळया रात्रीं आपण पाहत आहोंत असें वाटे. एकादें पल्लवित झालेलें हिरवें गार झाड पाणी घातल्यावर जसें टवटवीत दिसतें, तसा किशोरचा चेहरा प्रफुल्लित दिसत होता.

—तथापि आज सुलभाला किशोरच्या केवळ बाह्य रूपानेंच भुरळ घातली नव्हती. नेहमींच्या बैठकींत सुलभाच्या चंचलपणावर, किंवा खुळचटपणावर दोन चार कुचेष्टेचीं वाक्यें किशोरनें उच्चारलीं नाहींत असें कधीं होत नसे. त्यामुळें त्याच्याबद्दल आकर्षण वाटूनहि त्याच्या सहवासांत सुलभाला मोकळेपणा किंवा आनंद वाटतच नसे. आज आल्यापासून सुलभाला न दुखविण्याचें त्यानें ठरविलेलें दिसत होतें. साहजिकच सुलभा आज विशेष मोकळेपणानें वागत होती. किशोरच्या खुर्चीखालीं एक बॅग ठेवलेली पाहून तिनें किशोरला विचारलें, " किशोर, ही बॅग कसली आणली आहेस आज ?"

" गेलं का तुझं लक्ष त्या बॅगवर ? खाऊ आणला असेल तुझ्यासाठीं मुंबईहून ! " शशांक हंसत म्हणाला.

" खाऊच आणला आहे. पण मीं नाहीं, छायाताईंनीं दिला आहे. माझं काम फक्त पोंचविण्याचं. "

"आम्ही आतां जातों. कृष्णजी, चला येतां का खालीं. स्नान उरकून घेऊं" शशांक डोळे मिचकावीत बोलला.

"शशांक, एकांकी एक प्रवेशी नाटक का आहे हें ? तसं असतं तर कांहींतरी क्षुद्र कारण काढून ह्या खोलीच्या रंगभूमीवरून तुम्हांला पाय काढता घ्यावा लागला असता. मी इतका निर्भीड आहें कीं मला सुलभाशीं बोलावंसं वाटलं तर तुम्हांला सांगेन तसं."

"हें शक्य नाहीं. नेहमीं निर्भीडपणें वागणारीं माणसं प्रणयाच्या बाबतींत फार संकोची असतात."

शशांकनें कृष्णचंद्रांना घेऊन खोलींतून काढता पाय घेतलाच. अशा तऱ्हेचा एकांत किशोर आणि सुलभा यांना आज पहिल्यानेंच मिळत होता. आपल्यावर अनुरक्त असलेल्या पुरुषाशीं एकटें राहून बोलण्याचा प्रसंग सुलभावर पहिल्यानेंच आला होता असें नाहीं. सदानंदानें साधलेल्या अनेक संधि सोडल्या तरी तिच्या कृपाकटाक्षासाठीं हपापलेल्या कांहीं तरुणांनीं तिला कित्येक वेळ एकीकडे गांठून प्रणययाचना केली होती. पण हे सर्व लोक तिच्याशीं वागतांना दिखाऊ हळुवारपणा आणि लाचारी दाखवीत. त्यामुळें विजयभावनेच्या भरांत त्यांच्याशीं वागतांना सुलभाला कांहींच अडचण भासली नाहीं. आजचा प्रसंग वेगळा होता. गुणांनीं आणि सन्मानानें श्रेष्ठ असलेला पण लाचारीच्या आहारीं कधींहि न जाणारा प्रियकर आज तिच्या समोर एकांतांत आला होता. अर्थात् ही घटना मधुर असली तरी गोंधळांत पाडणारी खासच नव्हती काय ?

किशोर तर या बाबतींत फारच नवखा. अगोदर तरुण मुलींशीं बोलण्याची संधि मिळावी याकरितां हिकमती लढविणाऱ्यांपैकीं तो नव्हता. पण तरुण मुलींशीं बोलण्याचे जे प्रसंग येत त्यांत बहुधा औपचारिकपणाचा भाग अधिक असे. आणि अनौपचारिक संबंधांत बहुधा भगिनीप्रेमाचें मिश्रण बरेंच झालेलें असावयाचें. जिवाला चटका लावणारी ही बालयुवती प्रथमच एकांतांत सांपडली, तेव्हां तो मनांत तर थोडा अस्वस्थ झाला होता. पण ती अस्वस्थता प्रकट न होऊं देतां तो वरकरणी हुशारी आणून म्हणाला —

"आपण म्हणे आमच्यावर रागावलां आहांत ?"

" कुणीं सांगितलं हें तुम्हांला ?" सुलभानें एकदम चपापून विचारलें.

" छायाताई म्हणत होत्या."

" म्हणजे माझं पत्र पाहिलंत वाटतं. मी आतां विचारीन छायाताईला..."

" अरे हो हो....एकदम असं रागावूं नये. पत्राची गोष्ट मला माहित सुद्धां नाहीं. पत्रांत कांहीं लिहिलं होतंसं वाटतं माझ्याबद्दल ?"

सुलभा रागावल्यासारखा चेहरा करून बसली. कांहीं बोलेना.

" सुलभा, अधीरपणानं रागावून तूं एकदम भलत्याच कबुल्या देऊं लागतेस. आतां सांगतों खरं. तूं माझ्यावर रुष्ट आहेस असं तुझ्या पत्रावरून दिसतं हें छायाताईनींच मला सांगितलं पण मीं पत्र पाहिलं नाहीं. प्रथम वाटलं पाहावंसं. पण मग पाहण्याची मला गरज वाटली नाहीं. तूं माझ्यावर रुष्ट झालीस हेंदेखील मला सुचिन्ह वाटतं. उगीच का कुणी कुणावर रागावतं ?"

यावेळीं सुलभा एकदम प्रफुल्ल झाली. आपले चिमुकले हात मांड्यांत घेऊन पायाला मिठी घालीत किंचित् हंसून ती म्हणाली, " बरं, द्याना छायाताईनं काय दिलं आहे तें."

" देतों देतों, तें दिल्याशिवाय कांहीं मी जात नाहीं. मीं लागलीच निघून जावं अशी तुझी इच्छा आहे का ?"

सुलभानें दुसरीकडे पहात आणि ओठांनीं हंसें दाबत 'नाहीं नाहीं' अशा अर्थानें मान हलविली.

"मग झालं तर. सुलभा, तूं माझ्याशीं मोकळेपणानं वागत नाहींस ही माझी तक्रार तुला रास्त वाटते का ?"

"मला लेखाताईसारखं किंवा छायाताईसारखं तुमच्याशीं बोलतां नाहीं येत हो. तुमच्याशीं बोलायचं म्हणजे त्यांच्यासारखी कुशलता हवी."

"सुलभा, ती म्हणजे तशा प्रकारची कुशलता तुझ्याकडून मी कधींच अपेक्षित नव्हतों. पण इतरांशीं बोलतांना तूं कुरणावर बागडणाऱ्या हरणासारखी खेळकर असतेस, आणि मला पाहिलं कीं तो तुझा खेळकरपणा हरणाच्या पायांनींच पळ काढतो, असं कां बरं ? तूं रागाव, कडू शब्द बोल, टीका कर; पण असा अबोला धरूं नकोस. चांगलं वाईट न कळतां वाटेल त्यावर फिदा होणं हा तुझा दोष आहे,

आणि यावर मी टीकाहि करतों नेहमीं. पण वाईटाच्या जाळ्यांत तूं सांपडूं नयेस याची किती तळमळ मला लागलेली असते हें तुला ठाऊक नसलं तरी शशांक, प्रकाश, किंवा छायाताई यांना त्याची चांगली जाणीव आहे. सोडशील ना माझ्या-वरचा राग ? ”

हें सर्व भाषण सुलभा खालीं जमिनीकडे पहात ऐकत होती. किशोरचें बोलणें संपतांच एका मिनिटानें तिनें वर पाहिलें. त्यावेळीं विश्वास, कांहीं सलज्जता, आनंद, हास्य यांचा जो मिश्र भाव तिच्या चेहऱ्यावर दिसत होता त्यामुळें तिची मोहकता असाधारण वाढली होती. किशोर स्तिमितच झाला—

“ मी उघडूं का ती बॅग ?” सुलभा अगदीं अधीर होऊन म्हणाली.

“ हो, हो. घे. फार अधीर झालेली दिसतेस. अच्छा येतों मी.” इतकें म्हणून तिच्याकडे प्रेमभरानें पहात किशोर बाहेर पडला.

सुलभानें बॅग उघडली. तीमध्यें चित्रविचित्र रंगांचे कटके, तऱ्हेदार झूल, उत्तर हिंदुस्थानी जरीचे नाजुक चढाव, आणि एकदोन पुस्तकें होतीं. सुलभाचें पोरमन त्या छायाच्या देणगीनें अतिशय आनंदित झालें. कटक्यांचे खिडकीला पडदे करावे कीं उशांना अभ्रे करावे, हे झूल कोणत्या पातळावर विशेष खुलून दिसतील, जरीचे चढाव आजच वापरायला काढावे कीं कॉलेजच्या गॅदरिंगपर्यंत तसेच ठेवून द्यावे या विचारांत तिला वेळ किती झाला याचें भान राहिलें नाहीं. “सुलभा, आज कॉले-जाला नाहीं का जायचं ? ” असें खालून रमाकाकूंनीं विचारलें तेव्हां घाईघाईनें बॅग आपल्या खोलींत नेऊन ठेवून ती खालीं गेली.

## .१३. चित्रलेखाचीं स्मृतिचित्रें

चित्रलेखाचें जीवन एकंदरीनें साधें दिमत असलें तरी तिचा स्वभाव रहस्यमय होता. पण रहस्यमय स्वभावाच्या माणसांतील विकृति मात्र तिच्या वागण्यांत कधींच दिसत नसत. बोलतां बोलतां मुग्ध होऊन विचारांत गढून जाणें किंवा क्षुल्लक कारणावरून श्रमी होणें असें तिच्या बाबतींत कधीं होत नसे. समाजांत मिसळण्याची मुळींच आवड नसलेली चित्रलेखा चार मित्रमंडळींत आली म्हणजे हंसून खेळून वागे. चित्रलेखा जितकी गंभीर, विचारी, आणि उदासीन तितकी सुलभा उथळ, पोरकट, आणि समाजप्रिय होती. तरी देखील सुलभाला लेखाताई मनमोकळी आणि आपल्या वृत्तीची वाटे! चित्रलेखानें आपली खरी मनोवृत्ति ( वागणुकींत कडवटपणा न येऊं देतां ) किती गुप्त राखली होती याची यावरून कल्पना येईल.

तथापि सुस्वभावी परंतु विकारी माणसें कांहीं दुःखद अनुभवांनीं अंतःकरणांत जायबंदी झालेलीं असलीं, म्हणजे मधून मधून येणाऱ्या उद्वेगाचे झटके त्यांना अत्यंत तापदायक होतात. बाह्यतः आनंदी राहण्याचा प्रयत्न करीत असतां अंतरात्म्याचे जे हाल होतात त्यांची प्रतिक्रिया सुरू होते; आणि एकांतांत असह्य यातना होऊं लागतात.

गेल्या दोन तीन दिवस चित्रलेखा अस्वस्थच होती. कल्याण स्टेशनवर झालेल्या छायाप्रकाश–मीलनाची किशोरनें सांगितलेली ओझरतीच हकीकत तिचें मनःस्वास्थ्य बिघडविण्यास पुरेशी झाली होती. त्यांतच एक महत्त्वाचें पुस्तक शोधत असतां तिला एक चांदीचें तारक–चिन्ह सांपडलें. याच तारक संघाचे आपण एके काळीं सभासद होतों आणि तेव्हां प्रेम आणि अध्यात्म यांच्या नंदनवनांत कसा विहार

केला याची आठवण आज तिला झाली ! आणि आजच सकाळीं आपल्या टेबलाची सफाई करीत असतां अनेक दिवस जपून ठेवलेली नक्षीदार फुलदाणी खालीं फरशीवर पडून तिचे तुकडे तुकडे झाले! प्रकाशनें नजर केलेली ती फुलदाणी तिला अत्यंत प्रिय होती. फुलदाणीबरोबर आपलें अंतःकरणहि शतधा विदीर्ण होत आहे असें तिला वाटलें.

कित्येकदां दुःख वाढविण्याची एक घातुक हौस माणसांत बळावते. भीतीप्रमाणें दुःखांतही एक चमत्कारिक मोहिनी आहे. दोन तीन दिवस लहानसान घटनांनीं चेतविलेल्या भावनावर पाणी घालावयाचें सोडून चित्रलेखानें ज्वाळा अधिकच उंचावत जातील असा प्रयत्न केला. आपल्या पेटींत अगदीं कपड्यांच्या तळाशीं ठेविलेली डायरी काढून तिनें अगदीं पाहिल्यापासून उतारे वाचण्यास सुरवात केली. पूर्वकालीन रम्य गोष्टींची स्मृति क्वचित्च सुखावह होते. ती सुखावह होण्यास आपलें प्रीतिरसायन झालेलें माणूस बरोबर असलें पाहिजे. लंकेहून पुष्पक विमानांतून सीतेसह येत असतां, गोदावरी परिसरांतील जीं ओळखीचीं रम्य स्थळें सीतेला दाखवितांना रामचंद्रांना आनंद होत होता, तींच स्थळें पूर्वीं सीता नाहींशी झालेली असतांना पाहत असतां रामचंद्र विव्हल नाहीं का झाले ? प्रियजनाच्या संगतीशिवाय स्मृतींच्या प्रांतांत सहसा शिरूं नये. पण चित्रलेखानें ती चूक जाणून बुजून केली. आतां काय इलाज ?

सात आठ वर्षांच्या मागील होतीं तीं स्मृतिचित्रें. "...आंबराईचें रम्य स्थळ. अजून पहाटेचें धुकें पुरतेंसें दूर झालेलें नाहीं....वर्डस्वर्थनें वर्णन केल्याप्रमाणें दूरवर पसरलेल्या शांत शहरांत, जगदात्मा ( The Mighty Soul ) अद्याप झोपलेलाच दिसतो आहे...मध्यभागीं आसनावर एक शांत चेहऱ्याचा तरुण बुद्धाप्रमाणें बसला आहे. चेहऱ्यावर शांतता आणि समाधान असें कीं नुकतीच यानें समाधि विसर्जन केलेली असावी. समोरच्या धूपपात्रांतून निघालेली धूमरेषा सावकाश वळसे घेत वर अनंतांत विलीन होण्यास चालली आहे. पांढरीं पातळें नेसून, केस पाठीवर सोडून भक्तियुक्त चेहरे करून बसलेल्या मुली. पहाटेचीं न्हाणीं झाल्यामुळें त्यांच्या चेहऱ्यावर तजेला आणि तांबूसपणा दिसतो आहे.......

" रघुनंदन ( त्या तरुणाचें नांव ) बोलूं लागले—

'या चराचरावर सत्ता गाजविणारी एक अदृश्य शक्ति आहे. त्या शक्तीचे प्रतिनिधी–कांहीं पुण्यात्मे तुमच्या आमच्या जीवनाचा ओघ पूर्णावस्थेकडे नेण्याची

अहर्निश खटपट करीत असतात.......त्यांच्या त्या खटपटीला मदत करणें हें तुमच्या आमच्याच नव्हे तर एकंदर जगताच्या हिताच्या दृष्टीनं आवश्यक आहे,–सत्य आणि सौंदर्य यांची उपासना,....प्रेमाचें पूजन हींच त्या मदतीचीं साधनें....' अशा प्रकारें सुरुवात करून अंतःस्फूर्ति झाल्याप्रमाणें रघुनंदन प्रवचन करूं लागले. भावनेच्या भरांत ते बोलूं लागले म्हणजे त्यांच्या चेहऱ्यावर संताप, आवेश, कळकळ यांच्या बदलऱ्या छटा एकामागून एक अशा येत. आतां हे मूर्च्छित पडतात कीं काय अशीहि भीति वाटे !...."

"—प्रार्थना संपून घरोघर जातांना रघुनंदन मला पोंचवायला आले. त्यांच्याकडे एक श्रद्धाळू कटाक्ष टाकून मीं विचारिलें, " नंदन, तुमच्या पदवीला आम्ही कधीं काळीं पोचूं का हो ? " तेव्हां नंदनांनीं हात जोडले आणि लवून शालीनपणें आणि कळवळ्यानें म्हणाले, 'वेल मदाम, प्लीज् डोन्ट् प्रेझ् मी लाइक् दॅट. प्रेमाचा मार्ग हा ज्ञानाच्या मार्गापेक्षां जवळचा आहे. आम्ही जिथं पोचावं अशी इच्छा करतों तिथं तुम्ही अगोदरच जाऊन पोचलेल्या आहांत." या स्तुतीमुळें माझ्या चेहऱ्यावर कोणते फरक होतात हें सूक्ष्मपणें पहात रघुनंदन उभे होते.—"

त्या वर्षांतल्या कितीतरी गमती चित्रलेखाच्या त्या वहींत होत्या. रघुनंदनांच्या सांगण्याप्रमाणें आपण आपला दैनिक कार्यक्रम कसा आखूं लागलों याची सर्व नोंद तिनें केलेली होती. हस्तांदोलन करतांना देखील दुसऱ्याच्या अंतःकरणांतले चांगले प्रवाह आपल्या अंतःकरणामध्यें शिरण्यास बोटांची विशिष्ट चाळवाचाळव करण्यास आपण चुकत नव्हतों, आणि रात्रीं झोपतांना सूक्ष्म शरीर परमात्म्याला भेटावयाला जातें म्हणून मनाची प्रसन्नता राखण्याकरितां सुंदर शुभ्र पोषाख करण्यांत कधींहि कसूर केली नाहीं. ही सर्व हकीकत वाचून तो काळ चित्रलेखाच्या डोळ्यांपुढें मूर्तिमंत उभा राहिला. अड्यारला जातांना, रघुनंदनांनीं सर्वच स्त्रियांची विशेषतः आपली दक्षतापूर्वक कशी चौकशी केली, हें नमूद करून तिनें पुढील उद्गार लिहून ठेविले होते—

"या विशेष आस्थेवाईकपणाचा अर्थ मी काय समजूं ? पहांटेच्या वेळीं मला थंडी बाधूं नये म्हणून रघुनंदनांनीं एका स्टेशनवर मुद्दाम आपला स्कार्फ मला दिला. ललिता, मधु यांच्यादेखील लक्षांत आलें तें ! रघुनंदनांचें हृदयच भावनाप्रधान आहे कीं माझ्याच विषयीं त्यांना ज्यास्त आकर्षण वाटतें ? बुद्धीचा निर्णय होत

नाहीं. हे प्रियकर गुरो, याहि बाबतींत तूं मला मार्गदर्शन करशील का ? अध्यात्मांत दिशा दाखवून प्रेमांत आंधळीच ठेवणार का तूं मला ?"

*   *   *

या पुढील उताऱ्यांतून आपण रघुनंदनांच्या अंतःकरणांत शिरण्याचा कसा यत्न केला आणि रघुनंदन नुसते सौजन्यानें कसे वागत याचा करुण इतिहास होता. रघुनंदनांचें चित्रलेखावर प्रेम होतें कीं नाहीं हें गूढ कधींच कोणास उमगलें नाहीं. खुद्द रघुनंदनांना तरी आपल्या मनाचा अंदाज एवढ्या बाबतींत लागला असता कीं नाहीं कोणास ठाऊक ? ते सर्वांनाच सौजन्यानें वागवीत आणि प्रत्येकाशीं कळवळयानें बोलत. चित्रलेखानें या त्यांच्या गोड वर्तनांतूनच प्रेमाचा अर्थ काढला नसेल ना ? इतर मैत्रिणी लहान, अल्लड, अजाण. समंजस अशी काय ती चित्रलेखाच होती. साहाजिकच रघुनंदन तिच्या बुद्धिप्रभावावर थोडे लोलुप असत. चित्रलेखा बहुधा याच गोष्टीला प्रेम समजली. या प्रकरणीं शेवटचा उतारा असा होता—

"...नंदन, वर्षा दीड वर्षांतच तुमची आध्यात्मिक भावना सुटली आणि तुम्ही देशभक्तीच्या मार्गांत शिरलांत. तुमची पुण्याची वसतीहि हलली. तुमचें दर्शन दुर्लभ झालें. एकदां पुण्यांत सभेला आलांत तेव्हां सहज तुम्हांला भेटायला म्हणून आलें. तेव्हां नेहमींप्रमाणेंच हंसून तुम्ही माझें स्वागत केलेंत. तीच अर्धोन्मीलित दृष्टि, तेंच हास्य, तीच शालीनता, आणि तीच कळकळ ! पण बोलण्यावरून मात्र मला कळून चुकलें कीं तुम्ही पूर्वींइतकेहि मला जवळ नाहीं. नव्हे नव्हे, याच वेळीं मला कळलें कीं पूर्वींदेखील तुम्ही मला मुळींच जवळ नव्हतां ! माझ्या प्रेमाच्या रसायनानें तुमच्या सौजन्याचें मीं प्रेमांत रूपांतर करून घेतलें होतें. पण तें माझ्या स्वतःच्या कल्पनेच्या जगांतच, तुमच्यांत बदल असा मुळींच झाला नव्हता..... केवढी किंमत देऊन हा निराशेचा निष्कर्ष विकत घ्यावा लागला !!"

*   *   *

मध्यंतरीं कितीतरी महिने चित्रलेखानें कांहींच लिहिलें नव्हतें. निराशेमुळें एक तऱ्हेची निष्क्रियता येते तशी तिला आली होती. झाल्या गोष्टींवर विचार करीत आणि दररोजचे व्यापार यांत्रिक पद्धतीनें करीत ती दिवस काढीत होती. सुस्वभावी माणसें निराशेच्या आहारीं गेल्यानंतर विरंगुळा म्हणून पुष्कळदां लोकसेवेकडे

वळतात. चित्रलेखानें तेंहि करून पाहिलें. परंतु आपण स्वतःला विसरण्याकरितां हें काम करीत आहोंत ही जाणीव सदैव टोंचत असल्यामुळें सार्वजनिक कामांत तिचें मन लागेना, आणि विकारांनीं तरी तिला कुठें एकटें सोडलें होतें ?

चित्रलेखा पुढें वाचूं लागली.—

" आज किशोरनें एक नवीन बॅरिस्टर चहाला आणले होते. काळे सांवळे, उंच हाडापेराचे, आणि दिसायला बुद्धिमान्. युरोपियन् धर्तीचा होता त्यांचा वेष. चेहऱ्यावरून अबोल वाटत, पण बोलतांना कमालीचे मनमोकळे. त्यांचें हास्य स्फोट झाल्यासारखें पण अति निर्मळ. या मानानें रघुनंदन कृत्रिमच नव्हते का ?..."

" .... आज मी, बॅरिस्टर पद्माकर, आणि किशोर उघड्या व्हिक्टोरियांतून येत होतों. ललिता आपल्या बंगल्याच्या पोर्चमधून पहात होती. तिच्या त्या मिस्किल हासण्यांत किती गूढार्थ भरला होता ! माझ्या पायाजवळ पद्माकरांनीं अर्धवट ओढून टाकलेली सिगारेट पडली होती. त्यांच्या ओठांनीं चेपून गेलेल्या त्या सिगारेटच्या तुकड्याकडे मी उगाचच पहात होतें..."

" पद्माकर किती अकृत्रिम आहेत. पण त्यांच्याशीं बोलावं कसं ! अंतःकरणांत खळखळणाऱ्या भावनांना शब्द रूपानें वाट दिली तर असें वाटतें कीं त्या प्रवाहांत पूर्वीप्रमाणेंच आपलें मनोराज्य पुनः वाहून जाईल. त्यापेक्षां मौन बरें. पण मौनानें पद्माकरांना माझें मन कसें कळणार !...यांनींच नको का तोंड उघडायला ! शॉसारखा एकादा विचित्र माणूस सोडला तर बहुधा सर्व विचारवंत माणसें असेंच नाहीं का म्हणत आलीं कीं, पुरुष शिकारी आहे ! पण पद्माकराचें कांहीं वेगळेंच. "

याहि प्रकरणाचा शोकान्त वाचल्याखेरीज तिच्यानें राहवेना. आपण पूर्वीच्या कटु अनुभवानें सर्वच बाबतींत कसे उदासीनपणें वागत आलों, त्या उदासीनपणांतहि विकारांचीं वादळें उमटल्यामुळें आपल्या वागण्यांत कसा तऱ्हेवाईकपणा येत गेला, आणि याच साऱ्या गोंधळांत पद्माकरांना आपण गमावून बसलों, हें सर्व वाचत असतां चित्रलेखाला त्या एकांतांत भयाणपणा वाटूं लागला.

पुढील गोष्टी तिनें लिहिल्या नव्हत्या, तरी त्या अगदीं अलीकडच्या असल्यानें अगदीं स्पष्ट दिसत होत्या. सकाळीं चिखलांत उमटलेलीं गुरांचीं पाउलें दुपारच्या उन्हांत चिखल वाळल्यावर जशीं कायम राहतात, तद्वत् त्या ताज्या स्मृति राहिल्या

होत्या. प्रकाशचा लौकिक चहूंकडे फाकूं लागल्यानंतर चित्रलेखा किती आशेनें त्याच्याकडे पहात होती. किंबहुना प्रकाशइतका जवळचा युवक तिच्या सहवासांत आलाच नव्हता. पण प्रकाश ध्येयवादी होता. त्याच्या आयुष्यांत स्थैर्य म्हणजे अनिश्चितपणालाच. ध्येयाच्या वाळवंटांत हिंडणाऱ्या या कारवानाला एकादें प्रचंड वाळूचें वादळ केव्हां गडप करील याचा नेम नव्हता. सुखाबद्दल इतकी बेफिकीर राहण्यास चित्रलेखा तयार नव्हती, आणि म्हणूनच तिचा निर्णय होईना.

पण दैवाला कोणाचा निर्णय होईपर्यंत वाट पहाण्याचा धीर कुठें असतो ? छाया-चा उदय प्रकाशाच्या जीवनक्षितिजावर झाला. त्यांचीं परस्पराकर्षणें, अनुरूपता, भेटीगांठी...सर्वच कांहीं त्यांच्या चिरमीलनाला अनुकूल होतें, आतां आपलें स्थान कोठें आहे ! आपल्या अंतःकरणावरून प्रकाश हळू हळू अदृश्य होत आहे हें तिला स्पष्ट दिसत होतें, आणि संध्याकाळ येत चालली म्हणजे सावल्या जशा लांब होत जातात, त्याप्रमाणें पूर्वींच्या आठवणी अधिक मोठ्या आणि अधिक भेसुर झाल्यासारखें तिला वाटत होतें ! रघुनंदनांचा स्नेह मृगजळवत् ठरला, विकारांच्या तांडवांत पद्माकर दुरावले, आणि सुखलालसेला ताब्यांत न ठेवतां आल्यामुळें प्रकाश पारखा झाला !

भूतकालावरून वाहात आलेल्या स्मृतिमेघांनीं अखेर वृष्टि केलीच ! दोन हातांच्या तळव्यांत डोकें धरून बसलेल्या चित्रलेखाच्या पुढ्यांतील डायरी भिजून चिंब झाली !

## .१४. प्रतिमारेखन

आज सकाळीं शेवंती चित्रमंदिरांत आली तेव्हां तिची गोंधळलेली मनोवृत्ति आणि तीमुळेंच अधिक खुलणारें सौंदर्य कोणाच्याहि ध्यानांत येण्यासारखें होतें. रात्रीं संपलेल्या वादळानंतर आकाश स्वच्छ होऊन रम्य प्रभात उगवावी म्हणजे, ती सुखनिद्रेंतून उठलेल्या रसिकाला जशी अप्रतीम वाटते तसें शेवंतीचें आजचें सौंदर्य होतें. शशांक गॅलरींतून तिला न्याहाळीत होता. सहा वर्षांपूर्वी तिला प्रथम पाहिल्याची शशांकला आठवण झाली. त्यावेळीं लगीनचुडा आणि हिरवेंगार लुगडें अशा वेषभूषेंत शोभणारी ती किशोरी आज प्रौढ दशेस आली होती. पण तेव्हांहि शेवंती फुलपांखरासारखी खेळकर होती असें नाहीं. तिच्या सौंदर्याला अधिकच रम्यता देणारें आणि स्त्रीत्वाला कमालीचा उत्कटपणा आणणारें कारुण्य त्याहि वेळीं तिच्या चेहऱ्यावर ओसंडत होतें. किंचित् अधोवदन करून उभें राहणें, सारा भाव डोळ्यांत आणून मधूनच वर पाहणें, मर्यादशील उत्तरें अडखळत देणें इत्यादि सर्व कांहीं त्यावेळींहि होतें. पण आज त्या सर्व नैसर्गिक आकर्षकतेवर संस्कार झाले होते. कलेच्या निमित्तानें कां होईना पण शेवंतीच्या वेषभूषेंत क्रांति झाली होती. कलेच्या करणीनें पाषाणाचा देव होईल, मग मुळांतच देव असलेली व्यक्ति किती कांतिमान् होईल हें सांगणें नकोच !

आज शेवंतीला मोठेंच दिव्य करावयाचें होतें. चारपांच दिवस विद्यार्थ्यांना धडे देऊन झाल्यानंतर आज खुद्द शशांकच शेवंतीचें प्रतिमारेखन करणार होता. चित्र-मंदिराला सुटी होती त्यामुळें विद्यार्थी कोणीच आले नव्हते. चित्रमंदिरांत शशांक

आणि शेवंती दोघेंच काय तीं! दोघांनाही प्रथम थोडें भय वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

"आज तुला किती वेळ आहे?"

"मला आतां ५–६ दिवस सुटीच आहे. एक मोठा सीन सुरू आहे. त्या सीनमध्यें मला कांहीं काम नाहीं. तसं आम्हांला घरीं राहतां येत नाहीं, पण मीं घेतली आहे सुटी."

"मग आज कांहीं तुला घाई नाहीं."

शेवंतीनें मानेनेंच 'नाहीं' म्हणून सांगितलें.

शशांक मोठ्या उल्हासानें बैठकीची व्यवस्था करूं लागला.

प्रथम मध्यभागीं मांडलेल्या उंच आसनावर त्यानें शेवंतीला बसण्यास सांगितलें. मग भोंवतालच्या खिडक्यांची उघडझाप करून पाहिजे तशी छायाप्रकाशाची योजना करून घेतली. डोक्यावरून पदर न घेतां खांद्यावरून घेण्यास त्यानें शेवंतीला सांगितलें. शेवंतीनें थोडें लाजून तसें केलें. पण लांबसडक वेणी अद्यापि पदराखालींच होती. शशांकच्या विनंतीवरून ती शेवंतीनें खांद्यावरून हातांत येईलसें केलें.

इतक्यांत तिच्या मनांत कसलीशी शंका आली. तिचें सर्वांग थरारलें. तिनें भीत भीत विचारलें.

"दादा, चित्र तयार झाल्यावर तुम्ही याचं काय करणार?"

"प्रदर्शनांत पाठविणार आहें! कां, तुला काय वाटतं घरांत ठेवीन म्हणून?"

"तसं नाहीं....पण प्रदर्शनांतून परत तुम्हीच आणणार ना?"

"नाहीं. कोणीतरी विकत घेतं बहुतेककरून. मागं काढलेलं तें चित्र तुला ठाऊक आहे ना? त्याचे अडीचशें रुपये मिळाले. घेतलेंन् मुंबईच्या एका हौशी माणसानं."

"होय का?" असें म्हणून शेवंतीनें एक कौतुकादरमिश्रित दृष्टिक्षेप टाकला.

"हें तसंच विकलं जाईल का?" शेवंतीनें विचारलं. तिच्या मनांत कसली तरी खळबळ चालली होती आणि त्या खळबळींतून हे प्रश्न निघत होते. पण शशांकच्या तें नीटसें लक्षांत आलें नाहीं. निसर्गतः कमनीय असलेली ही सुंदरी कलेच्या संस्कारानें अधिकच आल्हादकारक होऊन आपल्याकडे आली. भरपूर वेळ; गूढ एकांत; खिडकींतून बाहेर डोकावावें तों पावसाळी हवेनें सारी सृष्टि तजेलेदार झालेली दिसत

आहे; अशा स्थितींत शशांकचें अंतःकरण उत्फुल्ल झालें होतें. त्या मोहक वातावरणानें हेलकावे खाणारी त्याची सौंदर्यलोलुप वृत्ति व्यवहारी जगापासून फार दूर निघून आली होती. व्यवहाराच्या नियमाची मात्रा चालणार नाहीं इतका तो दूर होता. अर्थात् शेवंतीच्या भयकंपित मनाचा अंदाज त्याला कसा लागणार ?

—आणि म्हणूनच शेवंतीच्या प्रश्नाचा अर्थ त्यानें वेगळाच केला. आपल्या सौंदर्याचें चित्रण आपल्या जिवाभावाच्या कुशल चित्रकारानें करावें आणि तें कोणीं-तरी पैशाच्या मोलानें खोली शृंगारण्यासाठीं घेऊन जावें हें शेवंतीला रुचलें नसावें असा शशांकनें तर्क केला. तो हंसतच म्हणाला,—

"तुला तसं वाटूं देऊं नकोस. हें चित्र मी कोणाला देणार नाहीं."

"नाहीं, तसं नाहीं दादा. तुम्ही प्रदर्शनांत पाठवा. घेऊं दे आवडेल त्याला विकत. तें तुमच्याजवळ असणं बरं नाहीं."

आतां शशांक थोडासा भानावर आला. शेवंतीचें चित्र कितीहि अनुपम रेखाटलें, तरी तें आपल्या संग्रहीं ठेवणें जगाच्या दृष्टीनें कसें गैर आहे हें साधारण त्याला कळलें. तो विचारमग्न होऊन शेवंतीच्या तोंडाकडे पाहूं लागला. तिच्या अंतःकरणांतील संशयजाल अद्यापि दूर झालेलें नव्हतें.

"चेहरा अगदीं हुबेहूब काढणार का ?"

"मी नाहीं समजलों तुझ्या म्हणण्याचा अर्थ ?"

"म्हणजे चेहऱ्यावरून हीच शेवंती असं ओळखूं येईल ?"

"वाः !" शशांक हंसून म्हणाला, "ती तर खरी करामत."

"मग चेहरा तेवढा बदला ना."

शेवंतीच्या सूचनेचा गूढार्थ शशांकला उमगला. त्यानें पुनः वेगळ्या पद्धतीनें तिला बसावयास सांगितलें. तिनें पायाची ऐटदार मिठी घातल्यानंतर मांडीवर पातळ अगदीं साफ बसलें. चित्ररेखनाच्या दृष्टीनें त्या ठिकाणीं सुरकुत्या पाहिजे होत्या. शशांकला केव्हां आतां आलेखन करीन असें झालें होतें. तो पुढें झाला. त्यानें शेवंतीच्या गुढघ्यावरून तिचें पातळ किंचित वर ओढलें आणि मांडीवर सुरकुत्यांची नक्षी काढली. शेवंती लाजेनें चूर झाली. तिला शशांककडे पाहवेना. हृदयाचें स्पंदन जोरानें होत होतें. ती खिडकींतून बाहेर पाहूं लागली.

शशांक धुंद झाला होता. " ऑल राईट...तुला आतां चेहरा नको ना यायला चित्रांत ? मग मी सांगतों तसें कर. केस सोडून त्यांतले बहुतेक चेहऱ्यावर येतील असें कर. "

लज्जेचे दोन तीन बहर येऊन गेले. आतां शेवंतीला जरा धीटपणा आला होता. तिनें दोन्ही हातांनीं डोक्यांतले आंकडे भराभर उपसून काढले. असें करतांना हातांचीं कोपरें उंचावलीं जाऊन तिच्या नाजुक दंडाची खालची गौरतर बाजू शशांकला फारच मोह पाडूं लागली. शेवंतीनें झपझप पेड उकलून केस मोकळे केले, आणि मर्यादा किंचित् बाजूस सारून ती सहास्य मुद्रेनें शशांकला म्हणाली,

" तुम्हांला पाहिजे तसे घ्या केस. "

थोड्याच वेळापूर्वी बेहोष होऊन त्यानें शेवंतीच्या मांडीवर पातळाला सुरकुत्या पाडल्या. पण आतां तिची अनुज्ञा झाली असून तो जरा बिचकल्याखेरीज राहिला नाहीं, अर्थात् थोडा वेळच. त्यानें विपुल केशकलापांच्या लब्या शेवंतीच्या तोंडावर घेऊन व्यवस्थित पसरल्या. डोळ्यांचा फुगवटा, नितळ कपाळ, कमानदार भुवया एवढेच तिचे सौंदर्यविशेष त्या केसांच्या आवरणांतून दिसत होते. एवढें काम करण्यास अर्धा मिनिटहि लागलें नसेल. पण शशांकला अपूर्व अनुभूतीनें वेडें केलें. व्यवहाराचें रुक्ष वाळवंट सुखकर, उत्साही, आणि शीतल करण्याचें सामर्थ्य त्या रेशमी सुगंधित, गारशा केशकलापांत होतें. केसांच्या आच्छादनांतून दिसणाऱ्या शेवंतीच्या अस्पष्ट मुखमंडलावर रक्तिमा दिसत होती. पहांटे अंधार दूर करीत उगवणारी उषा गर्द झाडीच्या झरोक्यांतून दिसावी, तसा तो देखावा पाहून शशांक स्तब्ध उभा राहिला.

पण मग लगेच तो उपकरणें घेऊन सज्ज झाला.

प्रथम हालचालीच्या थोड्या सूचना देऊन त्यानें पेन्सिलीचीं २–३ रेषाचित्रें काढलीं. नंतर त्यांतलें एक कायम करून स्थूल रेखन करून घेतलें आणि इतर बारिकसारिक छटांच्या जागा रेखाटून कुंचली हातांत घेतली. दिसेल तसें रंगवावें आणि दिसेल त्याला दिव्यत्व द्यावें, या दोन विरुद्ध कल्पनांच्या गोंधळांत आज शशांक मुळींच सांपडला नाहीं. पृथ्वीवर स्वर्ग नाहीं म्हणून कल्पनेच्या आधारें स्वर्ग रंगवावयाचे, पण प्रत्यक्ष स्वर्गांतच गेल्यानंतर कल्पनेची मदत कशाला ? शेवंतीची मूर्ति आहे तशीच रेखाटण्याचा त्याचा प्रयत्न होता.

तसें पाहिलें तर असें प्रतिमारेखन शशांकला नवीन होतें असें नाहीं. आर्टस्कूलच्या अभ्यासक्रमांत तर हीं कामें नित्याचींच असत. परंतु मुंबईला एका दोघां मैत्रिणींचींही चित्रें शशांकनें रेखाटलीं होतीं. त्या मैत्रिणींची मोकळेपणाबद्दल प्रसिद्धि होती. प्रतिमारेखनाकरितां त्यांनीं बसावें अशीं आर्जवेंहि शशांकला करावीं लागलीं नाहींत. शशांकनें गोष्ट काढतांच त्यांनीं आनंदानें संमति दिली होती. शशांक नेहमीं सर्वांना सांगे कीं, प्रतिमारेखन–अगदीं विवस्त्र प्रतिमारेखन–हीदेखील लोकांना वाटते तशी मादक गोष्ट नाहीं. कलावंत प्रतिमा रेखाटूं लागला कीं कलेच्या नादांत तो इतका गर्क होतो कीं समोर बसलेल्या स्त्रीच्या पार्थिव सौंदर्याचा त्याच्या मनावर कांहीं परिणाम होत नाहीं.

आज मात्र शशांक इतका निर्विकार होता कीं नाहीं कोण जाणे ! एकादें सुंदर शहर आपण पाहून आलेले असलों म्हणजे पुनः तेथें गेल्यावर आपलीं आवडतीं स्थळें प्रथम पाहून घेतों; तसें शशांकनें स्वतःला नित्य मोहिनी घालणारे शेवंतीचे सौंदर्यविशेष प्रथम चितारून घेतले. मधून मधून तो थांबे, विचारमग्न होऊन तिच्याकडे पाही, क्वचित् सुस्काराहि सोडी. आपण कितीहि काळ असेंच बसलों तरी हें चित्र पुरेंच होणार नाहीं असें त्याला वाटलें. त्यानें शेवंतीच्या हातावर गोंदलेली नक्षी आणि त्यांतलीं 'गंगा' हीं अक्षरें रंगवून पुरीं केलीं तोंच बाराचे ठोके पडले.

"शेवंती, पुरे आतां. थँक्स्. बारा वाजले. घरचं बोलावणं आलं तर सारा घोटाळा होईल."

"हो, तेंहि खरंच."

ती घाईघाईनें उठली. तिनें केस आवरून अंबाडा बांधला आणि ती जिन्यापर्यंत गेली.

"बरं दादा येतें मी."

"हो, पुनः यावं लागेलच तुला. हरकत नाहीं ना ?"

"छेः छेः" असें म्हणून पदर सावरीत ती जिना उतरून गेली.

---

## .१५. 'चंद्रग्रहण'

आणखी एकदोन बैठकींत शशांकनें चित्र पुरें केलें. नंतर शेवंतीला स्टुडियोंत निकडीचें काम असल्यामुळें तिला यायला सवड मिळणें कठीण होतें. म्हणून शशांकनें शक्य तोंवर आपलें चित्रण लौकर आटोपून घेतलें. इतक्या तल्लीनतेनें त्यानें आजवर एकादें काम क्वचितच केलें असेल. चित्र पुरें झाल्यावर शेवंतीनें जेव्हां पाहिलें तेव्हां तिला पराकाष्ठेचा विस्मय वाटल्यावांचून राहिला नाहीं.

चित्राला सुंदर चौकट बसविल्यानंतर शशांक आणि सुलभा यांनीं मिळून तें किशोरकडे नेलें. किशोरला शशांकच्या चित्रणचातुर्याचा परिचय आज अनेक दिवसांचा. पण तोहि या चित्रावर विशेष संतुष्ट झाला. " मला वाटतं पहिल्यानंच हें अगदीं मन लावून असं काम केलंस ! ' किशोर चेष्टेनें म्हणाला.

" काय रे याला एकादं नांव सुचव कीं."

" माझ्या सारख्या वकीलीच्या रूक्ष धंद्यांत पडलेल्या माणसाला हें काव्यमय काम कसं साधणार ?"

" टाळाटाळी करूं नकोस. तूंच तर आमच्यामध्यें सर्वांत अधिक रोमॅंटिक आहेस. "

इतका वेळ चित्राकडे बारीक दृष्टीनें पहात असलेली सुलभा एकदम मध्येंच म्हणाली, " चंद्रग्रहण. "

" दॅट्‌स् गुड....तुला कसं काय वाटतं हें नांव किशोर ? "

" वाः, . उत्कृष्ट. उगीच म्हटलं नाहीं, ' स्तवार्थ तुझिया तुझ्यासम कवी कधीं जन्मती ' असल्या अप्रतिम चित्राचं नामकरण चित्रासारख्या अप्रतिम माणसानंच करायला हवं." किशोर प्रसन्नपणें म्हणाला.

सुलभा अर्थातच थोडीशी लाजली. किशोर पुढें बोलूं लागला—" हें नांव फारच सार्थ आहे. पृथ्वी आपण होऊन मध्यें येऊन चंद्रावर छाया पाडते. शेवंतीच्या मुखचंद्रावर शशांकला अशी मुद्दामच छाया पाडावी लागली. खरं ना हें शशांक ? दुसऱ्या अर्थानं चंद्रानं म्हणजे शशांकनें लावलेलं ग्रहण तें ' चंद्रग्रहण ' ! "

" वाः आधुनिक मल्लीनाथ की जय ! " शशांक मोठ्यानें म्हणाला.

पण हें चित्ररेखनाचें काम संपतांच शशांक कांहींसा उदासीन झाला. शेवंतीनें चित्रमंदिरांत पाय ठेविल्यापासून तों चित्र पुरें होईपर्यंत गोड हेलकाव्यांत त्याचें मन आंदोलनें घेत होतें. दररोज तिची गांठ पडावी, तिचीं मोजकीं पण माधुर्यपूर्ण प्रश्नोत्तरें ऐकायला मिळावीं, लज्जेच्या पहाऱ्यांतून निसटलेले तिचे प्रेमळ कटाक्ष आपल्या उत्सुक नेत्रांतून हृदयांत जाऊन शिरावेत, आणि दुसरे दिवशीं पुनर्मीलन होईपर्यंत त्याच मधुर सहवासाच्या आठवणींत तल्लीन राहावें असें ८—१० दिवस चाललें होतें. शेवंती निघून गेली म्हणजे दुपारीं जेवणखाण आटोपून पुनः परत तो चित्रमंदिरांत येई, आणि चित्रणाचें काम करीत बसे. जणूं काय शेवंतीच्या गैरहजेरींत तिचा चित्रमय सहवास तरी आपणांला लाभावा असें त्याला वाटे. पण आतां चित्र पुरें झालें आणि शेवंतीचें दर्शनहि दुरावलें.

दुसरी हुरहूर प्रकाशविषयीं. प्रकाशला नागपुरला जाऊन बारा दिवसच झाले होते. शशांकसारख्या वृत्तीच्या माणसांना कायमचीं म्हणून कांहीं दृढ बंधनें असलीं तरी समोरच्या आकर्षक गोष्टींच्या मोहापुढें तीं बंधनें तात्पुरतीं तरी ढिलीं होतात. शेवंतीच्या प्रकरणीं रंगलेला शशांक कांहींकाळ प्रकाशला विसरला होता. पण शेवंती दूर होतांच पुनः प्रकाशच्या वियोगाची झळ त्याला जाणवूं लागली.

—आणि चित्ररंजनाच्या कैफांत देखील तो प्रकाशबद्दल विचार करीत नसे असें नाहीं. प्रकाशबद्दलची त्याची भक्ति अनन्यसाधारण होती आणि कोणत्याहि असामान्य स्त्रीला अथवा पुरुषाला शशांककडून तसें विभूतिपूजन मिळणें शक्य नव्हतें. प्रकाशवरील त्याच्या प्रेमाचें पृथक्करण करणें अवघड होतें. नेपोलियन, बाजी-

रावसारख्या सेनाग्रणीच्या हाताखालीं असलेल्या नवशिक्या सैनिकास आपल्या नायकाबद्दल जें आकर्षण असतें, त्याप्रकारचें हें प्रेम होतें असें म्हणावें तर त्यांत दूरपणा नव्हता; बंधुप्रेम म्हणावें तर त्यांत सख्याहून कांहींतरी अधिक होतें; आणि नुसतें मित्रप्रेम म्हणावें तर त्यायोगें शशांकच्या गाढ भक्तीचें स्वरूप शतांशानेंहि स्पष्ट होत नव्हतें. शशांकच्या स्नेहांत या सर्वच छटा कमी जास्त प्रमाणांत होत्या हें खरें, पण त्या सर्वांच्या समुच्चयाहूनहि आणखी कांहीं होतें आणि त्याचमुळें त्या स्नेहाला वेगळीच माधुरी आली होती. ह्या 'आणखी कांहीं'त सात्विक प्रणय हाच प्रभावी होता. शशांकच्या सर्व कोमल भावना त्याच्या कलात्मतेच्या साहाय्यानें प्रणयिनीचें रूप घेऊन जणूं प्रकाशची आराधना करीत. शशांकला कलेचा अहंकार नव्हता असें नाहीं, पण प्रकाशच्या पायीं तो अहंकार वाहण्याची त्याची सदैव तयारी असे. आपल्या कलेवर जग मोहित व्हावें हें त्याला वाटे खरें, पण प्रकाशाच्या पराक्रमाचे दुंदुभिनाद त्याला अधिक आनंद देत. फुलाचा सुवास आणि रंग पाहून जगानें वेडें व्हावें किंवा कवींनीं काव्यें रचावीं; फुलाला मात्र भ्रमर आपल्याकडे वळला म्हणजेच आपल्या नैसर्गिक गुणसंपदेचें सार्थक झालें असें वाटतें !

शशांक बेचैन झाला. शेवटीं त्यानें प्रकाशचीं छायाचित्रें गोळा केलीं आणि त्यांना नक्षीदार चौकटी बसविण्याचें काम काढून मनाला रिझविण्याचा प्रयत्न केला. स्टूडियोचें काम संपतांच जेवण करून तो आनंदभुवनांत गेला. प्रकाशच्या खोलीची किल्ली त्याच्या जवळ होतीच. शशांकनें खोली उघडली आणि तेथील सामान सुमान व्यवस्थित लावून त्यानें खोली अगदीं स्वच्छ केली. आपल्या खोलींतील व्यवस्थेचे बाबतींत बेफिकीर असलेला शशांक आज प्रकाशची खोली नीट कां लावीत होता कोणास ठाऊक ! खुद्द शशांकलाहि तें कारण सांगतां आलें नसतें !

खोली लावून झाल्यानंतर शशांक तेथील कॉटवर आडवा झाला. त्यानें एक पातळ चादर अंगावर ओढून घेतली, आणि झोप घेण्याचा तो प्रयत्न करूं लागला. काळ्या पट्ट्याच्या सोन्याच्या रिस्टवॉचनें विभूषित असलेला त्याचा कलानिपुण नाजुक हात काय तो उघडा होता. त्याच्या डोळ्यांवर निद्रेनें आपल्या पंखांची क्षणभर सांवली केली.

इतक्यांत किशोरला घेऊन प्रकाश वर आला. खोली उघडी पाहून तो एकदम लगबगीनें आंत आला. किशोर होताच त्याच्या मागें. पण प्रकाश आंत येऊन थबकतांच किशोरनें क्षणभर पाहिल्यासारखें केलें आणि एकदम म्हटलें, " वा; शशांक, म्हटलं मला न कळवितां प्रकाशनें ही काय भानगड केली ?"

शशांक डोळे चोळीत उठला.

" ग्रहण लागल्यास चन्द्र लुप्त होतो हें आपण पाहिलें आहे. पण ग्रहणामुळं चंद्राची चंद्रिका झालेली आजच पाहतों आहें. "

" तुझ्या डोक्यांत आज चंद्रग्रहणानं फार धुमाकुळ घातलेला दिसतो आहे." शशांक नीट जागा होऊन उभा राहत म्हणाला.

" जाऊं दे रे किशोर, त्याची काय सदा चेष्टा करतोस ?" प्रकाश हंसत उद्गारला.

" केव्हां आलास, प्रकाश ?"

" मी मोटरनें गांवांत दुपारीं बारालाच आलों, पण आमच्याबरोबर तो भाई सरताजअली होता. त्याला कँपांत जायचं होतं म्हणून आम्ही तिकडे मोटर नेली. इतक्यांत येतांना हे ॲडव्होकेट साहेब भेटले. म्हणाले जा जेवून. आपल्यासारख्या मजुराला काय ? भर बारा वाजतां कोणीं भाकरी दिली तर ती पाहिजेच. "

प्रकाशच्या येण्यानें शशांकची कळी खुलायला पाहिजे होती. पण झोंप घेण्यापूर्वी त्याच्या चेहऱ्यावर जी प्रसन्नता होती तीहि आतां लोपली होती. बाह्य जगाचीं कवाडें बंद करून शशांकचें अंतःकरण कोठेंतरी कल्पनासृष्टींत जाऊन आलें असावें, आणि तेथें कांहींतरी भयंकर प्रकार पाहिल्यामुळें श्रमी झालें असावें असें शशांकच्या चेहऱ्यावरून दिसत होतें. तो उतरलेल्या चेहऱ्यानेंच म्हणाला, " प्रकाश, तुझी सफर ठीक झाली ना ? कांहीं बोललाबिलला नाहींस ना कुठं कमीजास्त ! "

" नाहीं बुवा. आमचं नेहमीचं वक्तृत्व तुला ठाऊकच आहे. जातांना थेट नागपुरला गेलों. कल्याणला सभा झाली तिला किशोर हजर होताच. येतांना अमरावती, अकोला, जळगांव, नासिक या ठिकाणीं एकएक अशीं व्याख्यानें दिलीं. व्याख्यानें दिलीं म्हटल्यापेक्षां एकाच व्याख्यानाची रेकॉर्ड ठिकठिकाचीं लावली. तेंच तेंच प्रत्येक ठिकाणीं सांगायचं. "

शशांकच्या खिन्नतेचें निदान करण्यांत गुंतलेल्या किशोरनें एकदम गंभीरपणें विचारलें, " शशांक, आल्याबरोबर माझ्या नेहमींच्या स्वभावाप्रमाणें मीं चेष्टा केली; पण खरंच तूं फार अस्वस्थ दिसतोस. प्रकाशच्या आगमनानं उल्हसित होणारा तूं, आज असा म्लान कां बरं झाला आहेस ?"

" किशोर.... प्रकाश, कारण सांगितलं तर तुम्ही हंसाल. पण छातींतली धडधड अजून थांबत नाहीं. कायदेभंगाच्या वेळीं प्रकाशला दोन वेळां शिक्षा झाल्या. दोनहि वेळीं एकच एक भेसुर स्वप्न मला पडलं होतं. तेंच आज पडलं ! कदाचित् तें तितकं भेसुर नसेल, पण पुढें झालेल्या घटनांनीं त्या साध्या स्वप्नाला भेसुरपणा आला आहे..."

" असं असतं तरी काय तें स्वप्न ? "

" एक काळाकुट्ट थोराड गुराखी येतो आणि समोरच्या ' आंबराईत ' चरत असलेली सुंदर काळी गाय घेऊन शीळ घालीत आणि गाणें गात निघून जातो. त्याचे रक्ताळलेले डोळे, हास्य, आणि त्या गाण्यांत असलेली एकप्रकारची भयानकता मला अगदीं घाबरवून सोडते. ते सूर मला म्हणून दाखवितां यायचे नाहींत. पण कुठें ते मीं ऐकले तर माझा थरकांप उडेल. "

" अगदीं वेडसर आहेस तूं, शशांक." प्रकाश त्याच्या पाठीवर हात ठेऊन म्हणाला, " स्वप्नं आणि त्यांचे पडताळे या अगदीं जुन्या जमान्यांतल्या गोष्टी झाल्या. आपलीं मनं इतकीं का ठिसूळ राहिलीं आहेत आतां ? मला तर या तुझ्या भीतीचं हंसूंच येतं. "

" अरे, पुष्कळदां अपचन झालं तरीदेखील वाईट स्वप्नं पडतात." किशोर म्हणाला.

" हो, तें ठाऊक आहे. परंतु तेंच स्वप्न पुनः पुनः पडतं. तोच दाखला येतो. म्हणून त्याची मला दहशत बसली आहे."

"काय होईल या स्पप्नाचा परिणाम शशांक ? मी तुरुंगांत जाईन एवढंच ना ? मग त्यांत नवल का कांहीं घडणार आहे ?"

अगोदरच खिन्न झालेल्या शशांकला या निकराच्या भाषणानें अधिकच भिवविणाऱ्या प्रकाशचें किशोरला हंसूं आलें. पण तें प्रकट न करतां तो उसना उत्साह दाखवून शशांकला म्हणाला, "जाऊं दे रे शशांक! तुम्हां कलावंतांचीं मनं फारच जनानी असतात बुवा! एक स्वप्न तें काय पडतं आणि तूं अगदीं घाबरून काय जातोस? चल, आज कॅनॉटला जाऊं. प्रकाश सांपडला आहे बरेच दिवसांनीं मोकळा. 'It happened one night' ही सुंदर फिल्म आली आहे. आपण शो पाहूं. रात्रीं माझ्याकडेच जेवा आणि मग या गमतीनें..."

मुलाची जखम बांधतांना त्याचें चित्त दुसरीकडे नेण्यासाठीं डॉक्टर एकादी आल्हादकारक वस्तु पुढें करतात तसें किशोरनें केलें. पण आपल्या मनावरील दडपण पुरेसें निघालें आहे असें शशांकला वाटेना. स्वप्नांतले सूर पुनः कोठें ऐकायला येतील कीं काय अशी धास्ती शशांकला सारखी वाटत होती.

## .१६. 'अग्नये स्वाहा....'

लष्करच्या एका बाजूकडे असलेला शेट हिरालाल यांचा कारखाना अग्निप्रळयांत सांपडला!

ऐन पावसाळ्यांत कडक ऊन पडलें होतें!

मेघाचा एकादा लहानसा तुकडाहि आकाशांत नाहीं.

ज्वाळा भडकलेल्या!...तोफेचे गोळे सुटावेत तसे धुराचे लोट वर फेकले जात!

वाऱ्यानें तर रुद्ररूप धारण केलें होतें. त्यानें अगोदर दंडेली करून सर्व ढग पळवून लाविले, माणसांना मदत मिळणार नाहीं असें केलें, आणि नंतर ज्वाळा चेतविण्यास सुरुवात केली.

माणसांची मदत त्वरेनें व्हावी इतकें जवळ तें ठिकाणहि नव्हतें. बंब आले त्यावेळीं आग आटोक्याबाहेर चालली होती. कामकऱ्यांचा आणि त्यांच्या मुलाबाळांचा आक्रोश शहरच्या मध्यापर्यंत मुंगीच्या पावलानें प्रवास करीत होता. जो तो कामकरी आपापली बायको, मूल, जवळचें नातेवाईक माणूस कोठें आहे हें पाहण्याच्या धांदलींत होता. समोर ज्वाळांच्या विक्राळ जबड्यांत पतीला मृत्यूशीं झगडतांना पाहून किंकाळी फोडून स्त्री मूर्च्छित पडे. एकादी धीट बाई बेभान होऊन तिकडे जाई तों स्वतःच संकटांत सांपडे. आपल्या ऋणानुबंधाचे धागे न तुटावे याकरितां जो तो खटपट करीत होता. त्या भडकलेल्या आगीच्या कल्लोळांतून हृदयाचें पाणी करणारा आक्रोश बाहेर पडत होता!

पण मृत्यूनें आपलें सर्वभक्षक तोंड उघडलें असतांहि त्यांतून उल्हासजनक गोष्टी काढणारे कांहीं तत्त्वज्ञ (!) तेथें होतेच. त्यांपैकीं वृत्तपत्राचे प्रतिनिधी हे प्रमुख होत!

त्यांच्यासमोर ज्वाळा भडकत होत्या, पण त्यांची दृष्टि दुसरे दिवशीं आपल्या वृत्तपत्रांत भडक मथळे फडकतील त्यावर खिळली होती. आग लागली त्यावेळीं मॅनेजर काय करीत होते, प्रथम आगीची बातमी कोणाला समजली, आग लागण्याचीं कारणें काय असावींत याची माहिती जो तो प्रतिनिधी कसोशीनें गोळा करीत होता.

दुसरीं सिनेमाकंपनीचीं माणसें. उदात्त, शृंगारिक, भयानक कसलाहि देखावा सारख्याच थंड मनानें चित्रित करणारे हे लोक आपल्या कामांत गर्क होते. थोडक्या देखाव्यांत सर्व प्रसंग बरोबर कसा आणतां येईल याच्या योजनेंत असलेला डायरेक्टर आपल्या नोकरांना थंडपणें कामाच्या सूचना देत होता.

* * * *

प्रकाश जेवण करून विश्रांति घेण्याकरितां ‘आनंद भुवना’कडे चालला होता तों त्याला ही बातमी समजली. त्यानें तडक हिरालालच्या कारखान्याकडेच सायकल वळविली !

प्रकाश तेथें पोंचला त्यावेळीं आग विझत आली होती. सिनेमाच्या मंडळींनीं सीन संपवून आपल्या मुक्कामाकडे मोटर हांकली, आणि वृत्तपत्राच्या बातमीदारांनीं प्रकाशचें नांव मजकुरांत दाखल करून आपल्या गांवांतल्या कचेऱ्या किंवा पोस्ट ऑफिसें गांठण्याची चपळाई केली.

प्रकाश व्यथित मनानें कारखान्याच्या आवारांत शिरला. त्यावेळीं तेथील मजुरांशीं बोलत कांहीं ‘भाई’ उभे होते. त्यांच्या चेहऱ्यावर चिंतेऐवजीं त्वेषयुक्त उत्साहच दिसत होता. आतां कांहीं दिवस बरें काम मिळालें, अशाप्रकारच्या वृत्तींतच ते होते. डोक्याप्रमाणें अंतःकरणें उघडीं टाकण्याची कला जर त्यांना साध्य असती, तर डोक्यांसारखें त्यांचें अंतःकरणहि निव्वळ यांत्रिक आहे हें सहज उमगून आलें असतें. मजुरांशीं बोलतांना त्यांचें सांत्वन करून त्यांना धीर देण्याऐवजीं चिथावणी देण्याचें प्रचारकार्य याहि करुण प्रसंगीं हे निष्ठावंत साम्यवादी करीत होते.

सदानंद तेथें होताच. ह्या वेळीं देखील विळा-हातोडा छापाचें एक पुस्तक काखोटीला मारून जायला स्वारी विसरली नव्हती. कदाचित् पुस्तकांत पाहून औषधयोजना करणाऱ्या एखाद्या ‘ग्रांथिक’ डॉक्टरप्रमाणें आज मजुरांवर ओढविलेल्या प्रसंगांवरचा उपाय त्या ग्रंथांतून सदानंद मजुरांना काढून देणार असावा !

सदानंद कारखान्याच्या मजुरांत कितीसा परिचित होता कोणास ठाऊक ! परंतु त्यानें एक काम मात्र व्यवस्थित चालविलें होतें. 'प्रकाश आणि त्याचे सहकारी हे तुमचे शत्रु आहेत' हें मजुरांना जितक्या तऱ्हांनीं पटवितां येईल तितक्यांनीं पटविण्याचा त्यानें पद्धतशीर प्रयत्न केला होता. त्याला यश किती आलें होतें याचा अंदाज मात्र कोणालाच घेतां आला नसता !

"या कॉम्रेड प्रकाश."

सदानंदानें मुद्दामच हाक मारली असावी. प्रकाश त्या मंडळीकडे वळला. मजुरांचे चारचौघे पुढारी जमले होते त्यांनीं प्रकाशला अभिवादन केलें आणि आपली करुणकथा सांगण्यास सुरवात केली.

"प्रकाश साहेब -- देवच आला तुमच्या रूपानं. आजच्या मंदीच्या काळांत शेटजींनीं मजुरी कमी केली. अगोदरच उपासमार होत होती आमची... सगळे दांत सुद्धां पुरते आले नाहींत अशा पोराला भाकर द्यावी लागे. ... ... दुधाला एक दिडकी रहात नसे, ...... अन् आतां हें आभाळ कोसळलं...शेटजी ४-६ महिने कारखाना बंद करणार म्हणतात. मग आमचं कसं व्हावं ? अन् ४-६ महिन्यानं तरी आम्हांलाच कामावर घेतील असं कशावरून ? आम्हीं काय करावं ? छे. छे-साहेब, आग फार लौकर विझली. त्यांतच आम्ही जळून गेलों असतों तर ?—तर फार चांगलं झालं असतं.-"

प्रकाशच्या अंतःकरणाचें पाणी पाणी झालें ! अरेरे ! विझालेल्या आगीपेक्षां आतां या बेकार मजुरांच्या आणि त्यांच्या स्त्रीपुत्रांच्या पोटांत जी भयंकर आग पेटणार आहे ती केवढी भयंकर आहे ! कारखान्याला लागलेली आग तास दोन तास पाणी मारून विझवितां आली. या मजुरांना आपल्या क्षुधेच्या ज्वाला कशा शमवितां येतील ? सर्वांच्या अश्रूंचें पाणी एकत्र केलें तरीहि ही आग विझणें शक्य नाहीं. कारखान्यांतलें कितीतरी सामान जळून कोळसा झालें तशाच यांच्या आकांक्षा झाल्या असतील. आणि यांच्या आकांक्षा तरी काय असावयाच्या ? आजच्या समाजचक्रांतून उडालेल्या विषमतेच्या ठिणग्यांनीं त्यांची मनोभूमि अगोदर दग्ध करून टाकली आहे. त्यांत कोठें एकादा आशेचा अंकुर असेल, तोहि अशा प्रसंगानें कोळपून जायचा. आपल्याला आणि मुलाबाळांना भरल्या पोटी किंवा निदान अर्ध्या

पोटीं जगतां यावें एवढीच यांची आकांक्षा; यांच्या मनोरथाची धांव या मर्यादेपलीकडे नाहीं. पण इतक्या अल्पसंतुष्ट जीवांना कष्ट करून सुद्धां जीवन जगण्याचा मार्ग आतां दुर्मिळ झाला !

“मी माझ्याकडून प्रयत्न करतों. तुमच्यावरच नव्हे तर आपणा सर्वांवरच दैवानें ही आग पाखडली आहे.....जातों मी मालकाकडे आणि सांगतों त्यांना चार गोष्टी.”

जहाल भाईनीं एकमेकांकडे पाहिलें. त्यांनीं असा प्रयत्न नुकताच करून पाहिला होता. परंतु शेट हिरालाल एकंदर आपत्तीनें इतके क्षुब्ध झाले होते कीं त्यांनीं या ‘भाई’ची आजच नव्हे तर केव्हांच भेट घेणार नाहीं असें निक्षून बजाविलें होतें. हेंच उत्तर प्रकाशला मिळणार अशी त्यांना खात्री होती. तेव्हां त्यांतला एक खडबडीत तोंडाचा आणि पिवळसर डोळ्यांचा भाई उद्गारला, “ वेल् प्रकाश, असा निष्फळ प्रयत्न करण्यांत कांहीं फायदा नाहीं. ही अशी संधि सांपडली आहे कीं ‘ डिस्‌कंटेंट ’ चांगली वाढवितां येईल. ”

“ तुमचे डावपेच जरा बाजूला ठेवा. आज या ठिकाणीं ‘ प्रचाराचा प्रश्न नसून या मजुरांची उद्यांची दुपार कशी भागवावी हा प्रश्न आहे...बरं मी जातों, हिरालालजीकडे. ”

“ देव तुम्हांला यश देवो. ” मजुरांचे म्होरके सद्गदित होऊन म्हणाले.

शेटजीच्या बंगल्याचे दाराशीं उभ्या असलेल्या शिपायाला प्रकाशनें आपण आल्याची वर्दी आंत पोंचविण्यास सांगितलें. आणि अगदीं थोड्याच वेळांत प्रकाशला आंतून बोलावणेंहि आलें.

“ प्रकाशसाहेब आंत गेले. हिरालाल शेट त्यांचं म्हणणं ऐकणार असं दिसतं–” प्रकाशच्या हालचालीकडे आपले खोल निस्तेज डोळे लावून बसलेले मजूर उद्गारले.

“ पहा, आम्हांला आंत घेतलं नाहीं अन् ह्या प्रकाशला आंत घेतलं. ” सदानंद त्यांना सांगूं लागला, “ म्हणजे खऱ्या मजूर पुढाऱ्यांचं शेटजी ऐकणारच नाहींत असं नाहीं का ? अहो, प्रकाश आपल्या भाषणांत मजुरांविषयीं कळवळा दाखवीत असला तरी तो वृत्तीनें मजूर नाहीं. या भांडवलवाल्यांना तो आपलासा वाटायचाच. हे कारखान्याचे मालक माणसं पारखण्यांत मोठे चतुर असतात....”

“ दादा, जरा गप्प बसता का–” एक मजूर सदानंदावर खेकसला.

सदानंदाची वटवट बंद झाली.

इकडे शेट हिरालाल आपल्या खास दालनांत हवालदील होऊन बसले होते. शेजारीं त्यांचे मेथाजी होते. त्यांच्या पुढ्यांत पांच सात तारा पडल्या होत्या. धीर देणाऱ्या संदेशांचीच संख्या त्यांत बरीच होती. दोन चार तासांत फोननें आणि तारायंत्रानें जेथें जेथें वार्ता कळूं शकली तेथून हिरालालजींना प्रत्युत्तरें, सांत्वनें आलीं होतीं.

शेटजींचें वय चाळीशीच्या सुमारास असावें. कदाचित् तें जास्तहि असेल. कारण संपन्नतेच्या आणि स्वास्थ्याच्या मदतीनें जरेचे पहिले हल्ले परतविणें फारसें कठीण नसतें. त्यांतून शेटजी धर्मभोळे असून निर्व्यसनीहि होते. लोड तक्क्यापासून खिडकीच्या पडद्यापर्यंत खादी वापरलेली दिसत होती. खुद्द शेटजींचे कपडेहि हातमागाच्या कापडाचेच होते. बाजूला असलेल्या पिशवीच्या पेटीवर चंदनी लाकडाच्या चौकटींत बसविलेली गांधीजींची तसबीर होती.

प्रकाश आंत येतांच शेटजींनीं त्याला योग्य उत्थापन दिलें.

“आवो प्रकाशजी आवो, वेळेवर आलांत. आमची दैवगती आज उलटी झाली! पाहिलंत ना काय झालं तें?”

“हिरालालजी, मला खरोखरच फार वाईट वाटलं. म्हणून तर उन्हाचा तापत इथं आलों.”

“आज आमच्या पिताजीपासून वाढविलेला हा कारखाना आज जमीनदोस्त झाला. भगवान् बालाजीच्या मनांत काय आलं न कळे. आतां सारा खटाटोप पुनः करायचा.”

“हिरालालजी, आपल्या दुःखाचे वेळीं ही वाटाघाट करणं प्रशस्त नाहीं. पण आपल्यापेक्षां हजारों पटींनीं ज्यांचीं दुःखं जास्त मोठीं आहेत आणि उद्यांचीच ज्यांना भ्रांत पडली आहे अशा लोकांबद्दल बोलायला मी आलों आहें.”

“हां. समजलों आम्ही. मघाशीं कोणी कॉम्रेड आल्याची वर्दी आली होती. परंतु आम्ही त्यांना तर मुलाखतच दिली नाहीं. उगाच शिरा ताणतात, टाकून बोलतात. तुमच्यासारखे सभ्य नि चलाख भाई आम्हांला आवडतात.”

“शेटजी, त्या कॉम्रेडांशीं आपणांला काय करायचं आहे? तुम्ही आतां कांहीं दिवस तरी कारखाना बंद करणार. या मजुरांचं तुम्हीं काय करायचं ठरविलं आहे?”

“आम्हीं त्यांचं काय करायचं! आमचाच सर्व नाश झाला. आमच्यासारखे तेहि कंगाल झाले. जी आमची गत, तीच त्यांचीहि गत.”

" हिरालालजी, तुम्ही एखाद्या लहान मुलाला किंवा अज्ञ माणसाला हें सांगितलं असतं तर एकवेळ शोभलं असतं. पण तुम्ही एका वकिलाशीं बोलत आहां, हें विसरतां. तुम्हांला पुराणांतली गोष्ट माहित आहे ना ? पुराणकाळीं यज्ञाच्या ज्वाळांतून अग्निदेव प्रसादाचा सुवर्णकलश घेऊन प्रगट होत असे. एखाद्या भांडवलवाल्याचा कारखाना जळाला तरी त्या जाळांतून गुप्त रूपानें प्रकट होऊन, लक्ष्मीनारायण सुवर्णानें भरलेले विम्याचे कलश मालकाला देत असतो. या कारखान्याच्या किंमतीची रोकड चार दिवसांचे आंत तुमच्या हातीं येईल. समजा, तुमच्या जवळ आज कांहीं नसलं, तरी विम्याच्या त्या पैशावर तुम्हांला आपलं कीर्तिमंदिर पुनः उभारतां येईल. पण तुमच्या कारखान्यांत जे सकाळीं प्रफुल्ल तोंडानं कामावर आले त्या मजुरांच्या तोंडचं पाणी पळालं आहे. उद्यां पेटणाऱ्या क्षुधाग्नीच्या भयकर झळा आजच त्यांना चटके देत आहेत. तुमच्या कारखान्याच्या उन्नतीसाठीं त्यांनीं आपल्या जिवाचं पाणी केलं. तें लक्षांत घ्या आणि उद्यांची आग विझवायला त्यांना मदत करा."

हिरालालजी हें सर्व सावधानपूर्वक ऐकत होते. प्रकाशचें बोलणें संपतांच मेथाजीकडे वळून ते म्हणाले, "मेथाजी, घणूं हुशियार अने चालाक माणस छे–हें पहा प्रकाशजी, तुम्ही म्हणतां हें सर्व ठीक आहे. पण या बाबतींत मला काय करतां येणार ? कारखाना जाग्यावर नसतांना मजुरांना दररोजची मजुरी फुकट वांटूं असं म्हणतां–"

"तुम्हांला खरी इच्छा आणि तळमळ असेल तर मी सांगेन काय करायचं तें. यांना पांच सहा महिन्यांपुरतं जीव जगवायला पुरेसं द्रव्य द्या आणि कारखाना सुरू झाल्यावर पुनः कामावर घेऊं अशी हमी द्या."

" बालाजीच्या कृपेनं कारखाना सुरू झाला अन् त्यावेळेला गरज असली तर यांना घेऊं कामावर. पण आज द्रव्य कुठलं द्यायचं ?"

" हिरालालजी, काय बोलतां हें. उद्यां कामावर घ्यायचं नक्की आश्वासन नाहीं, आज मदतीची तयारी नाहीं. या मजुरांचा वाली कोण ? त्यांच्या अंगच्या निढळाच्या घामानं तुमच्या ऐश्वर्याचे मळे आजवर पिकले आहेत. एक वर्ष दुष्काळ पडला तरी तुमचीं कोठारं भरलेलीं आहेत. त्यांनीं काय करावं ! मध्यंतरींच्या काळांत फार झालं

तर ते हाल अपेष्टांत कोठेंतरी खपून दिवस काढतील. पण कारखाना सुरू झाल्यावर त्यांना तुम्ही घ्याल का कामावर ? हिरालालजी, तुम्ही वैष्णव आहांत, दुसऱ्याची पीडा आपलीच समजणाऱ्या उदार पंथाचे आणि दरिद्री नारायणासाठीं देह झिजविणाऱ्या महात्म्याचे तुम्ही अनुयायी आहां. मजुरांचे तुम्ही ट्रस्टी म्हणवितां. तुमच्या विश्वासावर ज्यांनीं आपलीं जीवितं टाकिलीं त्यांचा कांहींच कसा कळवळा येत नाहीं तुम्हांला ?"

यावर हिरालालजी स्तब्ध राहिले. कांहीं वेळ विचार करून प्रकाशला ते म्हणाले, "हें पहा प्रकाशजी, या आणि पुढल्या महिन्याचा पगार मजुरांना द्यायचं मी तुम्हांला वचन देतों. पुढचं बोलणं ८–१० दिवसांनीं करूं. आज मला कांहीं सुचेनासं झालं आहे. माफ कराल का मला ?"

"हिरालालजी, आज तुम्हांला जादा तसदी देण्याची माझीहि इच्छा नाहीं. पण ८ दिवसांनीं मी या ठिकाणीं नक्की येईन. या मजुरांची कायमची व्यवस्था झाल्याखेरीज आपलीं बोलणीं पुरीं झालीं असं समजूं नका."

" सारी बात छे. मेथाजी दूध आणा प्रकाशजींना. "

प्रकाशनें आभारपूर्वक दूध नाकारिलें.

" नमस्ते. "

" जय, जय !"

" आतां पुनः आठ दिवसांनीं गांठ. "

* * *

बाहेर आल्यानंतर प्रकाशभोंवतीं मजुरांचा गराडा पडला. आपल्याला जें थोडेंफार करतां आलें त्याची हकीकत सांगून प्रकाश म्हणाला, " बाबांनो, पुनः या बाबतींत मीं प्रयत्नाची शिकस्त करीन. तुमचा प्रश्न नीट सुटल्याखेरीज मला चैन पडणार नाहीं. "

मजुरांच्या कष्टी मनःस्थितींत त्यांना थोडा आशेचा किरण दिसूं लागला. बेहोष होऊन प्रकाशच्या नांवाचा ते जयजयकार करूं लागले. जयजयकाराच्या त्या प्रचंड आरोळ्यांत सदानंदाचे व इतर जहाल भाईंचे उपरोधिक उद्गार कोणाला ऐकूंहि आले नाहींत.

## १७. रघुनंदनाची रदबदली

" राहूं दे. आतां किती चोळणार तूं माझं डोकं, शशांक, लहानशा ब्रशनें-देखील तुझ्या बोटांना घट्टे पडतात. हें राकट काम तूं किती वेळ करणार ?"

" प्रकाश, तुला पूर्ण बरं वाटेपर्यंत मी थांबणार नाहीं. या कामांत मला कधींतरी त्रास होईल का ? मागल्या जन्मींच्या पुण्याईनं या जन्मीं तुझ्या जवळची जागा मिळाली. आतां तें आसन पुढेंहि टिकावं म्हणून कांहीं पुण्यसंचय नको का करायला ?"

" झाला तुझा वेदांत सुरू. गेल्या दोन दिवसांत हिरालालच्या कारखान्याची आग हा विषय पुरला. त्यांतच बुधवारांत दिवसभर ऊनपाऊस खात उभे राहणाऱ्या मजुरांना थोडी सांवली करून द्यावी म्हणून म्युनिसिपालिटीच्या सभासदांशीं हुजत घालत होतों. डोक्याचा नुसता भडका उडाला आहे....आणि तूं पूर्वजन्म पुनर्जन्म पुनः काढतो आहेस...आहे काय तुझा विचार ? खरंच शशांक, श्रद्धेची, भक्तीची पकड तुझ्या अंतःकरणावरून कधीं काळीं तरी निघेल का रे ?"

" मुळींच नाहीं. ती गेली तर मला जगण्यासारखं कांहींच उरणार नाहीं. भोवतालच्या आळ्यांत श्रद्धेचा भरपूर ओलावा आहे म्हणून माझ्या जीवनाला एक प्रकारची टवटवी आहे."

" मग माझ्यासारखीं श्रद्धाहीन माणसें कशीं रे जीव जगूं शकतात ? तुमच्या या सिद्धांताप्रमाणें आम्हीं तर समाधीच घेतली पाहिजे."

" तुला श्रद्धा नाहीं असं कोण म्हणतो ? श्रद्धा नसती तर सुखाचा जीव दुःखांत घालून जिवाचं रान करण्याचो तुला काय गरज होती ?"

“कसलं जिवाचं रान ? मी एकादेवेळीं इतका वैतागतों कीं हें सर्व सोडून द्यावंसं वाटतं. आपल्या पोटाची चिंता आणि जगाची काळजी यांत कोंडमारा होत चालला आहे माझा. एका ठिकाणीं स्थिर नसल्यामुळें शिकवण्या मिळत नाहींत, मिळाल्या तर हातच्या जातात. कोणाची मदत घ्यायची म्हटलं कीं तडजोडीचा प्रसंग आलाच. आम्हांला मदत करणारे म्हणजे सुखवस्तु लोकांपैकीं असायचे. त्यांचीं आमचीं मतं कशीं जुळणार ! एका किशोरला किंवा तुला किती त्रास द्यायचा ! किशोर श्रीमंत असला तरी त्याचे व्याप त्याला आहेतच. तुमचा तर पसारा मिळकतीच्या मानानं बराच मोठा.... खरंच, शशांक एक विचित्र कल्पना अलीकडे माझ्या मनांत येते ! ”

“कोणती रे ! ” किंचित् सभय आणि उत्कंठित होऊन, डोकें चोळण्याचें जरा थांबवून शशांकनें विचारलें.

“आतां जर मला शिक्षा झाली तर बरं होईल. कांहीं दिवसांपुरता तरी पोटाचा प्रश्न सुटेल ! ”

शशांकचें सर्वांग थरारलें. तो घोगऱ्या स्वरांत उद्गारला, “कांहींतरीच ! काय बोलतोस हें ! ”

“कां ? घाबरलास वाटतं ? ” प्रकाश मोठमोठ्यानें हंसूं लागला.

इतक्यांत दारावर टिचकी ऐकूं आली.

“मे आय कम् इन् ? ”

“यॅस्, सर्टनली.”

शशांकनें तेलाची वाटी उचलून ठेविली, हात वगैरे पुसले आणि दार उघडलें.

“कोण रघुनंदन ! ”

“यॅस् सर ! आपल्या एकांताचा मीं भंग तर नाहीं ना केला ? ”

“छे, छे, एकांत कशाचा ? प्रकाशचं जरा डोकं दुखत होतं एवढंच.”

“या रघुनंदन, तसं कांहीं विशेष नाहीं. पण नागपुरच्या सफरींतली दगदग आणि हीं दोन दिवसांचीं कामं यामुळं त्रास झाला थोडा.”

“ओ ! आय् ॲम् सॉरी.”

“केव्हां आलांत पुण्यांत ?”

“काल सकाळीं आलों.”

“परवां तें हिरालालकडे घडलेलें अग्निकांड तुम्हांला ठाऊक झालेंच असेल.”

“तेवढ्यासाठींच तर मी आलों. हिरालालची परवां रात्रीं मला तार आली. म्हणून मी तातडीनं निघून आलों. आज आमच्या म्युनिसिपालिटीची मीटिंग होती. ती देखील तहकूब केली. काल सकाळीं इथं आल्याबरोबर हिरालालच्या बंगल्यावर गेलों होतों.”

हें ऐकतांच प्रकाश उठून बसला. कपाळावर विखुरलेले आपले केस सावरीत त्यानें विचारिलें, “हिरालालची मीं मुलाखत घेतल्याचं त्यानं तुम्हांला सांगितलं असेलच.”

“हो तर, तोच आमच्या बोलण्याचा मुख्य विषय होता. प्रकाश, या बाबतींत तुम्हांला माझं कळकळीचं सांगणं आहे कीं हिरालालला दुखवूं नका.”

“रघुनंदन, तुम्हीं उमेदीनं आणि वयानंहि आमच्या पिढीचे आहां. सर्वस्वीं नाहीं तरी बऱ्याच बाबतींत आमची विचारसरणी मान्य असल्याचं दाखवितां. मग तुम्ही हें मला कसं सांगतां ?”

“भांडवलशाहीचा तुमच्या इतकाच मलाही तिटकारा आहे. परंतु सर्वच भांडवल-वाले सारखे असतात का ? माणसा-माणसांत फरक असतो कीं नाहीं ?”

“हिरालाल खादी वापरतो व देवधर्म करतो, मजुरांच्या सुखसोयींसाठीं कांहीं केल्यासारखं दाखवितो, पुढाऱ्यांना पाहुणचार देतो, ह्याच गोष्टी तुम्ही मला सांगणार असाल. व्यक्ति या दृष्टीनें तो इतर भांडवलवाल्यांपेक्षां पुष्कळच चांगला आहे हें मलाहि मान्य आहे. परंतु असला चांगुलपणा एका विशिष्ट मर्यादे-पलीकडे जाऊं शकत नाहीं. कारण हिरालाल या व्यक्तीची त्याच्या परिस्थितीवर फारच थोडी हुकमत चालते. तो स्वतः आपल्या कारखान्यांतली मजुरी कमी करून संप होऊं देत नसेल. पण इतर कारखान्यांतली मजुरी कमी झाली कीं ह्याला नाइलाजानं आपले दर उतरावे लागतात. आणि इतर ठिकाणीं तेच दर कायम झाले आहेत हें पाहून मजुरांनाहि कुरकुर करायला सवड बळ राहत नाहीं.”

"पण तुम्हांला हें सांगायला पाहिजे असं नाहीं प्रकाश, कीं हिरालालनं अनेक कार्यांना मोकळ्या मुठीनं मदत केलेली आहे आणि आज देखील कित्येक कार्यकर्ते हिरालालच्या आधारावरच लोकसेवा करूं शकत आहेत."

"अनेक कार्यांना मदत करण्यांत हिरालालसारख्यानीं कांहीं परमार्थ साधला नाहीं; गाईच्या आंचळांतून दूध काढायला अगोदर थोडं दूध लावावं लागतं, तद्वत् हा प्रकार आहे."

"त्यांच्या या भावनेला तुम्ही कसलेंच श्रेष्ठत्व देऊं इच्छित नाहीं का ?"

"हें पहा रघुनंदन, श्रेष्ठ आणि कनिष्ठ असला प्रकार शास्त्रीय दृष्टींत संभवत नाहीं. माणसांच्या कार्याची दिशा त्यांच्या भोंवतालच्या परिस्थितीवरून ठरत असते एवढंच मला सांगायचं आहे. चळवळीचा विजय झाला तर आपलें प्रभुत्त्व अधिक स्थिर होईल अशा भावनेनेंच हे भांडवलवाले कोणत्याहि चळवळीस मदत करतात."

"मग हीं जर तुमचीं मतं आहेत तर परवां मजुरांच्या तात्पुरत्या गरजा भागविण्यासाठीं तुम्हीं हिरालालकडून सवलती तरी कशाला मिळविल्यात ? बाहेर जे 'भाई' उभे होते त्यांच्यांतच मिसळून जायचं म्हणजे तुमची तत्त्वनिष्ठा शंभर नंबरी ठरली असती." रघुनंदन जरा उपरोधिक स्वरांत म्हणाले.

"रघुनंदन," प्रकाश करड्या स्वरांत म्हणाला, "दुसऱ्याच्या तत्त्वनिष्ठेचें तेज सहन होईनासं झालं म्हणजे त्याच्या वर्तनांत कोठें उणीवा दिसतात का हें पाहणें ही रीतच आहे तुमच्या सारख्यांची. त्या मजुरांना उद्यांच्या भाकरीचा प्रश्न भेवडावीत होता. तेवढा सोडविल्याशिवाय दुसरें कांहीं करणें शक्य नव्हतें. तेवढें केल्यावरच आतां कांहीं तरी अधिकाची तजवीज करायची. अंतिम ध्येय गांठण्याच्या अगोदर टप्पे असतात. हे टप्पे गांठीत गांठीत मग ध्येय हस्तगत करावं लागतं. असं करतांना पुष्कळदां ध्येय लुप्त झालें कीं काय असाहि संभ्रम होईल; पण तो तात्पुरताच !"

"पण आतां हिरालालनं तुमचं ऐकलं आहे ना ? आतां त्याच्या चांगुलपणावर कां अवलंबून रहात नाहीं ? पुनः हा प्रश्न उपस्थित कां करतां ?"

"रघुनंदन, त्या तात्पुरत्या सवलतीनं हा प्रश्न सुटला असं मानण्याची माझी वृत्ति नाहीं. मी जर बाहेर असलों तर या बाबतींत अवश्य तें सर्व कांहीं करीन असा माझा संकल्प आहे."

'हा अभद्र उल्लेख कशाला?' असा प्रश्न शशांकच्या अगदीं ओठावर आला होता.

रघुनंदनांनीं तो विषय आवरताच घेतला.

"काय चहा घेतां?"

"नको, थँक्स्. मी आहें पुण्यांत एकदोन दिवस. आणखी पुनः एकादेवेळ येऊन जाईन."

रघुनंदन निघून गेले. प्रकाश कॉटवर आडवा झाला तो कांहींसा क्षुब्ध होऊन उद्गारला, "चांगला आहे बिचारा, पण संस्कार कांहीं सुटत नाहींत."

"प्रकाश, तुला बरं वाटतंय् का? चांगली विश्रांति घेत होतास तों हा वाद घालावा लागला...थांब, पुनः डोकं चोळतों."

शशांक उठणार इतक्यांत प्रकाशनें त्याला हात धरून बसवून घेतलें. "आतां नको तूं श्रम घेऊं. तुझा नुसता हात माझ्या डोक्यावर ठेव. तेवढ्यानंहि बरं वाटेल."

प्रकाशनें शशांकचा हात आपल्या डोक्यावर ठेवून डोळे मिटले. शशांक कितीतरी वेळ त्याच्याकडे पहात होता. दूर जंगलांत वाट चुकून जावें, अकस्मात् एकादा रत्नखचित राजवाडा दिसावा, आणि त्यांत एकाद्या मंचकावर कोणी दैवी राजपुत्र झोपलेला असावा अशा प्रकारचें वनदेवतांच्या गोष्टींतलें वर्णन आपण अनुभवीत आहों असा शशांकला भास होत होता.

## १८. नृत्य

दुसरे दिवशीं सकाळीं प्रकाश 'शांतिनिकेतन' मध्यें शिरला, त्यावेळीं जोरजोरानें वाद चाललेला ऐकूं येत होता. कारखान्याच्या आगीनें तप्त झालेलें त्याचें मन अद्यापि निवलें नव्हतें. हा आणखी वाद कसला निघाला हें त्याला कळेना. आबा-साहेबांची मेघगर्जना, किशोरची करडीवाणी, सुलभाची सारंगी, शशांकची कोमल रागदारी, सदानंदाचा कर्णा असा संयोग कां झाला याचें निदान ऐकूं येणाऱ्या संदिग्ध शब्दांवरून निघणें शक्य नव्हतें.

प्रकाश त्वरेनें जिना चढून वर गेला. तो दारांत शिरतांच आबा म्हणाले, "हा आला प्रकाश. वाः आज फुल्ल कोरम होणार. प्रकाशला सांगूं या आतां आपलं मत."

तळहातावर गाल टेकवून स्तब्ध उभ्या असलेल्या रमाबाईंना धीर आल्यासारखें झालें असें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसूं लागलें. त्या लगेच उद्गारल्या—

"ये बाबा, तूं कांहींतरी तोड काढशील खास."

"पण झालंय् तरी काय ? अन् सुलभा, किशोर असे क्षुब्ध झालेले कां दिसत आहेत ?"

"एकाच्या रागाचा परिणाम दुसऱ्याच्या मुखावर दिसतोय् इतकंच." शशांक डोळे मिचकावीत म्हणाला.

"दादा, तुझी चेष्टा पुरे बरं का ?" सुलभा फुगीर तोंड करून म्हणाली.

"शशांक, खरंच चेष्टा नको. खरं काय झालंय् ?"

"अरे काय व्हायचं !" शशांक सांगूं लागला, "उद्यां कॉलेजचं गॅदरिंग आहे, आणि आमच्या ताईसाहेब सुलभाराजे या त्यांत आपलं नृत्यकौशल्य दाखवावं असं

म्हणतात. आपली सर्वांची परवानगी मिळेलच या खंबीर विश्वासानं त्यांनीं नृत्याची सर्व तयारी गेल्या पंधरवड्यांत केली आहे. परंतु मामुली परवानगी मागण्याचा त्यांचा अर्ज येतांच मंत्रीमंडळ फार खवळलं आहे. विशेषतः आबा आणि ॲडव्होकेट साहेब यांचा जबर विरोध आहे. इति–समजलं ?"

"माझं अगोदर ऐक प्रकाश," आबासाहेब म्हणाले, "मला हे प्रकार मुळींच मान्य नाहींत. माझीं मतं क्षणभर बाजूला ठेवून सुलभाला मी पाहिजे तशी स्वतंत्रता देत आलों आहें. वाटतं हें परक्याचं धन, चार दिवसांनीं आपणापासून दूर जाणार. करूं द्या काय फॅशन, खेळाडूपणा करील तो—पण हें रंगभूमीवरील नृत्य मला मुळींच नापसंत आहे. कलेकरितां कला या तत्त्वासाठीं आमच्या पूर्वजांनीं युगानुयुगं जपून ठेविलेली संस्कृति अशी मातीला मिळावी असं मला वाटत नाहीं. प्रेक्षकांत सर्व जातीचे लोक असायचे, या प्रसंगानें एखादा कनिष्ठ जातीचा युवक मत्त होऊन भलत्याच इच्छा उरीं बाळगणार नाहीं कशावरून ? छे, छे, हीं तुमचीं गॅदरिंग्ज, सहभोजनं आणि हे असले उत्तान कार्यक्रम म्हणजे पूर्वजांनीं जतन करून वाढविलेल्या संस्कृतीवरचे प्राणघातक हल्ले आहेत अगदीं !"

"–पण आबा, एका साध्या प्रसंगाची तुम्हीं फार मोठी दहशत घेतां. एका नृत्यानें सुलभावर कसला भयंकर प्रसंग ओढवणार आहे ?"

"हा तत्त्वाचा प्रश्न आहे." आबांनीं पुढें बोलणें चालू केलें, "वर्णसंकर हा प्रत्यक्ष विवाहानंच होतो असं नाहीं. आपला कुलाचार बिघडला, उच्च वर्णाचे आपले व्यवसाय सोडून आपण धंदेवाईक कलावंतासारखं वागूं लागलों कीं झालाच संकर. मी सामाजिक बाबतींत उदार मताचा आहें. पण सर्वांमध्यें समता असावी याकरितां वरिष्ठांनीं हलके कामधंदे करायला लागावं असं मुळींच सांगणार नाहीं. नाचण्यागाण्याकरितां कलावंतिणीचा मोठा वर्ग आहेच कीं."

"आपल्या चैनीसाठीं भांडवलशाहीनें एका बाजूला तें कुरण काळजीपूर्वक वाढविलं आहे." सदानंदानें मध्येंच तोंड घातलें.

"तें कुरण चोहींकडे पसरावं म्हणून तुमच्यासारखे कॉम्रेड समाजाची मशागत करणार वाटतं." किशोरनें एक सणसणीत टोला लगावला.

"पण प्रकाश, मी म्हणतें आपल्या मोठ्या वर्णांत नसतात कारे नाच ?" सुलभा बोलूं लागली. "आपला दक्षिणी समाज सोडला तर हिंदुस्थानांतील इतर प्रांतांतल्या उच्च वर्णांत गर्बा सारखे नाच आहेत. आपल्यांत देखील श्रावणांतल्या फेरासारखे प्रकार आहेत. मग इतके दिवस त्यानं नाहीं संस्कृति बुडाली ?"

"सुलभाताई, मी यावर थोडं बोलूं इच्छितों." कृष्णचंद्र म्हणाले, "तुम्ही म्हणतां त्या प्रकारच्या नृत्यांत कलेकरितां कला हें तत्त्व नाहीं. निसर्गाच्या रम्य स्वरूपानं झालेला संतोष व्यक्त करण्याची पद्धत किंवा धर्माच्या भूमिकेवरचा एक आनंदाचा उत्सव हें त्याचं स्वरूप. विकारांचा भाग त्यांत नाहीं."

"कृष्णजींच्या म्हणण्यांत खात्रीनं तथ्य आहे." किशोरनें बोलण्यास सुरुवात केली, "पण हा प्रश्न कृष्णजीप्रमाणें मी धर्माधर्मावर पारखूं इच्छित नाहीं. कले-करितां कला ह्या तत्त्वावरहि माझा भरंवसा आहे. पण प्रदर्शनाकरितां कला ही अलीकडे रूढ होत चाललेली पद्धति मला मुळींच पसंत नाहीं."

"किशोर, माझ्यावर नेहमींच तुम्ही वाईट हेतु लादीत असतां." सुलभा लाल होऊन म्हणाली.

"सुलभा, यांत वाईट हेतु लादण्याचा मुळींच प्रश्न नाहीं. पुष्कळदां आपण स्वतःची फसवणूक करून घेत असतों. कलाविलास हा त्यांतलाच एक प्रकार आहे. निसर्गानें दिलेलें सौंदर्य अधिक तेजस्वी व्हावं किंवा आपल्या प्रियजनांच्या वृत्ति प्रफुल्लित व्हाव्या म्हणून केलेलं नृत्य मलाहि प्रिय आहे. शिवपार्वती नृत्य किंवा वृंदावनांतली रासक्रीडा यांतली रम्य उदात्तता, हजारपांचशें मुलांसमोर शाबासकीची टाळी मिळविण्यासाठीं नाचणाऱ्या कॉलेजकुमारीच्या नृत्यांत आहे असं मला वाटत नाहीं."

"फार सनातनी आहांत बुवा तुम्ही." सदानंद मध्येंच म्हणाला.

"सदानंद, तुम्हांलासुद्धां नवमताचे धडे देण्याची ऐपत मजजवळ आहे. पण नृत्य आणि प्रदर्शन यांतला फरक कळण्याइतपत मी तल्लख आहें हें तुमचं दुर्दैव!"

ही बाचाबाची पुढें न चालावी म्हणून आबांनीं एकदम प्रकाशला विचारलें, "काय प्रकाश, तुझं काय मत आहे या प्रश्नावर?"

" माझं मत तुम्हीं विचारलं नसतं तर बरं झालं असतं. असल्या प्रश्नावर विचारच केला नाहीं मीं कधीं. फार काय पण हे प्रश्न विचार करण्याच्या लायकीचेहि वाटत नाहींत मला. कोट्यावधि जनतेच्या पोटाचा खळगा दिवसेंदिवस अधिकाधिक खोल होत चालला आहे, त्यांत तुमची सारी कला आणि संस्कृति घालून तो बुजविला तर पाहिजे आहे मला. शेकडों स्त्रियांना, पुरुषांना आणि अर्भकांना आच्छादनापुरतें फाटकें तुटकें वस्त्र मिळत नसतां स्त्रियांनीं ओव्हरकोट घालावे कीं पारशी पद्धतीचं नेसण नेसावं याची चर्चा चाललेली पाहून शिसारी येते मला. अगदीं खालचा वर्ग तर जाऊं द्याच, पण कंगाल होत चाललेला मध्यम वर्ग देखील नाना आपदांनीं पीडिलेला आहे. दारिद्र्याचं भूत त्यांच्यासमोर अष्टौप्रहर नाचत आहे. अशा स्थितींत ही नृत्यचर्चा कोणाला सुचणार ? सुलभा, रागावूं नकोस. माझ्या एकांडेपणाचा हा अनुभव तुम्हांला नवीन नाहीं. तुझ्यावर मी कसलाच दोष लादीत नाहीं. तूं नृत्यांत भाग घेतलास तर मला कांहीं वाईट वाटेल असं मुळींच नाहीं. माझं म्हणणं एवढंच कीं, जीवनाच्या मार्गांत दुर्लंघ्य डोंगर आडवे आले असतां त्यांतून मार्ग काढण्याचा प्रयत्न न करतां भलत्याच विषयांना आपण जिव्हाळ्याचं स्वरूप देतों. "

प्रकाश नेहमींप्रमाणें अस्खलित आणि तळमळीनें बोलत होता. त्याच्या बोलण्याचा परिणाम एवढा झाला कीं सुमारें पांच मिनिटें कोणी कांहीं बोललें नाहीं.

* * *

पण इतक्या वादळानंतर देखील सुलभाला नृत्याची परवानगी मिळालीच. माणसाच्या तत्वनिष्ठेच्या खालून भावनेचा गुप्त झरा वाहत असतो. त्याच्या ओलाव्यानें तत्त्वनिष्ठेला मधूनच सर्दपणा आल्याशिवाय रहात नाहीं. आबांनीं संस्कृतीच्या दृष्टीनें सुलभाच्या नृत्याला जबर विरोध केला खरा, पण सुलभाची दिवसभर चाललेली तळमळ त्यांना असह्य झाली. इतके दिवस मेहनत घेऊन बसविलेला सुंदर नाच आतां आबांच्या म्हणण्याखातर रद्द करावा लागणार म्हणून तिचा फार हिरमोड झाला होता. तिचे डोळे रडून लाल झाले. कॉलेजच्या वातावरणांत आगामी नृत्याच्या गोड वार्ता पसरल्या असून त्यावर उत्साहानें बोलणीं चालू होतीं. अर्थात् आबांच्या नकारामुळें साराच विरस होईल आणि आपणाला ओशाळेपणानें कॉलेजांत जावें लागेल, याचें तिला विशेष

वाईट वाटत होतें. तिच्या मनांतलें हें तांडव तिच्या चेहऱ्यावर सारखें दिसत होतें. ती नांवाला पाटावर बसली, पण दोन घाससुद्धां पुरते तिनें खाल्ले नाहींत. रमाबाईंना तिचे हे हाल पाहवेनात. आबा मध्येंच गप्प होऊन येरझारा घालूं लागत अखेर सायंकाळीं ते तिच्या खोलींत गेले आणि सुन्नपणें बसलेल्या सुलभाला त्यांनीं जवळ ओढून म्हटलें, " बाळ, उद्यां होऊं दे तुझ्यां मनासारखं. पण पुनः मात्र मला विचारल्याशिवाय अशी गोष्ट कबूल करीत जाऊं नको. "

उदासीनपणाचें पटल पूर्ण दूर होऊन सुलभा पूर्ववत् हंसूं खेळूं लागली. इतका वेळ आबांच्या नकारानें चेपलेलें तिचें मन तें दडपण दूर होतांच स्प्रिंग्प्रमाणें उसळी मारूं लागलें.

तथापि किशोर आपल्या संकल्पाच्या विरुद्ध आहे, ही गोष्ट नाहीं म्हटलें तरी तिला त्रास देतच होती. किशोरनें नृत्याला आपला विरोध दर्शविला, पण लोकपक्षाचा धुरीण कायदेमंडळांत सरकारचा निषेध करील तेवढेंच महत्त्व आपण आपल्या विरोधाला दिलें पाहिजे हें ओळखण्याइतका तो चतुर होता. सुलभावर आपलें प्रभुत्त्व असलेंच तरी तें नैतिक आहे, त्या प्रभुत्वाचें प्रदर्शन एका विशिष्ट मर्यादेपलीकडे करावयाचें नाहीं, अशी धोरणी वागणूक त्यानें ठेविली होती. पण सुलभा बालिश असली तरी प्रेमळ होती. किशोर नाराज झाला आहे ही रुखरुख तिला लागून राहिली होती.

" दादा, वेळ आहे का तुला ? "

" कां हो ताईसाहेब ?—"

" नाहीं म्हटलं आज पाऊस नाहीं. सुंदर संध्याकाळ पडली आहे. लेखाताईकडे जाऊं मजेंत—"

" आणि सकाळच्या वादांत रागावलेल्या माणसाचं समाधान करूं, असंच ना ? "

सुलभा आरक्त होऊन खोलींत निघून गेली. मग शशांक आणि सुलभा किशोरकडे गेलीं. किशोर सकाळच्या गोष्टीवरच चित्रलेखाशीं चर्चा करीत बसला होता. शशांक आणि सुलभा यांना पाहून किशोर चकित झाला.

—आणि सुलभाला किशोरला प्रसन्न करण्याची फारशी यातायातहि पडली नाहीं. लाघवी बोलून किंवा आर्जवें करून दुसऱ्याचा राग घालविण्याची कला सुलभाला

मुळींच साध्य नव्हती. परंतु तिच्या रमणीय बालिश हावभावांच्या अस्त्रापुढें कोणाच्याहि रोषाची त्रेधा उडत असे. त्यांतून किशोर तर तिच्यावर लुब्ध झालेला. तिनें आपण होऊन येणें केलें यांतच तिच्या अंतःकरणांत खोल दडलेल्या स्वतःविषयींच्या प्रेमाचा झंकार त्याला ऐकूं आला. आपल्या साऱ्या मतभेदाला रजा देऊन स्वारीनें संमेलनाला यायचें कबूल केलें. "सुलभा, आमचा कुशल वकील केस घालवून बसला. शाबास तुझी !" अशी चेष्टा करण्यास शशांकनें कमी केलें नाहीं.

* * *

कॉलेजचें सभामंदिर (Assembly Hall) विद्यार्थ्यांनीं नुसतें फुलून गेलें होतें. पायांचे आवाज, आरोळ्या, कागदाचीं विमानें, जिन्यावरून येणींजाणीं इत्यादि गोष्टींनीं त्या सभामंदिराला जणूं चैतन्य आलें होतें. रंगभूमीसमोरील बाजूच्या सर्व खुर्च्या अध्यापक वर्ग, सन्मान्य पाहुणे, आणि विद्यार्थिनी यांच्याकरितां राखून ठेवल्या होत्या. एकादा लोकप्रिय अध्यापक आला कीं टाळ्या पडायच्या, बावळट अध्यापकानें प्रवेश केला कीं 'या मामा !' असा ओरडा व्हायचा, एकादी कॉलेजतारका आली कीं 'वेलकम् जेनेट' 'वेलकम् गार्बो' असे उद्गार निघायचे, आणि सामान्य चेहऱ्यामोहऱ्याची लठ्ठ मुलगी सभागृहांत येतांच 'या काकू' म्हणून तिची संभावना विद्यार्थिवर्गाकडून व्हावयाची असें चाललें होतें. संमेलनाचे सर चिटणीस आणि शाखा चिटणीस कांहीं कामें काढून प्रिन्सिपॉलच्या कानाशीं लागले किंवा मुलींच्या रांगांतून हिंडूं लागले कीं, 'बक अप् बन्या,' 'आहे बुवा शांताराम' या आरोळ्यांनीं सभागृह निनादलेंच. त्या सर्व कल्लोळांवरून विद्यार्थ्यांच्या उत्साहाचा पूर मापतां येई.

आबा सन्मान्य पाहुणे म्हणून प्रिन्सिपॉलच्या रांगेंत बसले होते. किशोर कॉलेजचा नाणावलेला विद्यार्थी म्हणून आणि प्रकाश, शशांक हेहि कॉलेजचे सुप्रसिद्ध माजी विद्यार्थी म्हणून तिसऱ्या चौथ्या रांगेंतच होते.

पहिले कांहीं कार्यक्रम झाल्यानंतर नृत्याच्या कार्यक्रमासाठीं पडदा उघडला. पहिल्यानें पार्श्वसंगीत सुरू होऊन नंतर पैंजणाचे मंजुळ नाद ऐकूं येऊं लागले. आणि पक्ष्यांच्या किलबिलीमागोमाग प्रकट होणाऱ्या उषेप्रमाणें सुलभा रंगभूमीवर प्रकट झाली.

आश्चर्याचा अस्पष्ट उद्गार नकळत सर्व प्रेक्षकवृंदांतून उमटला. इतकी तिची मूर्ति आल्हादकारक होती. तिनें 'मारवाडी' पद्धतीचा लाल घागरा आणि निळी कंचुकी व तांबूस ओढणी परिधान केली होती. बिंदी इतकी झळाळत होती कीं बाकीची सर्व प्रभा आणि शोभा यांचें हें उगमस्थानच वाटावें! हातापायांच्या तळव्यांना आणि नखांना लाल भडक रंग दिला होता, त्यामुळें त्यांचा नाजुकपणा अनेक पटींनीं खुलून दिसत होता. झूल मोत्यांचे असून सुलभाच्या मनोहर गतीला जणूं तालच देत. त्या राजशाही वेषाला शोभणारा सुलभाचा किंचित् झोपाळू चेहरा पाहून, परचक्राच्या निवारणाचे वेळीं जोहार केलेली एखादी रजपूत रमणीच अवतरली आहे कीं काय असा भास होत होता.

वाद्यांच्या स्वरांतून उमटत असलेला भैरवराग आळवीत सुलभा नाचूं लागली....

**अरुणकिरण उदयाचल चुंबित**
**ब्रहम मूरत आई ॥ धृ० ॥**
**सुखद शांतिके कर सहस्र रवि नभमंडल चितराई ॥**
**नवजीवन तरुवर प्रसन्न मृदु कली कुसुम बिखराई ॥**
**मरुत चुम्बि मकरन्द पुष्प परम अलिगण देत उडाई ॥**

पदाचा भावार्थ ती नृत्यांत व्यक्त करीत होती. वेषभूषेंतील निळा, गुलाबी, तांबडा रंग, भैरवाचे सूर, आणि सुलभाच्या चेहऱ्यावर क्षणोक्षणीं होणारे बदल यांमुळें एका चिरकालीन उषःकालांत सौंदर्याचा साक्षात्कार घेतच आपण वावरत आहोंत, असें रसिक प्रेक्षकांना वाटूं लागलें. डोंगरांतून वर येणारे अरुणकिरण आणि उदयाचल यांचें चुंबन दाखवितांना तिनें केलेले आविर्भाव आणि अंगविभंग, व पुष्पांतून उडणाऱ्या भृंगांची गति दर्शवितांना हाताच्या पंजांची आणि बोटांची लयदार हाल-चाल प्रेक्षकांना वास्तव विसरावयास लावीत होती. वाऱ्याच्या झुळकेनें उत्पन्न होऊन पसरत जाणाऱ्या जललहरींप्रमाणें आपले चिमुकले हात ती सफाईनें दूर दूर नेई. आणि ती असें करतांना बोटांचा गौरवर्ण आणि तळव्यांचा रक्तिमा आलटून पालटून दिसे. मध्येंच घागऱ्याचा घोळ पसरून लक्ष्मीचें कमलासनच दिसूं लागावें!

दोन वेळ टाळ्यांचा कडकडाट झाला. धन्यतेचा आनंद सुलभाच्या मुखावर दिसत होताच. पण श्रमामुळें बिंदीच्या खालीं निसर्गानेंहि द्रवरूप मोत्यांची एक माळ निर्माण केली.

पडदा पडला तेव्हां कानठळ्या बसतील असा टाळ्यांचा आवाज होत होता.

*  *  *  *

सर्व कार्यक्रम संपले त्यावेळीं बरीच रात्र झाली होती. सुलभा आज विद्यार्थिनींच्या वसतिगृहांतच जेवणार असल्यानें आबा, शशांक, किशोर वगैरे मंडळी तिचें मनःपूर्वक अभिनंदन करून आणि कौतुकाचे चार शब्द बोलून घराकडे परतली.

किशोर टांग्यांत चढत असतां अंधारांतून दोन माणसें बोलत चाललेलीं त्याला दिसलीं. एकाचा आवाज त्यानें ओळखला. तो सदानंद होता.

"कशी मारू पोरगी आहे. स्क्रीनवर आली तर कॅशबॉक्स वाहूं लागेल पैशाच्या पुरांत."

"आहे खरी." तो दुसरा अपरिचित इसम म्हणाला. "पण असलीं रत्नं जितकीं सुंदर तितकींच दुर्मिळ असायचीं."

"हें नांवाप्रमाणें सुलभ आहे म्हणा." अशी कोटी करून सदानंद मोठ्यानें हंसला.

"पहा बुवा, तुम्ही चतुर आहां."

हें संभाषण ऐकून किशोरचें अंतःकरण संताप आणि त्वेष यांनीं भरून गेलें.

## .१९. अटक

सदानंद आणि तो दुसरा अपरिचित इसम यांचें त्रुटित पण अनिष्टसूचक संभाषण ऐकल्यापासून किशोर अस्वस्थ झाला होता. त्या रात्रीं त्याला नीटशी झोपहि आली नाहीं. सुलभाचा मोहक बालिशपणा लुप्त न व्हावा, पण त्यामुळें जगांतल्या कामुक स्वार्थांचा मार्गहि सुलभ होऊं नये याची त्याला चिंता लागून राहिली होती. सुलभा समजूतदार आणि गंभीर झाली तर तिची कमनीयता नष्ट होईल आणि आहे अशीच राहिली तर जगांतला नीचपणा तिच्यापर्यंत सहज पोंचूं शकेल,—किशोरला अशा प्रकारचा पेंच पडला होता.

सकाळीं तो उठला तेव्हां नित्याप्रमाणें कामाला न लागतां धूम्रवलयें सोडीत व्हरांड्यांत आरामखुर्चीवर पडून राहिला. त्याच्या आवडत्या गाल्सवर्दीची एक कादंबरी घेऊन तो वाचूं लागला. पण तींत त्याला समरस होतां येईना. बावरलेल्या हूड मुलाचें मन जसें वर्गांत न राहतां सदैव बाहेर ओढ घेतें, त्याचप्रमाणें वाङ्मयाच्या रम्य सृष्टींतून व्यवहाराकडे किशोरचे विचार धांव घेत. कादंबरींतलें गुंतागुंतीचें स्वभावचित्रण वाचतां वाचतां, त्याच्या आधारें नकळत आपण सुलभाच्या वृत्तींतल्या विसंगतींचा विचार करूं लागलों आहोंत हें मध्येंच किशोरच्या ध्यानांत येई. त्यानें आपल्या ओढाळ मनाला व्यग्रतेपासून दूर नेण्याचा कितीतरी प्रयत्न केला. परंतु पुनः पुनः तें तिकडे धांव घेत होतें.

अशाच मानसिक संगरांत किशोर असतांना टेलिफोनची घंटा वाजली.

वास्तविक टेलिफोनवर बोलावणें येणें ही नित्याची सरावाची गोष्ट होती. पण आज मन खिन्नतेनें कुंद झाल्यामुळेंच कीं काय किशोर घंटा ऐकतांच दचकला आणि घाईघाईनें तो टेलिफोनकडे गेला.

"हलाव्, कोण आहे ?"

"कोण शशांक......काय ? लेखाताई आणि मी लौकर आनंदभुवनाकडे येऊं ? प्रकाशला अटक झाली आहे !"

"केव्हां ?..."

किशोरला धसका बसला.

"आतांच का ? ५–१० मिनिटांत येतों."

किशोरनें रिसीव्हर खालीं ठेविला आणि चित्रलेखाकडे धांव घेतली. तिची खोली आंतून बंद होती. स्नान करून नुकतीच वेषभूषा करण्यास ती आंत शिरली होती.

"लेखाताई, दार उघड."

"किशोर, जरा थांब."

"नाहीं आतां वेळ नाहीं. प्रकाशला अटक झाली आहे. आतांच शशांकचा टेलिफोन आला. चल, आपल्याला गेलं पाहिजे. मग फरासखान्यांत त्याची गांठ नाहीं पडायची."

"काय, प्रकाशना अटक ? अरे देवा....." चित्रलेखानें पातळ कसेंतरी गुंडाळलें आणि घाईघाईनें दार उघडलें. तिचे ओठ थरथरत होते. रुद्धकण्ठानें ती म्हणाली, "चल आलेंच मी."

पांच मिनिटांच्या आंतच किशोर आणि चित्रलेखा मोटरमधून आनंदभुवनकडे जाऊं लागलीं.

"काय प्रकाशचं जीवन हें ! कसला भरंवसा नाहीं ! बाहेर आहेत तोंपर्यंत सारखी वणवण करायची. पोटाचा उद्योग आणि सार्वजनिक चळवळी यांत बिचाऱ्याला क्षणाचा विसांवा नाहीं. आणि मध्येंच असं गंडांतर आलं कीं तुरुंगांतली सक्तमजुरी आहेच. वयासारखंच शरीरहि अगदीं कोवळं आहे त्यांचं. श्रीमंती ऐषारामांत राह्यला योग्य आहेत ते. पण दुर्दैवानं साध्या माणसाइतकीहि स्वस्थता नाहीं मिळत

त्यांना, आणि आपण मनांत आणलं तरी त्यांचे कष्ट आपण कसे वांटून घेणार ?" चित्रलेखा किशोरला उद्देशून हें बोलत होती. किशोर व्यग्र मनानें बसला होता. पण चित्रलेखाच्या भाषणांतला कळवळा त्याला जाणवल्याखेरीज राहिला नाहीं. चित्रलेखाचें बोलणें कांहींसें आत्मगतच होतें. प्रकाशच्या कष्टमय जीवनांत भाग घेऊं पाहणारें, पण सुखलोलुपतेनें मागें हटलेलें तिचें मन तिच्या भाषणांत प्रतिबिंबित झालें होतें.

मोटर आनंदभुवनपाशीं आली.

बाहेर एक काळी बंद डब्याची मोटरगाडी उभी होती. ड्रायव्हर आणि मागचे रक्षक यांच्या पोशाखावरून ती पोलीसांचीच मोटर आहे हें सहज ओळखतां येत होतें.

किशोर आणि चित्रलेखा घाईघाईनें जिना चढून वर आलीं.

प्रकाशच्या खोलींतील देखावा गंभीर होता. खुद्द प्रकाशच्या चेहऱ्यावर स्तब्धपणाखेरीज कोणताच भाव नव्हता. शशांक मात्र घाबरल्यासारखा दिसत होता. प्रकाशच्या सामानाची कांहीं व्यवस्था लावतांना आणि पैशाची निरवानिरव करतांना त्याचें सर्वांग कापत होतें. पोलिस अधिकारी नेहमींचा रुबाब टिकविण्याची शक्य तेवढी दक्षता घेऊन खुर्चीवर बसले होते.

किशोर आणि चित्रलेखा आंत शिरतांच हास्यमुद्रेनें प्रकाश म्हणाला, "किशोर, लेखाताई आलांत. चाललों आम्ही ट्रिपवर !"

त्या विनोदानें एकंदर विषण्णतेंत भरच पडली. प्रकाशनें सकाळपासून चहा घेतला नव्हता, तवढा घेऊं द्यावा अशी शशांकची इच्छा होती. पण पोलिस अधिकाऱ्यांस विचारण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं. किशोर येतांच त्यानें किशोरला कानांत ही गोष्ट हळूच सांगितली. किशोरनें अशा दरबारी पद्धतीनें अधिकाऱ्यांना विचारलें कीं त्यांना नकार देण्याची सोयच उरली नाहीं.

"घेऊं द्या चहा आरोपीला. पण लौकर आवरा. अगोदरच आमची खोटी झाली आहे."

शशांक आणि चित्रलेखा यांनीं चहाची सिद्धता केली. किशोरच्या विनंतीस मान देऊन अधिकाऱ्यांनींहि चहापानांत भाग घेतला.

"घ्या चहा किशोर, शशांक, लेखाताई...." प्रकाश बोलूं लागला, "पुनः आपल्या कधींकाळीं भेटी होतील न कळे. आपल्या इच्छेप्रमाणें वाटेल तितकं एकत्र राहायला मिळेल अशी माझी परिस्थिति नाहीं. लहानपणीं आपण सोन्याच्या पक्ष्याची गोष्ट वाचल्याचं आठवतं ना ? तो पक्षी रात्रीं बागेंतलीं फळं खाऊन जायचा. कोणाला दिसायचा नाहीं. आणि पहांटे एकाद दुसरं सोन्याचं पीस मात्र सांपडायचं. आपल्या जीवनांतला आनंद असाच दुर्मिळ आहे. तो आपल्या उद्यानांत केव्हां येऊन जातो हें कळत नाहीं. मग असल्या मधुर प्रसंगाचीं पिसं सांपडतात तींच जतन करून ठेवायचीं."

प्रकाशचें अंतःकरण विशेष प्रसंगानें खळबळलें असलें म्हणजे त्याच्या भाषणांत प्रतिभेचें तेज विशेष दिसून येई. आज तो असेंच बोलत होता. परंतु आनंदाच्या दुर्मिळ क्षणाचें हें मनोहर पण उदास वर्णन ऐकून सारींजणेंच अधिक श्रमी झालीं. चित्रलेखानें कसाबसा हुंदका आवरून धरला होता. शशांकचे डोळे ओले झाले होते आणि किशोरच्या चेहऱ्यावर कधीं न दिसणारी दुःखाची छाया दिसत होती.

"आरोपीला आज रात्रीं बाराच्या गाडीनं कल्याणला घेऊन जाणार आहोंत. तिथं भेटी होतील. जेवण पाहिजे तर फरासखान्यांत द्या आणून. फरासखान्यांत मुलाखत मात्र मिळायची नाहीं." असें फर्मावून पोलिस अधिकारी प्रकाशला घेऊन निघाले. किशोर, चित्रलेखा, आणि शशांक मोटरीपर्यंत आले होते.

मोटर सुरू होतांच प्रकाशनें हास्यमुद्रेनें 'गुडबाय्' म्हटलें. "आम्ही रात्रीं स्टेशनवर येतोंच आहों." एवढेंच किशोरनें उत्तर दिलें.

मोटरचीं मागील दारें बंद करून दाराशीं दोन पोलीस बसले. प्रकाश दृष्टीआड झाला. मोटर एका अर्ध्या मिनिटांत दिसेनाशी झाली.

चित्रलेखाचा आतांपर्यंत दाबून धरलेला हुंदका बाहेर पडला. शशांकच्या डोळ्याला पाणी आलें. बहिणीचा आणि मित्राचा शोकावेग आवरतां आवरतां, आपल्या अश्रूंना कह्यांत ठेवण्याचा बिकट प्रयत्न किशोरला करावा लागत होता.

*    *    *

आज पावसानें कहर केला. मध्यंतरीं पंधरा दिवस उघाडी होती. पण आज दुपारीं दोन वाजल्यापासून चहूंबाजूंनीं आकाशांत मेघांची गर्दी होऊं लागली.

मधूनच वारा सुटून त्यांची पांगापांग होईल असें क्षणभर वाटे, पण वारा पडून पुनः नव्या दमानें नवीन दळें येऊन पहिल्या प्रचंड सेनेंत सामील होत. पांच साडे-पांचला वृष्टि सुरू झाली, थोड्याच वेळांत जिकडे तिकडे पाणीच पाणी होऊन गेलें. जनावरांच्या पाठी पाण्याच्या मारानें थरारत होत्या. पाण्याखालीं दडलेले पुण्याच्या महशूर रस्त्यांवरील खड्डे मोटारींना दगा देत होते, आणि वरून पाण्याचा आणि वाहनांमुळें उडणाऱ्या चिखलाचा मारा चुकवितां चुकवितां पायदळी चालणाऱ्या माणसांचे हाल होत होते! रेडियोवर संगीत सुरू झालें खरें, पण गोड तान मध्येंच बंद पडून खरखर असा कर्कश आवाज होई. आणि मधूनच अंधाऱ्या खोलींत कोणी कण्हावें तशी ती तान खोल व मंद उमटूं लागे.

रात्रीं सवा अकराच्या सुमाराला सर्व मंडळी स्टेशनवर आली. पाऊस थोडा थांबला होता. फ्लॅटफॉर्मवर जिकडे तिकडे पाणीच पाणी झालें होतें. पाण्यानें चकचकीत झालेल्या पृष्ठभागावर छताला लटकलेल्या दिव्यांचीं लांबलचक तुळयांसारखीं प्रतिबिंबें पसरलेलीं दिसत, आणि तीं त्यांहूनहि लांब व विशाल पडणाऱ्या इतर वस्तूंच्या काळ्या सावल्यांना अधिकच भेसूरपणा देत. प्लॅटफॉर्मवर गर्दी नव्हती आणि रेल्वेवरून एंजिनांचीहि विशेष ये जा चालू नव्हती. त्यामुळें कांहींसा भयाणपणा वाटे, आणि दूर कॅबिनमध्यें घंटा वाजली किंवा एंजिनची शीट दुरून ऐकूं आली कीं त्या भयाणपणाची उत्कटता जास्त वाढूं लागे.

प्रथम आबा, रमाबाई, शशांक आणि सुलभा आलीं. पांचच मिनिटांनीं चित्रलेखा आणि किशोर यांनीं प्लॅटफॉर्मवर प्रवेश केला. किशोरनें प्रवासाला साजेसा पोषाख चढविला होता. त्याच्या मागोमाग होल्डऑल आणि बॅग घेऊन एक हमालहि आला. किशोर प्रकाशबरोबर कल्याणला जाणार हें उघड होतें.

दोन तीन खादीवेषधारी पुढारी आणि कांहीं कामगार मंडळी स्टेशनच्या एका टोंकाला जमली होती. किशोर आणि शशांक येतांच ती सर्व मंडळी त्यांच्याकडे येऊन प्रकाशच्या अटकेसंबंधीं विचारपूस करूं लागली.

आबा कांहींच बोलत नव्हते. तथापि त्यांची मुद्रा दुःखी दिसत होती. प्रकाशचीं मतें आणि प्रवृत्ति त्यांना आवडत नसली तरी प्रकाशबद्दल त्यांना तसें फार प्रेम वाटे.

अशी शंभर नंबरी व्यक्ति जर आपल्या प्रतिपादकांच्या पंथांत शिरली तर आपलें समाजसुधारणेचें कार्य जोरानें वाढीला लागेल असें आबांना वाटे. प्रकाशचें बहुमोल आयुष्य तुरुंगाच्या चक्रांतून रगडून निष्फळ जात असलेलें पाहून आबांना खेद होई.

रमाबाई आणि सुलभा यांच्याकडे येऊन चित्रलेखा सकाळची हकीकत सांगत होती. रमाबाई डोळ्यांस मधून मधून पदर लावीत. सुलभाच्याहि डोळ्यांत पाणी उभें राही.

इतक्यांत दोघां पोलिसांच्या पहाऱ्यांत प्रकाश तेथें आला. गाडी प्लॅटफॉर्मला लागलीच होती. एक डबा पाहून पोलिसांनीं प्रकाशला तिकडे नेलें. सर्व मंडळी डब्याभोंवतीं गोळा झाली. कांहीं आंत शिरली. किशोरनें आपलें सामान त्याच डब्यांत लावून तो दारांत येऊन उभा राहिला.

प्रकाशनें प्रथम आबा आणि रमाबाई यांना अभिवादन केलें आणि सुलभाची स्मितपूर्वक विचारपूस केली. रमाबाईंच्या तोंडांतून शब्द उमटेना. पण आबा म्हणाले, " काय हें तुझ्यामागं लागलं आहे! प्रकाश, तुझ्यासारख्या तेजस्वी तरुणानं ऐन अमदानींत संन्याशासारखं खडतर जीवन कंठावं आणि आम्ही वृद्धापकाळीं ऐषारा-मांत राहावं. खरोखर माझी मलाच कित्येकदा लाज वाटते. "

" पण आबा, मला आग्रह का केलाय् कुणी ? "

" प्रकाश, तुझ्या इतकं हातांत आहे, मग कशाला रे तुरुंगांत जातोस ? तूं नसलास म्हणजे दादाला अन् आम्हा सगळ्यांनाच कसं उदास वाटतं ! " सुलभा रडवें तोंड करून म्हणाली. तिच्या त्या गोड आणि कळकळीच्या तक्रारीची प्रकाशला फार गंमत वाटली. तिला समजाविण्याच्या उद्देशानें तो म्हणाला, " सुलभा, असं आपण तरुण मंडळींनीं का म्हणावं ? अग, तूं तर माझ्यापेक्षां जहाल कॉम्रेड ना ?....अन् मी कांहीं तुरुंगांत जाईनच असं नाहीं. सुटेन सुद्धां. सुटून आलों तर तुला कांहीं तरी फॅन्सी चीज आणीन मुंबईहून. "

असल्या बिकट प्रसंगीं प्रकाशच्या त्या सहज बोलण्याचें सर्वांना कौतुक वाटलें. कामगारांनीं प्रकाशचे दोन शब्द ऐकायला मिळावे म्हणून विनंति केली. पुण्यांत प्रकाशनें आरंभिलेल्या सर्वच लहानमोठ्या चळवळींचा आधार त्याच्या या अटकेमुळें

तुटला होता. कामगारांना आपला कैवारी दूर जाणार यामुळें भ्रांत पडली होती. तिचें दुःख त्यांच्या चेहऱ्यावर स्पष्ट दिसे.

शशांकला कांहींच बोलवत नव्हतें. प्रकाश चार दिवस दूर झाला तर विकल होणारें त्याचें हृदय प्रकाशचा वियोग वर्ष दोनवर्षें सोसावा लागणार या कल्पनेनें बधीर झालें. खिडकीपाशीं बसलेल्या प्रकाशचा हात जणूं आधारासाठीं हातांत धरून तो प्लॅटफॉर्मकडे पहात होता.

—आणि चित्रलेखा! तिच्या वेदनांचें मापन कोणाला करतां येईल! प्रकाशविषयींची खरी भावना तिला व्यक्त करतां येणें शक्य नव्हतें. एका किशोरखेरीज आपल्या अंतःकरणांत चाललेल्या भयंकर तांडवाचा पत्ता तिनें कोणालाहि लागूं दिला नव्हता. तिच्या कापसासारख्या मृदु हृदयांत विकारांच्या ठिणगीनें भडका उडाला होता. पण ही आग आपली आपणच विझविली पाहिजे हें तिला कळे. प्रकाशवर आलेल्या प्रसंगांत उघडपणें अश्रु गाळण्याचा अधिकार आपला नाहीं, याची दुःखकारक जाणीव यावेळीं तिला तीव्र वेदना देत होती. गाडी हलण्याच्या पूर्वी एकदा सर्वांना दूर करून प्रकाशजवळ जावें, आणि त्याचे दोन हात हातांत घेऊन प्रेमभरानें त्याच्याकडे पहावें अशी अनावर इच्छा तिला होत होती.

—पण तें शक्य होतें का?

गाडी सुडण्याची वेळ झाली.

प्रकाशनें एकवार शशांकला जवळ घेतलें आणि प्रेमानें हस्तांदोलन केलें. "मी बाहेर येईपर्यंत प्रकाशचित्रमंदिराचा लौकिक हिंदुस्थानभर पसरूं दे" अशी आशीर्वादरूप इच्छा प्रकाशनें प्रकट केली.

"किशोर, बरोबर येत आहेतच तेव्हां आतां काळजी नाहीं पुढील व्यवस्थेची." आबा म्हणाले.

प्रत्येकाशीं थोडें बोलून प्रकाशनें सर्वांना अभिवादन केलें. गाडी चालू झाली. आतांपर्यंत थांबलेला पाऊस एकदम कोसळला. बाहेर अंधारांत पडणारी मुसळधार, आंत उडणारे तुषार, आणि डोळ्यांत गर्दी करणारें पाणी या सर्वांच्या परिणामामुळें, आपण अश्रूंच्या समुद्रांतून चाललों आहोंत असें प्रकाशच्या शशांकचित्रलेखांसारख्या सुहृदांना वाटत होतें!

## २०. अनपेक्षित धक्का

पत्त्याचा बंगला बांधून झाल्यावर कित्येकदा मुलें त्यांतलें एकएक पान काढून घेऊं लागतात. त्या काढलेल्या प्रत्येक पानाबरोबर बंगल्याचा डोलारा अधिकाधिक डळमळीत होत जातो. अखेर एक पान काढतांच तो ढासळतो. मनुष्यांच्या आशां-संबंधीं असेंच नाहीं का म्हणतां येणार! एकेका गोष्टींत मनुष्य निराश होतां होतां शेवटीं एक गोष्ट अशी होते कीं तिच्या बरोबर साऱ्या आशांचा मनोरा जमीनदोस्त होतो; आणि त्याच्या ढिगाऱ्याखालीं सांपडून मन चेंगरून निघतें.

छाया गेले कांहीं दिवस अशाच निराशाचक्रांत सांपडत चालली होती. तिच्या बरोबरीचा तिचा भाऊ दोनतीन वर्षांमागें एकाएकीं निवर्तल्यामुळें बाबा आणि मामी हीं उदास असत. धाकटीं भावंडें अरविंद आणि प्रेमा हीं अजाण! जगांतील वारेवादळ सोसून जेव्हां त्यांना उभारी येईल तेव्हां तीं आपलीं म्हणावयाचीं! माता-पित्यांच्या आसऱ्याचें एकच स्थान म्हणजे छाया! पण ती अलीकडे मधून मधून दुःखी दिसूं लागल्यानें त्यांना अस्वस्थता वाटे.

—आणि त्यांतच छायाच्या वडिलांना एक लहानशी जखम होऊन ती विकोपाला गेली होती. डॉक्टर वैद्यांचे उपचार चालू होते, परंतु बरें वाटण्याचीं चिन्हें दिसेनात. त्यांची जीवनशक्ति दिवसेंदिवस क्षीण होत होती. ओहटींत सांपडलेल्या दुबळ्या माणसाला आपण क्षणोक्षणीं मृत्यूकडे खेंचले जात आहोंत अशी जशी जाणीव असते तशी ती छायाच्या वडिलांना होती. पत्नी जवळ नसली म्हणजे छायाला ते म्हणत, "ताई, तूं माझा मोठा मुलगाच आहेस असें मी समजतों.

माझ्यामागें हिचा आणि आपल्या भावंडांचा संभाळ तूं करशील अशी खात्री वाटते." त्या रुग्ण पित्याला धीराचें प्रत्युत्तर देण्याचे ऐवजीं छाया अश्रुविमोचन करूं लागे. तिचें धैर्य, संस्कार, समजूतदारपणा यांचा कांहीं उपयोग होत नसे.

दुसराहि एक भयंकर विचार तिच्या मनांत येई. प्रेम आणि स्वार्थ यांपैकीं कोणती भावना या विचारांत प्रबळ होती हें सांगणें कठीण होतें. येऊं नये तो प्रसंग आपल्या कुटुंबावर आला तर आपल्या भवितव्याच्या बांधणींत आपला कांहींच हात उरणार नाहीं. कर्तव्याच्या जबाबदारींत आपण जखडले जाऊं आणि मग परिस्थिति फिरवील तसें फिरावें लागेल! सर्व कांहीं सुरळीत असतांनादेखील प्रकाशच्या जीवनांत एकरूप होणें हें बिकट आहे. मग कर्तव्याच्या विवंचना लागल्यानंतर तर त्या गोष्टीचा विचारच करायला नको! हा विचार छायाला इतकें उद्विग्न करून सोडी कीं, त्याची चाहूल लागतांच भीतीनें थरारून छायानें हृदयाचे पडदेन् पडदे झटकावे आणि तो दूर करण्याचा आटोकाट प्रयत्न करावा! पण नजर चुकवून तो तेथेंच कोठेंतरी दडून राहत असे.

पण आपण प्रकाशविषयीं जी उत्कट भावना बाळगून आहोंत तिला प्रकाशच्या हृदयांत कांहीं मान आहे का? हीहि शंका केव्हां प्रबळ होऊन बसे. कृष्णचंद्र पुण्यास आहेत, प्रकाशविषयीं त्यांना आपलेपणा वाटतो, तेव्हां आपल्याविषयीं प्रकाशला ते इषारा देऊन ठेवणार नाहींत कशावरून? कृष्णचंद्र वृत्तीनें थोर आहेत. परंतु प्रेमविषयांतला मत्सर सज्जन माणसाला सुद्धां केव्हां हीन बनवील याचा काय नेम? अशा प्रकारचा संशय अंतःकरणाला कधींहि चैन पडूं देत नाहीं. एकादें विषारी जिवाणू डोळयांसमोरून येऊन आपल्या घरांतील एकाद्या बिळांत शिरून बसावें, म्हणजे आपल्याच घरांत वावरतांना जशी धागधूग वाटते तशी छायाला वाटे.

तिनें सुलभाला एक पत्रहि पाठविलें होतें. वडिलांच्या प्रकृतीविषयीं एक अवाक्षरहि न लिहितां तिनें प्रकाशच्या अंतःकरणाचा ठाव घेण्याचें काम सुलभाला सांगितलें होतें. परंतु गॅदरिंगच्या वातावरणांत रमून गेलेल्या सुलभाला या महत्वाच्या कामाची आठवणहि राहिली नाहीं. सुलभाची वृत्ति ठाऊक असतांना छायाला यांत विशेष वाटायला नको होतें. पण समजूतदार माणसेंहि कांहीं बाबतींत फार हळवीं आणि असमंजस असतात. छायाला वाटलें, प्रकाशच्या अंतःकरणांत आपल्याबद्दलची नाजुक भावना न आढळल्यामुळेंच सुलभानें पत्र लिहिलें नसेल!

ह्या साऱ्या विचारांनीं आणि कुकल्पनांनीं क्षुब्ध होऊन सकाळीं छाया आपल्या बंगल्यांतील पोर्चमध्यें उभी होती. पंधरा पंधरा मिनिटांनीं अगदीं अंधारून येत होतें. छायानें सहज वर पाहिलें तों अंधार पडल्यासारखें दिसत होतें. इतक्यांत नेहमींच्या वर्तमानपत्रवाल्यानें एक दैनिक आणून टाकलें. छायानें शून्य दृष्टीनें त्याकडे पाहिलें, पण लागलीच ती चमकली. प्रकाशचा फोटो मुख्य पृष्ठावर कां आला? तिनें घाई घाईनें जाऊन वर्तमानपत्र हातांत घेतलें.

**' भाई प्रकाश यांना अटक '**

असा जाड टाइपांत मथळा असून प्रकाशच्या फोटो शेजारीं पुढील मजकूर होता—

" पुण्याचे सुप्रसिद्ध तरुण पुढारी भाई प्रकाश यांना काल कल्याणच्या पोलिसांनीं पुणें येथें त्यांच्या राहत्या घरीं अटक केली. रात्रींच्या गाडीनें त्यांना कल्याण येथें आणण्यांत आलें. त्यावेळीं पुणें स्टेशनवर कॉंग्रेसचे व कामगारांचे पुढारी आणि प्रकाश यांची मित्रमंडळी आली होती. प्रकाशबरोबर त्यांचे स्नेही पुण्याचे तरुण ॲडव्होकेट किशोर हे आले आहेत. "

साऱ्या अनिष्ट गोष्टी जणूं जमत आल्या आणि एवढीच व्हायची राहिली होती. छायाला उमाळा आवरेना. त्याच वर्तमानपत्रानें तोंड झाकून घेऊन ती रडूं लागली. मनुष्याचें मन आयुष्यांतल्या गुंतागुंती सोडविण्याचा एका पद्धतीनें विचार करीत असतें, पण मध्येंच अकल्पित संकट आलें कीं ती सर्व योजना जागच्याजागीं थिजते. कर्तव्य आणि प्रेम यांच्या झगड्यांत समेट कसा करतां येईल, हें पाहण्यांत चिंतामग्न झालेल्या छायाला हा अनपेक्षित धक्का बसला.

*　　*　　*　　*

" आई, बाबा ताई रडते आहे.

तोंडावर वर्तमानपत्र आहे. पण मीं मागनं बघितलं; "

" जा, जा, तुम्ही पहा. " बाबा विव्हळ होऊन मामींना म्हणाले.

" काय झालं बाई पोरीला ! " असें म्हणत मामी त्वरेनें पोर्चमध्यें आल्या.

छायानें अश्रु पुसले होते. तिचे डोळे आणि नाक लाल झालेलें दिसत होतें.

चेहऱ्यावर भेदरलेल्या मनाचें प्रतिबिंब उमटलें होतें. हातांत तें वर्तमानपत्र घेऊन समोर शून्य दृष्टीनें पहात छाया उभी होती.

"ताई, बाळ काय झालं! तुझे डोळे लाल कां दिसतात?" मामींनीं डोळ्यांला पाणी आणून विचारिलें.

"छे, कुठं? कांहीं तरीच!"

"ताई, असं लपवून ठेवूं नकोस. प्रेमा आणि विंदा आतांच सांगायला आलीं होतीं."

"कांहीं तरीच समज झाला पोरांचा." छायानें बळेंच हंसूं आणून म्हटलें.

बाबा आणि मामी यांना जरी छायानें आपल्या अश्रुविमोचनाची वार्ता खोटी भासविण्याचा प्रयत्न केला, तरी तिची कष्टी वृत्ति आज त्यांच्या लक्षांत आल्यावांचून राहिली नाहीं. आज ती अबोल झाली होती आणि बोले तेव्हां बोलण्याचा प्रयत्न केल्यासारखा दिसे. पोरीला काय झालें असावें याचा तर्क मामींना होईना. मग वडिलांच्या प्रकृतीविषयींचीच भयंकर चिंता वाटत असावी अशी त्यांनीं समजूत करून घेतली. पण या समजुतीनें त्यांच्याच तशा प्रकारच्या काळजीचें स्वरूप अधिक भेसूर होत गेलें. बाबांना मात्र छायाच्या दुःखाचा थोडासा सुगावा लागला असावा. विशेषतः आज त्यांना वर्तमानपत्र वाचून दाखवितांना प्रकाशच्या अटकेसंबंधीं वाचत असतां तिचा घोगरा झालेला स्वर आणि भयकंपित मनोवृत्ति बाबांच्या लक्षांत आली. आणि त्या बातमीविषयीं बोलतांना तिचा धीटपणा, मनमोकळेपणा पार नाहींसा झालेला त्यांना दिसला.

दुपारीं चारपर्यंत छायानें कसातरी दिवस रेटला. मग तिचें तिलाच राहवेना. बाबांना औषधपाणी देऊन होतांच त्यांच्या बिछान्याशेजारीं कोणी नाहींसें पाहून तिनें भीत भीत विचारिलें.

"बाबा, मी कल्याणला जाऊन येऊं?"

"पोरी, तुझ्या दुःखाचं कारण माझ्या ध्यानांत आलं. सकाळपासून तूं कितीहि लपवून ठेविलं असलंस तरी तुझी चलबिचल माझ्या नजरेंतून सुटली नाहीं."

त्या दुःखी मनःस्थितींतहि लज्जेची सुंदर छटा छायाच्या मुखावर उमटली.

"जा तूं कल्याणला. ही बोलण्याची वेळ नव्हे. पण चार शब्द तुला सांगावेसे वाटतात.... माझी दशा दिवसेंदिवस काय होत आहे तें पाहतेच आहेस तूं! श्याम-

कांत गेल्यापासून माझं मनच खचलं आहे. ताई, या मोडकळीस आलेल्या माझ्या संसाराला तुझाच एक आधार आहे. मीं तुला मुलगी म्हणून नव्हे तर मुलगा म्हणून वाढविलं आहे. कठीण प्रसंगीं विंदा, प्रेमा आणि ही यांचा संभाळ तुला केला पाहिजे. लहानपणीं कितीतरी दिवस आम्ही तुला पुरुषाचा पोषाख घालीत होतों. त्यावेळीं सर्वजण तुला चांदबिबी म्हणायचे. संसारांत दुःखाचं परचक्र येऊन तुला खरोखरच चांदबिबीसारखं लढावं लागणार आहे बरं ताई."

"बाबा, मी आपल्या कर्तव्यांत चुकेन असं का वाटतं तुम्हांला?"

"तसं नाहीं ताई, पण आतांपर्यंतची गोष्ट वेगळी होती. आतांपर्यंत सर्व कांहीं सुरळीत चाललं आणि तूंहि अजाण होतीस. आतां प्रसंग बिकट येण्याचा संभव आणि तूं तारुण्यांत आली आहेस. प्रकाशचा लौकिक मी फार ऐकतों. असतीलहि ते चांगले. पण हें असं अनिश्चित जीवन त्यांचं. त्यांत तूं गुंतलीस म्हणजे पितृ-गृहींचीं कर्तव्यं मनांत असून सुद्धां पार पाडतां येतील का तुला?"

"बाबा, तुम्ही कांहीं वेडंविद्रं बोलूं नका. तीं कर्तव्यं पार पाडण्याची पाळी देवदयेनें माझ्यावर न यावी, अशीच मी परमेश्वराजवळ दररोज प्रार्थना करीत आहें."

"बरं, जा तूं. लोकल चुकेल तुझी. शिवाय सहानंतर जेलमध्यें कोणाला भेटूं देत नाहींत."

छाया विजेसारखी उठली आणि आपल्या खोलीकडे तयारीकरितां जाऊं लागली.

"ताई, ताई" प्रेमा धांवत आली. "आपल्याकडे ते मागें आलेले पुण्याचे पाहुणे आले आहेत. अन् त्यांच्या बरोबर दुसरे एक गोरे गोरे पाहुणे आहेत." छायाला आश्चर्य वाटलें.

इतक्यांत अरविंद तेथें येऊन पोंचला. "ताई, तूं आज सकाळीं त्या वर्तमान-पत्रांतला फोटो पाहून रडत होतीस ना, तसा आहे त्यांचा चेहरा!"

"कोण प्रकाश...किशोर" छाया दिवाणखान्याकडे वेड्यासारखी धावत जाऊं लागली.

## .२१. कष्टी चक्रवाकी

" प्रकाश, किशोर..."

" का हो ? आश्चर्य वाटलं तुम्हांला ? "

" कां नाहीं वाटणार ? आज सकाळीं वर्तमानपत्रांत तें वाचल्यापासून उभं वारं सुटलं होतं. प्रकाश आतां कधींकाळीं भेटतील कोण जाणे असं वाटलं. "

" पण आजच घेऊन आलों कीं नाहीं ? तुम्हांला वाटत असेल कीं बादशहाच्या सरकारला फसवून कोठडींतून पळवून आणलं या राजद्रोही माणसाला ! "

छायाला अर्थात् असें वाटणें शक्य नव्हतें. पण आज प्रकाश कसा येऊं शकला याचें तिला नवल वाटलें हें मात्र खरें. किशोरनें कल्याणला येतांच जामिनावर प्रकाशची मुक्तता होईल अशी खटपट केली हें ऐकून तिला जसें समाधान वाटलें, तसाच किशोरविषयींचा प्रेमादरहि अनेक पटींनीं वाढला.

प्रकाश आपल्या घरीं आला, आणि तोहि असा अकल्पित रीतीनें यामुळें छायाला जो वेडसर उत्साह चढला त्याला सीमाच नाहीं. किशोरचें सामान घेऊन ती प्रथम स्वयंपाकघराकडेच जाऊं लागली. ती चूक तिच्या लक्षांत येतांच तिचें तिलाच हंसूं आवरेना. खालीं व्हिक्टोरियावाल्याला देण्याकरितां मोड पाहिजे होती हें तिच्या लक्षांतच राहिलें नाहीं आणि लक्षांत आलें तेव्हां तिनें किशोरच्या हातावर रुपया ठेविला. किशोरला या साऱ्या गोष्टींची खूपच गंमत वाटली. अरविंद आणि प्रेमा यांनीं आपल्या ताईला मधून मधून प्रश्न विचारले, पण छायाचीं उत्तरें ऐकून त्यांना कांहींच बोध होईना ! आज अनेक दिवस दुःखद विचारांत पोळत राहिलेल्या

तिच्या मनावर ही आनंदवृष्टि अकस्मात् होत होती. साहाजिकच तिच्या वागणुकींत गोंधळ होऊं लागला.

आपण एकदम प्रकट होऊन छायाला चकित केलें याबद्दल प्रकाश आणि किशोर दोघांनाहि जरी प्रथम मौज वाटली, तरी छायाच्या किंचित् कृश देहयष्टीकडे आणि खिन्न चेहऱ्याकडे पाहिल्यावर त्यांना वाईट वाटलें. बाबांच्या आजारीपणाची वार्ता छायानें पुण्यापर्यंत पोचूं दिली नव्हती. दुःख वेशीवर टांगण्यानें दुसऱ्यांस जेवढा कळवळा येत नसेल, तेवढा दुःख निमूटपणें सोसतांना पाहून येतो. बाबांची प्रकृति या थराला आली, पण कॉलेज आणि घर संभाळून, छाया अंधारांत चाललेल्या भवितव्याला तोंड देऊन उभी आहे हें पाहून प्रकाश आणि किशोर मुग्ध झाले.

चहा झाल्यानंतर छायानें प्रकाश आणि किशोर यांना बाबांकडे नेलें.

"बसा किशोर, प्रकाश...." बाबा बोलूं लागले, "आज सकाळीं पेपरमध्यें ती बातमी वाचली तेव्हां म्हटलं प्रकाश आतां कसचे दिसतात मला! पण सुदैव माझं कीं तुम्ही भेटलां. शशांकच्या पत्रांतून तुमच्याबद्दल कळलं होतं. आमची ताई तर पुष्कळच सांगते तुमच्याविषयीं. प्रकाश, तुम्हांला पाहिलं म्हणजे तुमच्याबद्दल ऐकलेलं सर्व खरं वाटूं लागतं."

प्रकाश अचल होता. आपल्या चेहऱ्यावर उमटणारे लज्जा आणि आनंद यांचे भाव किशोरच्या तीक्ष्ण दृष्टींतून सुटावे याविषयीं छाया दक्षता ठेवीत होती.

"प्रकाश, पहिल्याच भेटीला मीं तुम्हांला उपदेशाच्या चार गोष्टी सांगणं धाष्टर्याचं आहे. पण आम्ही आतां तिकिटं काढून बसलेलीं माणसं. केव्हां गाडींत बसून दिगंतराला पसार होऊं याचा नेम नाहीं. तुमची आणि माझी कदाचित् अखेरचीच भेट ठरायची."

"असं अशुभ कां बोलतां बाबासाहेब?"

"शुभाशुभाचा प्रश्नच उरलेला नाहीं. माझं मला सर्व स्वच्छ दिसत आहे. प्रकाश, आतां तुम्ही आजवर लढलां, झगडलां, फुलपाखरासारखं तारुण्य न घालवितां पतंगाप्रमाणें दिव्यावर झेप घेत आहां. तुमच्या शौर्याची सर्वांना खात्री पटली आहे. आतां हा कष्टाचा मार्ग सोडून आयुष्याची व्यवस्था, स्थिरता पाहूं लागणं नाहीं का उचित?"

" बाबासाहेब, मला कांहीं सिद्ध करण्याकरितां किंवा लोकांवर छाप पाडण्याकरितां जिवाचे हाल करून घ्यायचे नव्हते आणि नाहींतहि! आजच्या समाजचक्रांत ज्याला प्रामाणिकपणें जगायचं आहे त्याचा मार्ग असाच दगडधोंड्यांनीं भरलेला आहे. स्थिरता म्हणजे तडजोड, डोळ्यांवर कातडं ओढून जगणं. माझ्या वृत्तीला तें शक्य नाहीं. समाजचक्रांत भरडल्या जाणाऱ्या लाखों जीवांतलाच मी एक. "

" नाहीं प्रकाश, तुमचे गुण अलौकिक आहेत म्हणूनच तुम्ही भरडून निघतां उपयोगीं नाहीं. समाजाची ती हानि आहे. अन् तडजोडीबद्दल म्हणाल तर ध्येयसिद्धीसाठीं तरी तडजोड करावी लागतेच कीं नाहीं? "

" समाज एका प्रकारच्या परिस्थितीनं पिळून निघत असतां, एका व्यक्तीनं आपल्या भोंवतीं वेगळीं कुंपणं घालून, गारवा तयार करून आपला विकास करून घेणं समाजाला मोठंसं हितावह होतं असं नाहीं. मग ती व्यक्ति नैसर्गिक गुणांनीं कितीहि मोठी असो. आणि तडजोडीविषयीं म्हणाल तर तडजोडीनं ध्येयसिद्धि होईल यावर माझा विश्वासच नाहीं. इतर मोठ्या माणसांनीं केली असेल. हा तड्जोड न करतां झगडला हें श्रेय मला ध्येयसिद्धीपेक्षां फार मोठें वाटतें. "

"तुमची ही उमेद ठीक आहे. पण प्रकाश, स्पष्टच बोलतों आतां. तुमचे पाय भुंईला लागावे यासाठीं माझा जीव कां तुटतो हें तुम्हांला सांगायला पाहिजे असं नाहीं. आमची छायाताई हाच माझ्यामागें माझ्या कुटुंबाचा एकमेव आधार आहे. तिच्या सहचराचं जीवन जर स्थिर नसेल तर ती आणि तिच्याबरोबर माझं सारं कुटुंबच देशोधडीला लागेल. तुमच्या बहुमोल गुणांचं चीज व्हावं आणि माझ्याहि कुटुंबाचं सुरळीत चालावं म्हणून मी तुम्हांला ह्या उपदेशाच्या चार गोष्टी सांगतों आहें. सोडाल ना मग हें सारं?"

बोलतां बोलतां बाबांचा कंठ भरून आला. त्यांची खंगत चाललेली प्रकृति आणि आतांचा त्यांचा गहिंवर कोणालाही आर्द्र करील असाच होता. छाया आणि मामी यांचे डोळे पाण्यानें भरून आले. किशोरची स्थिति चमत्कारिक झाली होती. त्या मायलेकींच्या अश्रूंच्या भोवऱ्यांत सापडलेलें प्रकाशचें अंतःकरण त्यांतून बाहेर पडण्याची पराकाष्ठा करीत होतें.

" बाबासाहेब, आपल्या उपदेशांतली कळकळ मला पटते, पण अर्थ पटत नाहीं.

'करियर' म्हणून हें समाजसेवेचं जूं मीं मानेवर घेतलं आहे असं आपण समजतां, आणि तें केव्हांहि टाकून देतां येईल असा आपणांला भरंवसा वाटतो. माफ करा, ही आपली समजूत चुकीची आहे. अशा माझ्या वागण्यानं खाजगी जीवनांतले आनंद मला मिळणं शक्य नाहीं, हें कोणापेक्षांहि मलाच अधिक पटलं आहे. या बाबतींत छायाला मीं कसल्याहि प्रकारच्या अज्ञानांत ठेवलेलं नाहीं. इतकंच काय माझ्यावरील प्रेमापासून परावृत्त करायचा सुद्धां मीं प्रयत्न केला आहे. मग माझ्यावर असं संकट कां घालतां ? समाजसेवेंत प्रतिष्ठा मिळवावी आणि खाजगी जीवनाचे अमृतघटहि आकंठ पितां यावे अशी ज्यांची वृत्ति आहे, त्यांना आपला हा उपदेश ठीक आहे. मला काय त्याचा उपयोग ?"

ही मुलाखत अशीच अनिर्णित अवस्थेंत संपली.

मामींना संभाषणाचें रहस्य कळलें नाहीं. पण आपल्या सुकन्येनें मनानें वरलेला पति मोठा पिळाचा आहे एवढा मात्र त्यांचा ठाम ग्रह झाला. बाबा प्रकाशवर सर्वस्वीं नाराज झाले असें नाहीं. पण प्रवाहाच्या आघातानें हळूहळू विरघळून जाणारा हा मातीचा ढिगारा नसून, प्रवाहाला वळण देणारा गिरिराज आहे याची त्यांना खात्री पटली. पण रोगानें जर्जर झालेल्या कुडींत वात्सल्यानें अधिकच अधू झालेलें त्यांचें अंतःकरण प्रकाशचा बाणा पाहून थरारलें होतें.

रात्रीं जेवणखाण आटोपल्यावर बराच वेळ गप्पागोष्टी होऊन सारींजणें झोंपलीं. पण छाया मात्र तळमळत होती. मधूनच एकादी पावसाची सर येई किंवा एकादी फास्ट गाडी धाडधाड करीत कर्कश शीळ देऊन निघून जाई. छायाला तेवढ्यानें दचकल्यासारखें होई. आजच्या तिच्या मनःस्थितींतली गुंतागुंत कोणालाहि सोडवितां आली नसती. बाबांनीं अगदीं मृत्युशय्येवरून कळकळीनें केलेल्या उपदेशानेंही प्रकाश यत्किंचित् द्रवला नाहीं, याचा नाहीं म्हटलें तरी तिला रागच आला होता. काय हा निष्ठुरपणा ! पण पुनः वाटे याच त्याच्या गुणविशेषामुळें नाहीं का आपण त्याच्यावर लुब्ध झालों ? म्हणून जरा त्याच निष्ठुरपणाचा आदर वाटावा तोंच दुसरा दुःखकारक विचार मनांत येई. आपल्यावर खरें प्रेमच नसेल म्हणून तर ही त्यागवृत्ति स्वीकारणें प्रकाशला सोयीचें वाटलें नसेल ना ? आपल्याबद्दल प्रेमाचा उत्पन्न झालेला अंकुर कृष्णचंद्रांनीं विकृत कहाण्यांचीं पुटें देऊन गुदमरून मारून

टाकला असेल. ह्या कुकल्पनेनें त्या अंधारांत तिला रडूं येण्याची पाळी आली. वडील मृत्यूच्या मार्गावर आणि प्रेमानें काढता पाय घेतेलेला......अरे देवा! सर्व दिवे लावावे आणि खूप मोठमोठ्यानें बोलूं लागावें असें तिला वाटे!

पण रमणीहृदय कितीहि नाजुक असलें तरी आशेच्या बंधनानें त्याला पुष्कळदां स्थैर्य येतें. आपला हृदयनाथ या अंधारांतच आपल्यापासून कांहीं अंतरावर आहे या गोष्टीचें तिला काय वाटत होतें हें सांगणें कठीण आहे. स्प्रिंग्स्च्या कॉटवर निजलेला प्रकाश जरा इकडचा इकडे झाला कीं कर्‌कर्‌ असा आवाज होई. तो आवाज आणि त्याच्या कपड्यांची व पांघरुणाची सळसळ ऐकून छायाला पुलकित झाल्यासारखें वाटत होतें. मधलें पार्टिशन्‌ म्हणजे कमलपत्राप्रमाणें असून या अंधाऱ्या रात्रीं आपण एखाद्या चक्रवाकीप्रमाणें विरहांत तिष्ठत आहोंत अशी मधुर कल्पना तिच्या मनांत येऊन गेली. पण चक्रवाकीप्रमाणें उच्चरवानें आपल्या प्रियतमास बाहतां कसें येणार? आणि आपल्या आर्त हाकेला अनुकूल प्रत्युत्तर मिळेल ही तरी खात्री आहे का?

* * * *

दुसरे दिवशीं सकाळीं प्रकाश आणि किशोर यांनीं छायाचा निरोप घेतला. खटल्याला एक दोन दिवस अवकाश होता. तोंवर दोघांनीं आपल्याकडेच राहावें असा सर्वांचा त्यांना आग्रह होता, पण प्रकाशला मुंबईत कांहीं मजूर पुढाऱ्यांशीं खाजगी वाटाघाटी करावयाच्या होत्या आणि किशोरला पुण्याला जाऊन येणें अवश्य होतें. 'पुण्याच्या बाहेर दोन दिवससुद्धां तुम्हांला करमत नाहीं ना?' अशी छायानें किशोरची चेष्टा केली. आणि किशोरला ती तितकीशी अप्रियहि वाटली नाहीं हें खरें, परंतु किशोरच्या अंतर्यामीं वेगळी खळबळ होती. चित्रलेखाच्या कष्टी मनःस्थितींत तिच्याजवळ कोणी नाहीं हें त्याच्या मनाला जाचत होतें. पुरुषप्रेमाच्या अवर्षणानें भाजलेल्या तिच्या मनोभूमिकेला बंधुप्रेमाचें जीवन शक्य तेवढें देण्याची किशोर नेहमींच दक्षता बाळगी. म्हणूनच दोनच दिवसांकरितां तो पुण्याकडे परतणार होता.

सकाळची पूना मेल किशोरनें गांठली. गाडीनें कल्याण सोडलें नसेल, तों दूरच्या डब्यांतून भोवतालच्या रांगांकडे पहात पहात येणारा सदानंद किशोरला

दिसला. एक पुस्तक त्याच्याजवळ होतेंच. किशोरला दुरूनच पाहून तो उसनें हसें आणून त्याच्या जवळ आला.

" गुड मॉर्निंग्, ॲडव्होकेट. काय प्रकाशना बेल मिळाला का ?"

" अफकोर्स्. तुम्ही कोणीकडे आलां होतां मुंबईला ?"

" एका कॉलेज युनियन् पुढें " Rise and fall of Capitalism " ( भांडवलशाहीचा उदयास्त ) या विषयावर व्याख्यान होतं माझं. शिवाय मागं तुम्हांला सांगितलं तें फिल्म प्रकरण—त्याचं नक्की करायचं होतं. "

" अस्सं. "

नंतर किशोरनें चहा मागविला. तो घेऊन झाल्यावर सदानंद त्याचा निरोप घेऊन आपल्या जागेकडे वळला. सदानंदाच्या पुस्तकांतून एक व्हिजिटिंग कार्ड पडलें. किशोरनें तें पाहिलें. सदानंदाला तें द्यावें असा प्रथम त्याचा बेत होता, पण नंतर त्याला काय वाटलें कोणास ठाऊक, त्यानें तें खिशांत ठेऊन दिलें. सदानंद दिसेनासा झाल्यावर त्यानें तें काढून पाहिलें. त्यावर पुढील नांव व पत्ता होता—

**ईश्वरप्रसाद जे. भट**
डायरेक्टर 'स्वस्तिक सिनेटोन'
इंद्रमॅन्शन, मुंबई ४.

## २२. खटला

भाई प्रकाश यांच्यावरील खटला हा आज कल्याण शहरांत ज्याच्या त्याच्या तोंडीं झालेला विषय होता. विशेषतः खटल्याला कारण झालेलं भाषण प्रकाशनं याच ठिकाणीं केलं आणि त्याची परिणति (अर्थात् बहुधा अनिष्टच) येथेंच होणार म्हणून शहरांतील प्रक्षोभावर कांहींशीं स्थानिक अभिमानाचीहि छटा चढली होती. 'प्रकाश स्वतःच डिफेन्स देणार,' 'प्रकाश अखेरपर्यंत एक शब्दहि बोलणार नाहीं,' 'बंगालांतील कोणा क्रांतिकारकाशीं प्रकाशचा संबंध आहे म्हणून सरकारनं भाषणाचें निमित्त काढून हा खटला रचला, नाहींतर चळवळ चालू नसतां प्रकाशला पकडण्याचें काय कारण होतें?' अशा अनेक लोकवार्ता गांवांत पसरल्या होत्या. सकाळीं उठतांच जेवण आटोपून ९-१५, ९-३० अशा गाड्या पकडण्यासाठीं धावपळ करणारे कष्टाळू सुशिक्षित, भरतीच्या पाण्यांत मचवे हाकारून रेती वाहून नेणारे नाखवे, शहराला अन्नाचा पुरवठा करण्यासाठीं दुरून माल घेऊन येणारे उद्योगी व्यापारी, रेल्वेंतील मजूर, टांगेवाले, पानवाले असे अनेक लोक प्रकाशच्या खटल्याची चर्चा करीत होते.

बारा वाजण्याचे सुमारास डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटचे कोर्टासमोर गर्दी हटविण्याकरितां पोलिस खडे होते. इतक्यांत दोन टांगे येऊन दाखल झाले.

पहिल्या टांग्यांतून प्रकाश, शशांक, आणि छाया उतरलीं.

दुसऱ्या टांग्यांतून किशोर, चित्रलेखा, एक अपरिचित गृहस्थ, आणि कृष्णचंद्र उतरले.

जेवणाच्या सुटींत कित्येक मजूर आले होते.

प्रकाशनें स्मितमुखानें सर्वांना अभिवादन केलें.

त्या साऱ्या जनसमूहांत प्रकाश कोणता याविषयीं आतां शंका उरली नाहीं. सर्वांचे आतुर नेत्र एकाच ठिकाणीं केंद्रित झाले.

'कसा उमदा पुरुष आहे,...आणि अजून कांहीं मोठा नाहीं, अगदीं कोंवळा दिसतो,...एवढा प्रसंग येऊन ठेपला पण भीति आहे का पहा तोंडावर!...' त्या जनताजनार्दनाच्या सहस्र मुखांतून एक एक याप्रमाणें कितीतरी स्तोत्रें बाहेर पडत होतीं.

कोर्टांत शिरतांच प्रकाशनें आपली जागा घेतली. त्याला बसण्याकरितां खुर्ची देण्यांत आली होती.

प्रकाशची मित्रमंडळी वकील लोकांत बसली. शशांकच्या चेहऱ्यावर कातरता दिसत होती, कृष्णचंद्र आणि किशोर विचारमग्न होते, आणि छाया व चित्रलेखा यांच्या कष्टाला पारावार नाहीं, हें त्यांच्या चेहऱ्यावरून कोणालाहि समजून आलें असतें.

दोघीहि दुःखीकष्टी, दोघींचीहि आराध्यदेवता एकच, दोघींचींहि मनें सारखींच प्रेमळ आणि सुसंस्कृत. पण दोघींच्या दुःखांचे प्रकार किती वेगळे होते! आज बाबांच्या दुखण्याला विशेष उतार पडला होता असें नाहीं, पण जीव घट्ट करून छाया कल्याणला आली होती. बाबा दोन दिवसांचे सोबती ही जाणीव अंतःकरणांत टोचत होतीच, पण प्रकाशहि चार दिवसांनीं कारागृहाच्या भिंतीआड जाणार, त्याचा सहवास शक्य तितका अधिक घडावा ही तीव्र इच्छा. कल्याणला काय होणार ह्याच्या अंदाजानें छातींत धडधडत होतें, तर दादरला काय झालें असेल याची अमंगळ कल्पना येऊन ऊर भरून येत होतें.

चित्रलेखा तर दैवाच्या योजनेंत अपेशी ठरलेली स्त्री. बंधुप्रेमाच्या जीवनामुळें ती जिवंत होती, पण तिचा विकास करणारा प्रकाश सदैव दूरच असे. पण निदान

तो डोळ्यांसमोर आहे, कधीं कधीं येतो, बोलतो, बसतो एवढेंहि तिला समाधान वाटे, एवढाच सहवास जरी लाभला तरी मूक आराधना करीत स्वस्थ राहावें अशी संवय अलीकडे ती मनाला लावून घेत असे. तोंच हें संकट आलें. पुनः भावनाविकार गर्दी करूं लागले. पण चार लोकांत सर्वसामान्य स्त्रीइतकेंहि दुःख दाखवायचा तिला अधिकार नव्हता. अंतरींचें दुःखच नव्हे तर तें आंतल्या आंत जिरवण्याकरितां चाललेला प्रयत्नहि तोंडावर दिसूं नये याची मेहनत तिला पडत होती.

साडेबाराला मॅजिस्ट्रेट साहेब आले.

खटल्यास यथाविधि सुरुवात झाली.

प्रथम फौजदारीची साक्ष झाली. आक्षेपार्ह भाषणाचा प्रसंग, सभा, वारंट, आणि आरोपीला पुण्याहून पकडून आणणें या गोष्टींची माहिती फौजदार साहेबांनीं दिली.

नंतर भाषांतरकारानें प्रकाशच्या भाषणांतील आक्षेपार्ह भाषणाचे उतारे आणि त्याचें भाषांतर वाचून दाखविलें.

किशोर खटला काळजीपूर्वक ऐकून मधूनमधून टिपणें करून घेत होता.

सरकारतर्फेचा साक्षीपुरावा संपला

" मिस्टर प्रकाश, आतांपर्यंत झालेल्या दोनतीन साक्षी तुम्ही ऐकल्याच. आतां या आरोपाबद्दल तुमचें म्हणणें काय आहे तें सांगा. "

प्रकाश उत्तर देण्यास उभा राहिला. पिंजऱ्यांत उभें राहिल्यावर त्यानें एकदा सभोंवार दृष्टि फिरविली आणि आपलें स्टेटमेंट वाचण्यास सुरुवात केली—

" माझ्यावर ठेवलेला आरोप मला मुळींच कबूल नसून मी सर्वस्वी निर्दोषी आहें अशी माझी खात्री आहे. कल्याणच्या सभेंत मीं केलेलें भाषण राजद्रोहात्मक होतें असें मला वाटत नाहीं. देशांतील शेतकरी आणि मजूर यांच्या वाढत्या हलाखीची माहिती करून देत असतां आमच्या पक्षानें आखलेला कार्यक्रम मीं सभेपुढें मांडला. सध्यांची समाजरचना विषमतेवर उभारलेली आहे आणि ही विषमता दूर

झाल्याखेरीज भुकेनें अर्धमेली होत चाललेली रयत सुखी होणार नाहीं. आणि तसें होण्यास विषमतेचे पाठीराखे—"

"स्टॉप इट्, मिस्टर प्रकाश, I shall not let you repeat that speech here. ( मी येथें तुम्हांला त्या भाषणाची पुनरावृत्ति करण्याची संधि देणार नाहीं. )" मॅजिस्ट्रेटनीं प्रकाशला थांबवून त्याचें स्टेटमेंट पुराव्यांत दाखल करून घेतलें.

प्रकाशवर आरोप ठेवण्यांत आला.

* * * *

दुसरे दिवशीं पुनः बरोबर साडेबारालाच खटल्याला सुरुवात झाली. आज कदाचित् प्रकाशच्या खटल्याचा निकाल होईल म्हणून कीं काय पोलिसाचा जादा बंदोबस्त ठेवण्यांत आला होता.

आज सर्वांबरोबर छाया आली नव्हती.

बाबांचें दुखणें एकाएकींच विकोपाला गेलें त्यामुळें तिला घरीं राहणें भाग पडलें. शशांकहि आला नव्हता. छायाला धीर देण्यासाठीं तो मागें राहिला. कदाचित् आजच शिक्षा झाली तर आपल्या समोरून प्रकाशला नेतील याहि गूढ भीतीनें त्याचे पाय कल्याणकडे वळले नसावेत !

सरकारी वकिलांनीं प्रथम भाषण केलें. "मिस्टर प्रकाश हे वयानें आणि शिक्षणानें चांगले जाणते आहेत. पाऊस असतांना देखील कल्याणसारख्या उद्योगी शहरांतलीं हजार दीड हजार माणसें सभेला जमलीं, यावरून प्रकाशची लोकप्रियता दिसून येते. गेलीं ५-६ वर्षें राजकारणांत सक्रिय पुढाकार घेणाऱ्या आणि युवक पुढारी म्हणून गाजलेल्या गृहस्थाला आपली जबाबदारी कळत नव्हती असें म्हणणें वेडेपणाचें होईल." सरकारी वकिलांनीं रंगविलेली ही प्रकाशच्या गौरवाची झगझगीत पार्श्वभूमि कशाकरितां होती हें सांगण्याचें कारण नाहीं. नंतर ते बोलूं लागले—"आरोपी ज्या पक्षाचा स्वतःला म्हणवितो तो पक्ष समाजाची आणि प्रस्थापित शासनसंस्थेची इमारत उखडून टाकण्याकरितां निर्माण झालेला आहे. सनदशीर मार्गानें चळवळ करणें हें या पक्षाला पसंत नाहीं. प्रकाशनीं आपल्या भाषणांत सुप्रसिद्ध मोठ्या पुढाऱ्यांवर अप्रत्यक्ष शिंतोडे उडविले आहेत.

अर्थात् त्या सीध्या मार्गानें जाऊन भागणार नाहीं हाच त्यांत ध्वनि निघत नाहीं काय ?" अशा प्रकारचें भाषण करून सरकारी वकिलांनीं आरोपीला कडक शिक्षा देणें न्याय आणि सुव्यवस्था या दृष्टीनें कसें अवश्य आहे हें सिद्ध केलें. सरकारी वकिलांचें भाषण म्हणजे लहानसा एक सांस्कृतिक ज्ञानकोशच होता. प्रकाशच्या भाषणांतील कडक शब्द आणि त्याचे धात्त्वर्थ, मानसशास्त्र, गांधीवाद आणि साम्यवाद, कम्युनिझम्‌ची ठाम व्याख्या, शेतकरी मजुरांचे प्रश्न...आणि काय नव्हतें ? सर्वच होतें !

यानंतर किशोर बोलावयास उभा राहिला. त्याच्या विद्यालयीन लौकिकाची माहिती कल्याणकर वकील मंडळींना असल्यानें त्यांच्यांत त्याच्याबद्दल अगोदरच अनुकूल ग्रह निर्माण झाला होता. त्यांतून त्याचा उंची आणि पद्धतशीर पोषाख, चेहरा, वागण्यांतला रुबाब यांची एकंदर प्रेक्षकांवर तात्काळ छाप पडली होती. मॅजिस्ट्रेटशीं एक दोन मुद्यावरच त्यानें कांहीं प्रश्नोत्तरें केलीं होतीं. पण जाणकार मंडळींनीं, त्या प्रश्नोत्तरांतली ठसकेदार भाषा व अचूकपणा यांवरून किशोरच्या बुद्धिचापल्याबद्दलचा पूर्ण अंदाज केला होता.

"आरोपीच्या योग्यतेबद्दल आतां माझ्या मित्रांनीं सरकारतर्फे जें सांगितलें त्याला प्रथमच मी दुजारा देतों, कारण सुधारलेल्या राष्ट्रांत ह्या योग्यतेला कोणी गुन्हा म्हणणार नाहीं." कुशल खेळाडूनें क्षेत्रांत येतांच प्रथमच चेंडू सीमापार करावा म्हणजे प्रेक्षक उत्फुल्ल होऊन त्याच्या खेळण्याकडे अवधान देऊं लागतात तसें झालें. सर्व मंडळी किशोरच्या वरील वाक्यानें विमोहित होऊन भाषणाकडे कान लावून बसली. "पण त्या योग्यतेवरूनच आरोपीवर केलेला आरोप निराधार आहे असें सांगतां येईल. आरोपी मतानें समाजवादी आहे म्हणून त्याचा दृष्टिकोण त्या दृष्टीनें शास्त्रीय आहे. सरकारी वकील कम्युनिझम्‌च्या वर्णनांत हे विसरले. आणि म्हणून असा मनुष्य भावनेच्या भरांत वहात जाऊन उगाच लोकांना चिथावणी देईल हें संभवत नाहीं. प्रकाश यांच्या चळवळीचें अंतिम साध्य कोणतें याची चर्चा आज गैरलागू आहे. कल्याण येथें त्यांनीं केलेलें भाषण राजद्रोहात्मक होतें काय ? हा मुख्य प्रश्न आहे. सरकारच्या कृत्यावर अनुकूल प्रतिकूल टीका करणें हा प्रत्येकाचा हक्क आहे, इतकेंच काय पण शासनसंस्थेचें स्वरूप कसें असावें याची

तात्त्विक चर्चा करणें हेंहि सनदशीरच आहे असें मत नुकतेंच कलकत्त्याच्या न्याय-मूर्तींनीं प्रदर्शित केलें आहे."

"ॲ. किशोर, प्रकाशचें हें भाषण एकाद्या डिबेटिंग युनियन् पुढें झालें होतें असें आपणांस म्हणावयाचें आहे काय?" मॅजिस्ट्रेटनीं मध्येंच प्रश्न केला.

"नाहीं, सन्मान्य महाशय, पण कलकत्त्याच्या न्यायमूर्तींनीं ज्या समाजवाद्यांना दोषमुक्त केलं त्यांनींहि भाषणेंच केलीं होतीं. त्यांचें आवाहन एकंदर जनतेलाच होतें. असो. माझे मित्र सरकारी वकील यांनीं पुष्कळच गोष्टींची अपुरी माहिती आपणांला आतां सांगितली..."

"सन्मान्य महाशय?" मॅजिस्ट्रेटना उद्देशून सरकारी वकील रागानें म्हणाले, "विद्वान् ॲडव्होकेट सरकारी वकिलांच्या ज्ञानावर शिंतोडे उडवूं पहात आहेत.–"

मॅजिस्ट्रेटनीं हरकत मान्य केली आणि किशोरला इषारा दिला. त्यानें आपलें भाषण पुढें चालू केलें. "अशा गोष्टींचा उल्लेख मी यापुढें टाळीन. तरीहि त्यांनीं उपस्थित केलेल्या मुद्यांना थोडक्यांत उत्तरें देतां येतील." असें म्हणून सरकारी वकिलांचा एकेक मुद्दा घेऊन किशोर छेडूं लागला. मधून मधून किशोरचे सरकारी वकिलांशीं खटके उडत. 'मीं असें म्हटलें नाहीं,' 'माझ्या मुद्याचा हे विपर्यास करीत आहेत.' अशा तक्रारी सरकारी वकील करीत. मॅजिस्ट्रेटसाहेब दोघांनाहि संभाळून घेत होते. अखेर भाषांतरकाराच्या साक्षीच्या चिंधड्या उडवून किशोरनें आपलें भाषण संपवीत आणलें. "महाराज, आतांपर्यंत केलेल्या चर्चेवरून भाषांतरकारांनीं साध्या वाक्यांना कसें विकृत रूप दिलें आहे हें दिसून येईल. ज्या वाक्यांत सरकारच्या औदासीन्यावर टीका आहे तीं वाक्यें भाषांतरांत भलतीच उतरलीं आहेत. प्रकाशच्या पक्षाचीं अंतिम मतें ध्यानांत घेऊन कल्याणचें त्यांचें भाषण विचारांत घेतलें गेलें आहे. आणि म्हणूनच ह्या खटल्याची उभारणी झाली आहे. न्याय आणि सुव्यवस्था यांची महती सरकारी वकिलांनीं गाइली, पण प्रकाशसारखा जनतेचा हितकर्ता नाहक तुरुंगांत जाणें हा न्याय ठरेल काय? महाराज, आपल्या दयाबुद्धीचें वजन आरोपीच्या पारड्यांत टाकून न्यायाचें माप द्या असें मी मुळींच विनवीत नाहीं. आरोपीची बाजू भक्कम आहे. म्हणूनच दयेची नव्हे तर न्यायाची उच्च प्रतिष्ठा राखण्याकरितां या युवकास बंधमुक्त करा एवढेंच सांगणें आहे."

किशोरचा आवाज शेवटीं शेवटीं चांगलाच चढला होता. त्याच्या भाषणांत विनंतीपेक्षां न्याय्यतेचा आणि युक्तिवादापेक्षां आग्रहाचा प्रभाव जास्त दिसूं लागला होता. भाषण संपवून तो खालीं बसला तेव्हां कोर्टांत जमलेली सर्व मंडळी तर कौतुकादरानें त्याच्याकडे पाहूं लागलीच; पण खुद्द मॅजिस्ट्रेटसाहेबहि समाधानपूर्वक उद्गारले, "You have pleaded your case just as an eminent counsel would have pleaded." [उत्कृष्ट वकील आपला पक्ष मांडतो तसाच तुम्हीं आपला खटला मांडला] प्रकाश आणि कृष्णचंद्र हे तर किशोरची स्तुति कोणत्या शब्दांत करावी या गोंधळांत पडले. चित्रलेखेचा संतोष दुहेरी होता. प्रेमळ बंधूचें बुद्धिवैभव लोकांच्या दृष्टीस पडलें हा आनंद आणि याचा परिणाम म्हणजे प्रकाशची मुक्तता होईल ही आशा. तिच्या दुहेरी संतोषाला दोन्ही डोळ्यांनीं वाट दिली.

मॅजिस्ट्रेटनीं निकाल देण्याचें दुसरे दिवसापर्यंत तहकूब केलें.

## .२३. दोन आघात

किशोरनें प्रकाशचा खटला किती कौशल्यानें लढविला याची हकीकत चित्रलेखा-शशांक वगैरे मंडळींनीं छायाला सांगितली. पुनः दुसरे दिवशीं सकाळीं प्रसिद्ध झालेल्या वृत्तपत्रांतून किशोरच्या वक्तृत्वाचीं रसभरित वर्णनें वाचून छायाला थोडा उल्हास वाटला. पण समुद्राच्या मध्यावर सापडलेला माणूस एका फळकुटाच्याहि आधारावर जीव जगविण्याचा जसा प्रयत्न करतो तसाच वकिलीकौशल्याचा उपयोग व्हावयाचा !

प्रकाशच्या खटल्याचा निकाल काय होणार याची आशंका वाटत होती आणि इकडे बाबांवर तर मृत्यूनें आपले अदृश्य पाश टाकले आहेत हें स्पष्ट दिसत होतें !

आज खटल्याचा निकाल होणार म्हणून छायाखेरीज सर्व मंडळी कल्याणला गेली. कदाचित् निकाल एकदोन दिवस लांबेलहि असें किशोरनें जातांना छायाला सांगितलें होतें. तेवढीच आशा ! जें कांहीं व्हायचें तें व्हायचेंच ! पण दोन दिवस उशिरानें.

मुलें अकरा वाजतां शाळेला गेलीं. बाबा आज अगदींच बेचैन झाले होते.

"छाया, शुद्धीवर आहे तोंपर्यंत मला सगळं सांगूं दे. विमा, बँक यांची व्यवस्था काय केली आहे तें पुनः एकदा नीट समजवून घे. मागून घोटाळा होतो. आणि दुःखांतल्या उदासीनपणांत अधिकाधिकच अडचणी नकळत उपस्थित होतात."

"बाबा—बाबा, असं काय बोलतां ?" असें म्हणून छाया रडूं लागली.

"छायाताई, वेडी आहेस तूं. इतकी शिकली सवरलेली समंजस मुलगी तूं. असल्या कठीण प्रसंगीं व्यवहाराची आठवण कशी बरं विसरतां येईल ? एकादी

अडाणी मुलगी असती तर तिला हा वेडेपणा शोभला असता—खरोखर स्त्रिया इथून तिथून सारख्याच !"

"बाबा, पण ही निरवानिरवीची तुमची भाषा माझ्यानं नाहीं हो सहन होत ! आजच्यासारखं मागं नव्हतं का तुमचं दुखणं वाढलं ? त्यांतून नाहीं का तुम्ही बरे झालांत !"

"तसं झालं तर चांगलंच. पण आज मला मुळींच आशा दिसत नाहीं. छायाताई, पुढल्या व्यवस्थेबद्दल माझं म्हणणं ऐकून घे बाळ."

"नका, नका, तुम्ही स्वस्थ पडून रहा बरं."

"हें पहा, तूं माझ्यावर प्रेम करतेस ना ? मग माझ्यामागें तूं, ही, विंदा, प्रेमा सर्वजणं कष्टी झालां, दुःखांत पडलां तर मला बरं वाटेल का ? माझ्या आत्म्याला क्लेश नाहीं का होणार ? मग माझ्या प्रेमाकरितां तरी तूं माझी निरवानिरव ऐकायला नको का ?"

बाबांच्या कळकळीच्या आग्रहापुढें नाइलाज झाला. ती नोटपेपर आणि कागद घेऊन बसली. बाबा खोल जात चाललेल्या आवाजांत तिला कांहीं लिहावयास सांगत होते. आपल्या सर्व येण्यादेण्याची माहिती त्यांनीं तिला तपशीलवार सांगितली. लिहिणें झाल्यानंतर छायाचा हात आपल्या कृश हातांत त्यांनीं घेतला आणि तो कपाळावर दाबीत म्हटलें, "छाया, तुम्हा मुलांनीं पुढें काय करावं याविषयीं आतां नवीन असं मी कांहींच सांगत नाहीं. गेलीं तीन चार वर्षें आपण या विषयावर बोलत आलोंच आहोंत. तुम्हां सर्वांबद्दल मीं कोणत्या महत्त्वाकांक्षा बाळगिल्या आहेत हें तुम्ही जाणतांच. तुला त्या ठाऊक आहेत. त्या पुऱ्या करण्याचं तुझ्या हातांत आहे. माझ्या मागं तुम्हांला येथली रहाणी परवडणार नाहीं. तुम्ही पुण्याला जा. आबा आणि शशांक यांचा आधार तुम्हांस मोठा आहे. तीं देवमाणसं तुम्हांला अंतर देणार नाहींत–"

बोलतां बोलतां बाबांना दम लागूं लागला आणि त्यांचा कंठहि रुद्ध झाला.

"बाबा, आतां नका बोलूं. डोळे मिटून पडा स्वस्थ."

"छाया, एकच गोष्ट, थोडक्यांत सांगतों. तुझी निवड अप्रतीम आहे. पण आपलें जीवन वाऱ्यावर सोडायला तूं मोकळी नाहींस. माझा आबा अजून कच्चाच

राहिला आहे. वाळल्या वेलींचीं दोन फुलं जतन करून त्यांना फलरूप देणं तुझ्या-कडे आहे. हें ध्यानांत ठेव मग काय तें कर. ”

“ बाबा बाबा....” छायाला जोराचा हुंदका आला.

बाबांना ग्लानि आली, ते डोळे मिटून स्वस्थ पडले.

छायाचें रडणें आणि शब्द ऐकून मामी घाबऱ्या घाबऱ्या आंतून आल्या. “ काय झालं ग ताई ? ” ‘ कांहीं नाहीं. बाबांना आतां श्रमानं झोप लागेलसं वाटतं. ’ छायानें चटकन् डोळे पुसून आईला उत्तर दिलें.

इतक्यांत बाबांनीं अर्धवट ग्लानींतच विचारिलें, “छाया, किशोर नाहीं का आले ? ” “नाहीं बाबा” बाबांनीं पुन्हां डोळे मिटून घेतले.

एक, दोन...तीन,...चार !

प्रत्येक तासाच्या ठोक्याप्रमाणें छायाच्या अंतःकरणांतली धडधडहि वाढत चालली होती. जसजसा वेळ जात चालला तसतशी आशेची भरती ओसरूं लागली आणि तळाशीं असलेल्या कुकल्पनांचें भयंकर स्वरूप अधिकाधिक स्पष्ट दिसूं लागलें. प्रकाशच्या शिक्षेबद्दलचे विचार, बाबांचा उपदेश, त्यांची क्षणोक्षणीं क्षीण होत चाललेली जीवनशक्ति, भावंडाचें भवितव्य आणि आपलें प्रेम,...किती तरी गोष्टींची गर्दी उसळूं लागली. आपल्या खोलींत ती अस्वथ होऊन येरझारा घालूं लागली.

इतक्यांत घंटा वाजली.

छायेनें दार उघडलें तों किशोर आणि कृष्णचंद्र ! छायाचे पंचप्राण जणूं श्रवणें-द्रियांत येऊन बसले. शब्दाआधीं तिच्या आतुर आणि घाबरलेल्या दृष्टीनेंच किशोरला प्रश्न केला होता—“ काय झालं ? काय झालं ? काय निकाल झाला ? ”

“ आजहि पुनः निकाल तहकूब केला. ” किशोरनें खालच्या आवाजांत सांगितलें. पण त्याचा आणि कृष्णचंद्रांचा चेहरा अगदीं उतरलेला दिसत होता. त्यामुळें अंतर्मनांत किंचित् सभय होऊनच छायानें प्रश्न केला, “ शशांक आणि लेखाताई कुठें आहेत ? ”

“ तीं दोघेंजणं प्रकाशबरोबर गेलीं आहेत गिरगांवांत, मी आणि कृष्णजी आलों इकडे. ”

काय असेल तें असो! छायाचें मन कांहीं ठिकाणावर राहिलें नाहीं.

याच वेळीं बाबांना पुनः जाग आल्यामुळें सर्वजण तिकडे गेले. बाबांनीं किशोरला पाहातांच हर्षानें म्हटलें, "किशोर, आलां तुम्ही! मी वाटच पहात होतों तुमची. म्हटलं तुमची माझी अखेरची भेट होते कीं नाहीं कोणास ठाऊक?"

"बाबासाहेब, काय कांहींतरीच बोलणं! तुम्ही चांगले बरे व्हा. पुण्यास चला. तिथं तुम्हांला खात्रीनं बरं वाटेल."

"आतां कसचं पुणं!" बाबांनीं उदासवाणेपणें हसून म्हटलें, "किशोर, माझे प्राण मंद पावलांनीं निजधामाची वाट चालूं लागले आहेत. एक एक बटन दाबतांच एक एक दिवा विझत जावा, त्याप्रमाणें शरिरांतली एक एक शक्ति नष्ट होत आहे. माझा अवतार संपला. अखेर पश्चात्तापानं जिवाचे हाल व्हावे असं दुष्ट कृत्य मीं कांहींच केलेलं नाहीं. पण एकाच गोष्टींत जीव घुटमळतो."

"कोणती गोष्ट ती मोकळ्या मनानं सांगा."

"माझीं मुलं आणि त्यांची आई! साऱ्या भावना या मायाजाळांत अडकून पडल्या आहेत. तें जाळं या मृत्युलोकाला इतकं घट्ट बांधलेलं आहे कीं साऱ्या भावना एकवटल्या तरी तें घेऊन त्यांना भरारी मारतां येणं शक्य नाहीं. छाया समंजस आहे. शिकलेली आहे. पोरीची जात. नाहीं म्हटलं तरी परस्वाधीन. त्यांतून प्रकाश हे असे!... अरे देवा! माझ्या पोरांचं कसं होणार! छाया, तुझं कसं होईल?" बाबांच्यानें पुढं बोलवेना. छाया आणि मामी यांनीं डोळ्यांना पदर लावला. तेवढ्यांत किशोरनें शक्य तेवढा निग्रह करून म्हटलें,—

"बाबासाहेब, वाईट वाटून घेऊं नका. छायाताईंच्या भवितव्यांत मला बरेंच कार्य करावं लागणार आहे असं दिसतं. माझ्याहि जीवनांत त्या पुष्कळ साह्यकारी होतील अशी खात्री आहे. आमच्या या ऋणानुबंधानं आम्ही आतां बद्ध आहोंत. लेखाताईच्या पाठचीं भावंडं असं समजून यांच्या मार्गांतले कांटे साफ करण्याचा मी यत्न करीन. आपण श्यामकांत अद्याप जिवंतच आहे असं समजा. यापेक्षां काय सांगूं?"

"देव तुमचें कल्याण करो." असें समाधानपूर्वक म्हणून बाबांनीं डोळे मिटले.

"बाबासाहेब आतां झोपतील असं वाटतं. कृष्णजी, तुमचा गीतापाठ करतां का सुरू?"

कृष्णजींनीं हातपाय धुवून गीतापाठास आरंभ केला.

रडून रडून तप्त झालेल्या कपाळावर पाण्याचा शिडकावा देण्याकरितां छाया न्हाणीघरांत गेली. त्या न्हाणीघराच्या समोरच रेडियोचें यंत्र होतें. त्यांतून स्पष्ट व सुवाच्य बोल ऐकूं येत असत.

छायानें पाण्यानें कपाळ गार केलं.

रेडियो सुरू झाला.

नळ बंद करून छाया ऐकूं लागली.

पहिल्या पंधरा मिनिटें बातम्यांचा कार्यक्रम होता.

" बॉंबे कॉलिंग्...आसामांत महापुरानें गांवें वाहून गेलीं...क्वेट्टा येथें पुनः एकदां भूकंपाचा धक्का बसला... ... ...पुण्याचे सुप्रसिद्ध तरुण पुढारी..."

–छाया धडधडत्या छातीनें ऐकूं लागली.

"–भाई प्रकाश यांना कल्याणच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनीं राजद्रोहाचे आरोपावरून एक वर्ष सक्त मजुरीची शिक्षा दिली."

" हाय रे दैवा...किशोरनीं खोटंच सांगितलं एकूण."

तिचे हात पाय लटलट कापूं लागले. ती लगबगीनें बाबांच्या खोलीकडे येऊं लागली!

* * * *

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥

कृष्णचंद्र पुढें वाचणार तोंच संताप आणि दुःख यांनीं थरथरत छाया तेथें आली.

" किशोर, किशोर, तुम्हीं खोटं सांगितलंत मला. प्रकाशना शिक्षा झाली. एक वर्ष सक्तमजुरीची शिक्षा झाली. तुम्ही मला कळूं दिलं नाहींत. आतां रेडियोवरून कळलं. तुम्हा माणसांपेक्षां तीं यंत्रं बरीं. खरं तरी सांगतात. माझी त्यांची गांठ कशी पडेल हो? मला त्यांना भेटायचं होतं, त्यांचे संशय दूर करायचे होते. तुम्हीं मला खोटं सांगितलंत, किशोर."

छायाच्या नाजुक मनःस्थितींत शिक्षेची बातमी एकदम भयंकर आघात करील म्हणून निकाल तहकूब झाल्याचें किशोरनें सांगितलें होतें. आणि त्या सांगण्याला खरेपणाची झांक चढावी म्हणून शशांक व चित्रलेखा यांना त्यानें मुद्दामच मागें ठेविलें होतें. पण यंत्रानें घोटाळा केला. किशोर कुंठित झाला. तो आर्जवानें म्हणाला, " छायाताई, माफ करा, तुम्हीं एका घनघोर काळजींत आज आहां. एकदम एवढी अनिष्ट बातमी कळायला नको म्हणून मीं असं केलं. माझा त्यांत दुष्टावा होता का? आपण अपील करूं. हायकोर्टांत प्रकाश दोषमुक्त होईल याची खात्री आहे मला—"

" किशोर, किशोर–" छायाच्यानें पुढें बोलवेना.

पण मध्येंच डॉक्टर आल्यानें छायानें आवरतें घेतलें.

निजलेल्या रुग्ण बाबांच्या चेहऱ्याकडे पाहतांच डॉक्टरची मुद्रा गंभीर झाली. त्यांनीं नाडी पाहिली आणि घाईनें स्टेथस्कोप लावून हृदयाचें स्पंदन तपासलें.

बाबांचा आत्मा क्षणभंगुर मानवकुडी सोडून गेला होता.

ही बातमी किशोरला इंग्लिशमध्यें अगदीं हलक्या आवाजांत डॉक्टरनीं सांगितली.

पण छायानें तें ऐकलें आणि मामींनाहि त्या इंग्रजीचा अमंगल भावार्थ समजला. त्यांनीं हंबरडा फोडला !

छाया बेभान होऊन ' बाबा, बाबा ' असें म्हणत बाबांच्या कलेवरावर पडली !

मुलें भांबावून रडूं लागलीं. त्यांना जवळ घेणाऱ्या किशोरच्या डोळ्यांत अश्रूंचे दाट धुकें पसरलें. तो मामींची समजूत घालूं लागला.

छाया निचेष्ट पडली होती. दोन पक्षांनीं तोंडांत धरलेल्या काठीच्या आधारें, अंतराळांत उंचावर गेलेलें कांसव तोंड उघडतांच तेथून कोसळलें, तशी छायाची अवस्था झाली. प्रणय आणि पितृप्रेम या दोघांनाहि पारखें झालेलें तिचें कोमल अंतःकरण निराशेच्या खडकावर आदळून छिन्नविछिन्न झालें होतें.

## .२४. गंगाराम

आतां त्या गोष्टीला महिना झाला. दिवसांना काय? त्यांची गति अखंडित असावयाची. भरलेल्या कोठारांतून एक एक कण नेणाऱ्या पांखरांप्रमाणें काळ सर्वांच्याच आयुष्यांतला एक एक क्षण घेऊन जात होता. मामी आणि छाया यांच्या डोळ्यांतल्या पाण्याला खळ नव्हता. हिमालयांत उगम पावणाऱ्या नद्यांना पावसाळ्यांत पावसामुळें आणि उन्हाळ्यांत बर्फ वितळल्यामुळें दोनदां पूर येतात. त्याप्रमाणें दररोज त्या मायलेकींच्या डोळ्यांतल्या गंगायमुना दोन कारणांनीं भरून वाहूं लागत. आपण अनाथ झालों ही जाणीव आणि लहान मुलांचीं केविलवाणीं तोंडें बघून अंतःकरणाला आलेला द्रव. पण पुन्हां त्याच मुलांकडे पाहून त्यांना आपले ओले डोळे कोरडे करावे लागत, तोंडावर उसनें हसूं आणावें लागे, आणि निरनिराळे करमणुकीचे प्रकार काढून त्यांना गुंतवून ठेवावें लागे.

एकच दुःख! पण त्या मायलेकींच्या अंतःकरणावर त्याचे परिणाम किती वेगवेगळे झाले होते. मामींचें दुःख अगदीं आत्मनाशाचेंच होतें. गेलीं २५ वर्षें त्यांना एक दिवसहि बाबांच्यापासून दूर रहाणें ठाऊक नव्हतें. आपल्या जीवनाचें कलम करून जणूं त्यांनीं बाबांच्या जीवनांत आत्मविसर्जन केलें होतें. गेल्या २५ वर्षांत घरांत ज्या घडामोडी झाल्या त्यांत मामींचें व्यक्तित्व किती प्रकट झालें हें पहाणें, म्हणजे समुद्राला मिळालेल्या महानदीच्या पाण्याचा शोध समुद्रांत करण्यासारखें होतें. मामींना स्वतंत्र अस्तित्वच नव्हतें. म्हणून बाबा वारल्यानंतर आपणहि निष्प्राण झालों आहोंत अशी त्यांची भावना होती. मुलांकरितां केवळ पडछायेसारखें भूमीवर वावरावयाचें एवढीच त्यांची वृत्ति झाली.

—पण छायाच्या दुःखाची तऱ्हा बरीच वेगळी होती. नैसर्गिक बुद्धि आणि उच्च शिक्षण यामुळें तिला स्वतंत्र व्यक्तित्त्व उत्पन्न झालें होतें. कितीदां तरी बाबांचे आणि तिचे वाद होत. अशा वेळीं बहुधा छाया जहाल विधानांचीं अस्त्रें सोडून पित्याला जर्जर करावयाची. सुरक्षितता हें बाबांचें ध्येय तर छायाचा सर्व आनंद वादळी वातावरणावर अवलंबून असे. बाबांना नेमस्तपणाची आवड तर छायाला आत्यंतिक मतें प्रिय. वादामध्यें बाबा आणि छाया यांचें मतैक्य क्वचितच व्हावयाचें. पण वात्सल्य आणि कौतुक यांनीं संमिश्र अशा दृष्टीनें छायाकडे पहात. बाबा गेल्यामुळें आपण प्रौढ झालों ही कटु जाणीव छायाला उत्पन्न झाली. मामींचें वात्सल्य डोळस नव्हतें. आईची लेकीविषयींची माया ती! आणि त्या आईलाहि आतां लेकीच्या संरक्षणाची गरज उत्पन्न झालेली. बरें, छायाच्या गुणसंपदेचा गौरव जगाकडून होत नव्हता आणि झाला नसता असेंहि नाहीं. पण वात्सल्य आणि कौतुकबुद्धि यांचें एकच निधान ( बाबा ) मात्र नाहींसें झालें होतें. म्हणून छायाला वाटे कीं, आतां आपण प्रौढ झालों. आपल्या अहंकाराचें पोषण करीत वात्सल्यानें आपल्या अंगावरून हात फिरविणारा पिता आज जगांत नाहीं, आणि म्हणूनच तिच्या शहाणपणाबद्दल किंवा शिक्षणाबद्दल कोणी बोलूं लागलें कीं, तिच्या डोळ्यांला पाणी येई.

त्या मायलेकींच्या सान्त्वनासाठीं आबासाहेब आणि रमाबाई दोन दिवस येऊन गेल्या. किशोर, शशांक, चित्रलेखा हीं तिघेंजण कांहीं दिवस राहून परत पुण्यास गेलीं. प्रकाशच्या अपिलाची तारीख जाहीर होतांच अगोदर ४-५ दिवस किशोर आणि शशांक आपापल्या बहिणींना घेऊन मुंबईस आले. अपिलाचा निकाल होतांच छाया, मामी, आणि मुलें यांना घेऊन परत पुण्यास जावयाचें असें ठरलें. कृष्णचंद्र एकाएकीं कराचीकडे निघून गेले.

चित्रलेखा आणि सुलभा यांच्या संगतींत छायाला दुःखाचा बराच विसर पडे. चित्रलेखा स्वतः दुःखी होती. त्यामुळें एका समदुःखी भगिनीचें सान्त्वन करणें तिच्यासारख्या जाणत्या मुलीला कठीण नव्हतें. छायाला नव्हे तर मामींनाहि चित्रलेखानें कितीतरी विरंगुळा दिला. आंतल्या उष्णतेच्या रसाचा खळबळाट होऊन डोंगर उत्पन्न होतो, त्याप्रमाणें कित्येकदा चांगल्या मनाला दुःखाच्या आंचेमुळें उंची

येते. असाच मनाचा थोरपणा चित्रलेखाला आला होता. हा थोरपणा स्वतःच्या सान्त्वनाला पूर्ण निरुपयोगी असला तरी त्यानें दुसऱ्याचें सान्त्वन खास करतां येतें.

—आणि सुलभा. तिची खेळकर वागणूक हाच छायाचा आल्हाद होता. मुंबईला येतांच प्रथम ती छायाच्या गळ्यांत गळा घालून रडली. इतकी कीं तिलाच उगी करण्याचा प्रसंग छायावर आला! पण तो वळवाचा पाऊस जातांच सुलभाचे खेळकर कार्यक्रम पूर्ववत् सुरू झाले. मुंबईची नवलाई तिच्या मनाला भुलवूं लागली. प्रेमा–विंदाशीं मोकळ्या मनानें ती खेळूं लागली. छायाला तिच्या गमतीदार वागणुकीनें फार आनंद होई. दुःखाचे ढग चोहींकडून भरून आले असतां हें इंद्रधनुष्यच पडलें आहे असें तिला वाटे. आणि मग सुलभा थोडी गंभीर झाली तर बरी, हा कधीं मधीं डोकावणारा अस्पष्ट विचारहि छायाच्या मनांतून निघून जाई. सुलभाला, गंभीर करणें म्हणजे इंद्रधनुष्यांतील सात रंगांचा एक रंग बनविणें नाहीं काय? असें तिला वाटे.

* * * *

प्रकाशचें अपील हायकोर्टांत निघायला एकदोन दिवस उरले होते. ढगांची पांगापांग होऊन आकाश स्वच्छ झालें असल्यानें संध्याकाळ फारच सुंदर पडली होती. आज किशोर, शशांक आणि सुलभा चौपाटीवर जायला निघाले. प्रेमा आणि अरविंद यांना त्यांनीं बरोबर घेतलें. पण छायाला आपल्या बरोबर चल असें म्हणण्याचा धीर कोणालाच होईना. सुलभानें मात्र तिच्या गळ्यांत हात घालून तिला 'चल ना, छायाताई आमच्याबरोबर!' असें लडिवाळपणें म्हटलें. आणि छाया मुकाट्यानें तयारहि झाली. तिला बाहेर जाणें प्रशस्त वाटत होतें असें नव्हे, तर सुलभाच्या आनंदी चेहऱ्यावर नाराजी न उमटावी एवढ्याकरितांच ती यायला तयार झाली. चित्रलेखा मात्र मामींना सोबत म्हणून घरींच राहिली.

चौपाटीवर येतांच वाळूंत एका मचव्याच्या आडोशाला सर्वजणें बसलीं. सुलभानें मुलांना वाळूचा किल्ला करण्यास तर बोलाविलेंच, पण मुलें वाळूचा ढीग तयार करीत आहेत तोंवर तिनें एकदां ओहटीच्या पाण्यांत जाऊन पायांखालून सरकलेल्या वाळूची गंमत पाहिली; आणि येतां येतां खेळणीं विकणाऱ्या दोघां फेरीवाल्यांना निरनिराळ्या खेळण्यांचे भावहि विचारले. छायाला या बालिश प्रकारांचें हसूं येत होतें.

इतक्यांत किशोरला सिगारेटची तलफ आली म्हणून तो शशांकला घेऊन जवळ इटालियन रेस्टारंटकडे वळला.

" कायरे शशांक, छायाताईंना एक काळजी सारखी लागलेली दिसते. तूं कधीं विचार केला आहेस का ?"

" नाहीं बुवा. कसली काळजी ? प्रकाशच्या सुटकेसंबंधींची ना ?

" नाहीं रे. दुसरीच मी म्हणतों. आपले कृष्णजी आहेत ना ? त्यांची आणि छायाताईंची पूर्वीची ओळख आहे. ठाऊक आहे ना तुला ?"

" हो तर. पण छायाच्या काळजीशीं त्याचा काय संबंध ?"

" सांगतों काय तो. कृष्णजी आणि छायाताई यांच्यांत गुरुशिष्याचं नातं होतं. पण लाहोरला लोक कांहीं चांगलं बोलत नसावेत त्यांच्याविषयीं. मग कृष्णजींची वागणूकच तशी कीं काय हें कळायला मार्ग नाहीं. पण एवढं मात्र खरं कृष्णजींनीं त्याविषयीं कांहीं प्रकाशला सांगितलं असावं असं छायाताईंना वाटतं. "

" कशावरून म्हणतोस तूं हें ? "

" रेडियोवर त्यांनीं प्रकाशच्या शिक्षेची बातमी ऐकल्यानंतर, मला रागानं त्या जें बोलल्या त्यावरून मला संशय आला. 'प्रकाशचा संशय दूर करायचा होता' असं त्या म्हणाल्या. इतरहि कांहीं प्रसंगांवरून मला तर वाटतं. या बाबतींत आपण कांहींतरी केलं पाहिजे. अशी मला रुखरुख वाटूं लागली म्हणून मी एक योजनाहि केली. माणूस दुःखांत असतां निदान संशयानं त्याला पछाडूं नये. एका मोठ्या रोगानें आजारी झालेल्या माणसाला, त्या रोगावर औषध देतां येत नसलं तरी इतर विकृति होऊं नये म्हणून जपतात. दुःखी माणसाचं दुःख हलकं करतां येण्यासारखं नसलं, तरी कुकल्पनांनीं त्याला ग्रासूं नये एवढी तरी काळजी घ्यावी. "

" काय योजना केली आहेस तूं किशोर ?"

" कळेल लौकरच तुला. "

'स्टेट एक्स्प्रेस्'चं एक पाकीट घेऊन किशोर शशांकसह आपल्या जागेकडे परतला.

मुलांना किल्ला करून देऊन सुलभा इकडे तिकडे हिंडत होती. किशोर आणि शशांक छायाशीं गोष्टी बोलत बसले. इतक्यांत सुलभा धावत धावत त्या ठिकाणीं

आली. समोर उसळणाऱ्या सोनेरी व तांबूस लाटा आणि पलीकडे नीलाकाश अशा पार्श्वभूमीवर सुलभाचें सुंदर चित्र उमटलेलें पाहून किशोर क्षणभर विलक्षण मोहित झाला.

" दादा दादा, तो आपला गंगाराम, शेवंतीचा नवरा तो इथं आहे पलीकडे."

" कोण गंगाराम ? " शशांकनें आश्चर्यानें विचारलें.

" होय रे. दोनदोन आण्यांच्या जिनसा घेऊन विकत बसला आहे. मीं ओळखलं त्याला. त्यानंहि माझ्याकडे पाहिलं, पण लगेच मान खालीं घातली. "

" चल किशोर, आपण त्याला भेटूं. "

" बरं छायाताई, येतोंच आम्ही. "

असें म्हणून किशोर आणि शशांक सुलभाला घेऊन गंगारामकडे गेले.

गंगाराम कांहीं खेळणीं घेऊन बसला होता. त्याची मुद्रा कावरीबावरी झालेली दिसत होती. तो शरिरानें बराच खंगलेला दिसला. डोळे खोल गेलेले, हातापायाच्या शिरा फुगलेल्या, आणि छाती आंत गेलेली !

शशांकनें विचारलें, " काय गंगाराम, केव्हां सुटलास आणि इथं कसा तूं ? "

" दादा रामराम, वकीलसाहेब रामराम. १५ दिवस झाले सुटून. मगाशीं ताईला पाहिलं आपल्या. पण म्हटलं या गंगारामला कोण ओळखणार आतां जगांत ? "

" असं कां रे म्हणतोस ?" सुलभा चटकन् म्हणाली, " मीं ओळखलं की तुला. "

" लई कृपा झाली या कंगालावर. दादा ओळखीचं कोणी भेटायला नको म्हणून पुणं सोडलं न् इथं आलों. घरधनिणीनं पैसे दिले म्हणून हा मांड मांडला आहे. "

" काय मिळतं तुला यावर ? "

" मिळतात कधीं चार आणे, कधीं आठ आणे. पण तें कांहीं खरं नाहीं. आमच्या घरधनिणीजवळ पैसे हायती, तीच चालविते घर. "

" इथं कुठं राहतां तुम्ही ? "

" परळला भुईवाड्याच्या बाजूला एक वाडी आहे. घांटी लोकांची वस्ती आहे तिथं. घर कसं छान ठेवलंय्. का हो दादा, हिनं पैसा कुठून हो मिळविला ? तुम्ही न् आबासाहेबांनीं मदत केल्याचं सांगते. तुमचे उपकार जन्मांत नाहीं फिटणार. पण इतका पैसा कुठून आला हो ? "

शशांकची मुद्रा गंभीर झाली. शेवंतीनें आपण सिनेमांत गेल्याचें किंवा चित्रा-करितां बैठक दिल्याचें गंगारामाजवळ सांगितलें नसलें पाहिजे. अर्थात् आपणहि त्या सत्यकथेला बगल देऊनच बतावणी केली पाहिजे हें जाणून शशांकनें उत्तर दिलें, " अरे, ती दहाबारा घरचं काम करायची. कितीदां सांगितलं आम्ही तिला इतकं काम नको करूं. पण ती ऐकेल तर शपथ ! "

इतक्यांत किशोरनें सहज गंगारामाला विचारलें, " काय रे गंगाराम, इथं एकादी नोकरी करशील का ? माझा एक गुजराथी सॉलिसिटर आहे, त्याला विश्वासू माणूस पाहिजे आहे एक. "

" हो, हो, हें काय विचारतां साहेब. "

किशोरनें लगेच खिशांतून नोटबुक काढलें आणि त्यांतलें पान काढून त्यावर चिठ्ठी लिहिली. नंतर घडी करून तीवर पत्ता लिहिल्यावर किशोरनें गंगारामला तो पत्ता नीट समजावून दिला. चिठ्ठीवरील पत्ता वाचून शशांक म्हणाला, " कोण जे. एन्. जव्हेरी ? अरे, हा चित्रांचा बडा शोकी आहे. आर्ट स्कूलच्या प्रदर्शनांतून हा दरवर्षी एकादं तरी चित्र घेतोच विकत. "

गंगारामनें दुकान आटोपलें. तो सर्वांच्या पायावर डोकें ठेवूं लागला. पण किशोर, शशांक, किंवा सुलभा कुणीच त्याला तसं करूं देईनात. चिठ्ठी पागोट्यांत खोचून आणि आपलं लहानसें दुकान डोक्यावर घेऊन गंगाराम निघून गेला.

दाही दिशांच्या दारांवर काळे पडदे सुटले. शशांक आणि किशोर सर्वांना घेऊन दादरकडे परतले.

## .२५. भयानक दृश्य

शेवंतीचे मुंबईतील दिवस नवीनपणामुळें आणि कामाकाजाच्या धांदलीमुळें जरी झरझरा जात होते, तरी तिला तेथें तसें करमण्यासारखें कांहींच नव्हतें. गंगारामच्या तुरुंगवासाच्या काळांत तिनें धाडसानें चित्रपटसृष्टींत पदार्पण केलें, एक-दोनच चित्रपटांत काम करून नांव मिळविलें, कर्ज फेडलें, आणि जवळ थोडीशी मायाहि केली. परंतु रसज्ञता किंवा आवड यांचा गंधहि या सर्वांच्या मुळाशीं नव्हता. कर्तव्याच्या कठोरपणानें अगदीं नाइलाज म्हणून ती कला तिला पत्करावी लागली होती इतकेंच. तिच्यासारख्या रूपसुंदरीभोंवतीं त्या कलात्मक सृष्टींत किती मोहजालें पडलीं असतील हें सांगणें नकोच. पण जणूं एका विशिष्ट कार्याकरितांच अवतार घेणाऱ्या आणि तें कार्य होतांच अवतारसमाप्ति करणाऱ्या देवतेप्रमाणें, ती ठरलेल्या हेतूकरितांच त्या सृष्टींत प्रकट झाली, आणि तो हेतु साध्य होतांच तेथून परतली.

पण आपण सिनेमांत गेलों आहोंत हें गंगारामाला कळणारहि नाहीं याची तिनें फारच खबरदारी घेतली होती. तीन महिन्यांनीं येरवड्याला ती भेटायला जाई, तेव्हां आपलीं झुळझुळीत वस्त्रें पेटींत ठेवून साधें लुगडें, लांब बाह्यांची चोळी, आणि रुप्याचे दागिने ती परिधान करी. अर्थात् त्या तिच्या साध्या वेषांतहि तिच्या रूपसंपदेवर चढत चाललेला कलेचा तजेला कोणा चाणाक्ष माणसाला दिसला असता. पण दूर जाळींतून, आपल्या कारभारणीशीं विव्हळत चार शब्द बोलणाऱ्या भोळसर गंगारामाच्या तें लक्षांतहि आलें नाहीं. गंगाराम सुटून येण्याचे सुमारास शेवंतीनें आपलें सर्व तऱ्हेदार कापड देऊन टाकलें, आणि पहिल्याप्रमाणें ती साधी भोळी झोपडींतली गृहलक्ष्मी बनली. गंगाराम तुरुंगांतून आला तो दोन दिवस

बाहेरहि पडला नाहीं. दोनच दिवसांत मुंबईंत यायचें ठरलें. पुण्यांत गंगाराम वावरूं लागला तर चित्रपटसृष्टींतल्या आपल्या जीवनाचा सुगावा त्याला खात्रीनें लागेल, म्हणून शेवंतीनेंहि मुंबईला यायचा बेत मान्य केला. आणि जवळच्या पैशांतून गंगारामला फिरतें दुकान काढून देऊन तिनें मुंबईस संसार थाटला.

संध्याकाळचें कामधाम आटोपून शेवंती दारांत जरा उभी राहिली. [संध्याकाळचा एक असा गुण आहे, कीं भावनाशील माणूस एकटें असलें तर त्यावेळीं त्याचें मन एक उल्हासाच्या लाटांवर तरी चढेल, किंवा औदासीन्याच्या अंधारांत तरी भटकूं लागेल. म्हणजे तें ठिकाणावर कधीं राह्यचें नाहीं.] शेवंतीच्या मनावर उदासीन-पणाचीं पटलें चढूं पहात होतीं. यांतच मागील आठवणींची भर पडली.

पहिल्या प्रथम सुरळीत संसार सुरू झाला, पण तिला दुखण्यानें गांठलें आणि गंगा-रामनें जिवापाड मेहनत करून तिचे प्राण वांचविले. रक्तक्षयासारख्या रोगांतून तिला पूर्वस्थितीवर आणण्याकरितां गंगारामनें चोरी करण्यासहि मागेंपुढें पाहिलें नाहीं. शेवंती बरी झाली, पण चोरी उघडकीस आल्यामुळें गंगारामला वर्षाचा तुरुंगवास घडला ! संसाराचा पाया डळमळीत झाला. गंगारामच्या गुन्ह्याचें बाह्य स्वरूप समाजाच्या दृष्टीनें इतकें निंद्य होतें कीं, त्याच्या पायांत भरलेल्या उदात्त हेतूकडे पाहण्याची कोणाला इच्छाहि होत नव्हती. अब्रूदार प्रेमळ गरिबावर गुन्हेगारीचा शिक्का मारून समाज मोकळा झाला.

गंगारामाच्या गैरहजेरींत संसाराचा उध्वस्त मळा हिरवागार ठेवण्याचा आपण किती कसोशीनें प्रयत्न केला, याची आठवण शेवंतीला अगदीं ताजीच होती. पण तो करीत असतां मोहाचे खड्डे आपण धैर्यानें टाळले, तरी नैसर्गिक रसिकतेची नकळत वाढ होत गेली हें नीटसें तिच्या ध्यानांत आलें नव्हतें. गंगारामविषयीं कर्तव्य-बुद्धि, कळवळा, कृतज्ञता सर्व कांहीं तिला वाटे. पण नैतिक बुद्धीचें दार किंचित् जरी उघडलें गेलें, तरी त्या फटींतून शशांकचें दर्शन होऊन, तिच्या हृदयाचा चंद्रकांत पाझरूं लागे. शशांकचें हसणें, बोलणें, धांदल, लाजाळूपणा, चित्रणकौशल्य सारें सारें जणूं आपल्याभोवतींच आहे असा तिला नेहमीं भास होई. पण भासच तो ! आतां पुनः या अज्ञातवासांत शशांकचा सहवास कुठला मिळायला ? शेवंतीच्या डोळ्यांला टचकन् पाणी आलें.

—आणि आज अंधार पडतांच लौकर दुकान आटोपून आलेला गंगाराम येऊन पोचला.

"आज लौकर घरीं ?"

"शेवंती, ही दगदग कायमची सुटेल असं देवानं आज केलं !"

"म्हणजे काय झालं ?"

"आज आपले दादा, सुलभाताई, वकीलसाहेब भेटले चौपाटीवर."

"कोण दादा इथं आहेत ?" आनंद आणि गोंधळ यांनीं भांबावल्यामुळें शेवंतीनें हा प्रश्न फार मोठ्यानें केला.

"हो! मग तुला नवल वाटलं ?"

"हो, बाकी प्रकाशच्या अपीलाकरितां आले असतील ते."

"वकीलसाहेबांनीं चिट्ठी दिली. ती घेऊन उद्यां सकाळींच जाईन त्यांच्या त्या व्यापाऱ्याकडे. तो नोकरी देणार आहे मला."

"होय का, मग देवच पावला!"

ती रात्र शेवंतीला अस्वस्थ अशीच गेली. या अज्ञातवासांत देखील अचानक प्रकट होऊन आपल्याला मदत करणारीं हीं माणसें म्हणजे कोणी यक्षगंधर्व तर नाहींत ना असें तिला वाटलें. शशांक गंगारामला भेटला, पण आपणांला कसा आणि कुठें भेटेल ? स्त्रीचें मन बोलकें नसतें. पण शेवंतीला वाटलें पुन्हां जर शशांक एकटा आणि सवडीनें भेटला, तर आडपडदा न ठेवतां त्याच्याबद्दल आपणांला काय वाटतें, तें उघड उघड सरळ शब्दांत सांगूं. अखेर नुसत्या भावनांवरच जगायचें, मग एकदा मोकळ्या मनानें त्या प्रकट केलेल्या काय वाईट !

* * *

गंगाराम सकाळीं उठला. तो फार आनंदांत होता. साहजिकच आहे, फिरत्या दुकानाची दररोज दगदग करण्यापेक्षां निवांत कायम पगाराची नोकरी केव्हांहि वाईट नाहीं. दुसरें समाधान त्याला मिळालें तें असें कीं, रस्त्यावर दुकान मांडून बसलें म्हणजे ओळखीचीं सतराशें माणसें भेटायचीं, आणि मग त्यांपैकीं हलक्या मनाच्या माणसांनीं आपल्या कंगाल अवस्थेचा उपहास करावयाचा, त्यापेक्षां शेटच्या बंगल्यांत एकदा काम करूं लागलों म्हणजे त्या अपरिचित जगांत आपल्या ओळखी-

देखीचीं माणसें चुकूनहि फिरकण्याचा संभव नाहीं. त्यानें स्नान वगैरे आटोपून थोडी न्याहारी केली आणि बरोबर दुपारचें जेवण घेऊन जव्हेरीशेटच्या बंगल्याचा शोध करण्यास निघाला.

त्याचें नशीब आज शिकंदर होतें. त्यानें प्रथम चौकशीला जेथें आरंभ म्हणून केला, तोच जव्हेरी शेटचा बंगला होता. तो लगेच आंत शिरला आणि जव्हेरी शेटला रामराम करून त्यानें किशोरची चिठ्ठी त्यांच्यापुढें टाकिली.

" हां, समजलों आम्ही. तुम्ही आमचे ॲडव्होकेट साहेबाचा माणस हाय्. मग तो तुमचा काम झाला. कवापासून येल कामावर. "

" शेटसाहेब, आतां मी कामावर राह्यच्याच तयारीनं आलोय्. "

" लई चांगला, अरे जीवनलाल, आ आपणा नवो चाकर छे. काय गंगाराम ना तुमचा नांव ? आने बध्धुं आपणुं घर बतावो. मारू चित्रघर साफ करवा कहो. एमने खाणाबिणा आपजो आं. "

जीवनलाल हा शेटजींचा पुतण्या आणि खाजगी कारभारी. त्याचें शरीर थुल-थुलीत होतें. चेहऱ्यावरून तो श्रद्धाळू पण समंजस दिसे. त्यानें गंगारामला बरोबर घेतलें आणि सर्व बंगला दाखवून एकंदर कामाकाजाची माहिती करून दिली. दुपारीं जेवण आटोपल्यानंतर शेटजींचें खास चित्रांचें दालन झटकण्यास त्यानें गंगारामाला सांगितलें.

अकरा वाजतां मुलांना शाळेंत पोचवून आल्यानंतर गंगाराम आपली शिदोरी सोडून जेवावयास बसला. पण शेटाणीनें त्याला इतके सुग्रास पदार्थ दिले कीं त्याची शिदोरी तशीच राहून गेली. आतां शेवंतीच्याच हातचे पदार्थ म्हणून मधून मधून तो तीमधील एक एक घास खाई, ही गोष्ट वेगळी.

जेवण झाल्यावर त्यानें एक डुलकी घेतली व मग तो शेटजींचें चित्रांचें दालन साफ करूं लागला. त्या दालनांतील चित्रांवर इतकी धूळ बसली होती. कीं बरेच दिवसांत कोणीं हात फिरविला नसावा असें दिसलें; ती झटकून काचेवरील डाग स्पिरीटनें पुसून काढले कीं आंतलें चित्र चमकूं लागे. गंगारामला त्या चित्रांतल्या अप्रतिम कलाचातुरीचें रहस्य कळत नव्हतें. पण चित्रांचा भव्य आकार आणि भारी किंमतीच्या चौकटी यांवरून तीं मूल्यवान् असावींत एवढें मात्र त्यानें जाणिलें.

अखेर राहिलेल्या एका चित्राची साफसफाई गंगाराम करूं लागला. पण थोडी धूळ झटकतांच तो जरा चमकला. तें चित्र एका गौरकाय, बांधेसूद स्त्रीचें असावें असें त्याला वाटलें, आणि बांधा तर अगदींच परिचयाचा आहे असा संशय आला. त्या दालनांत किंचित् अंधार होता म्हणून त्यानें तें चित्र बाहेर गॅलरींत आणिलें. त्यावरील धूळ पुसून आणि डाग काढून टाकल्यावर तो निरखून पाहूं लागला. त्या स्त्रीच्या तोंडावर चित्रकारानें केसाचा पडदा सोडला होता खरा, पण डोळे आणि नाक यांची आकर्षक ठेवण आणि सुरेख वर्ण हीं हुबेहूब शेवंतीची आठवण करून देत होतीं. गंगारामानें नीट काळजीपूर्वक चित्र तपासलें! मानेखालीं तीळ होता, आणि ऐटीनें टेकविलेल्या हातावर जें गोंदकाम केलें होतें तें तरी किती हुबेहूब ! आणि काय चमत्कार ! त्यांत 'गंगा' हीं अक्षरेंदेखील होतीं !

खास शेवंतीचेंच चित्र हें !

—आणि बाजूला शशांक असें स्पष्ट लिहिलेलें.

दादांनीं शेवंतीला समोर बसवून तिचें चित्र रेखाटलें. शंकाच नाहीं !

पायांखालील भूमि सरकली. डोकें भ्रमण करूं लागलें. उभें राहिलों तर तोल जाईल, बसलों तर खालीं पडूं, आणि निजलों तर उलटे होऊं असा भ्रम गंगारामला झाला. 'साऱ्या विपरीत जगांत जो एक आधार होता तोहि सुटला. दैवानें आपणांला बुद्धिजड केलें, कंगाल बनविलें, तुरुंगांत टाकिलें; जगानें आपणाला गुन्हेगार ठरविलें; पण आपण समजत होतों देव दयाळू आहे, त्यानें शेवंतीसारखी सती आपल्या पदरीं बांधली, आपलें ऐश्वर्य राजालाहि लाजविण्यासारखें झालें. पण हा आपला भ्रम होता. अभ्रूच्या पंखावर बसून प्रेमहि पसार झालें आहे. आपल्या हातांपायांत लोहश्रृंखला पडतांच शेवंतीनें प्रेमरज्जू तडातड तोडून शशांकच्या गळ्याला मिठी मारिली होती. म्हणूनच एवढी माया जमविली तिनें. नाहींतर नुसत्या घरकामावर का इतके पैसे जमतील ? आणि काल दादा मुंबईत आहे असें आपण म्हणतांच ती आनंदानें ओरडली तें उगीच नाहीं. तिच्या प्रियकराची होती ना बातमी ती !'

—'पण तिचा तरी काय दोष ? तिचें रूप नक्षत्रासारखें आणि गुणांना तर मोल नाहीं. आणि पडली आपल्यासारख्या रांगड्याच्या पदरीं. त्यांत आपण ठरलों

गुन्हेगार ! तिची भूक कशी शांत व्हावी ? तिनें आपणाला लायक असा सजण निवडला. पण शेवंती ! तुझ्याकरितां प्राण नव्हे तर त्याहून प्रिय असलेली अब्रूहि मीं धुळीला मिळविली. याचा कांहीं विचार केलास का कधीं तूं ?'

—विचारचक्रांची घरघर सुरू झाली ! भेसुर कल्पनांच्या ठिणग्या उडूं लागल्या ! हीनत्त्वाच्या भावनेला संशय चेतवीत होता आणि ती भावना संशयाला फुलवीत होती. गंगारामला वेड लागण्याची पाळी आली. सुडाचेहि विचार मधून मधून त्याच्या मनांत येऊं लागले.

"जीवनलाल शेट मी घरीं जाऊं ? मोठ्या शेटकडून परवानगी द्या मिळवून उद्यां येईन कामावर. आज पहिलाच दिवस आहे."

जीवनलालनें क्षणभर विचार केला, "हां, जा तूं, मीच देतों परवानगी. पण हें पहा, ही एक चिठ्ठी आहे मोठ्या शेटची, ती त्या ईश्वरप्रसाद भट म्हणून शेट आहेत त्यांना द्यायची, ती दे अन् मग जा घरीं."

गंगारामनें चिठ्ठी घेतली. जीवनलालकडून त्यानें पत्ता समजावून घेतला आणि भकास चेहऱ्यानें तो जाऊं लागला. एका बाजूला शशांक आणि शेवंती एकमेकांच्या गळ्यांत हात घालून उभीं आहेत आणि आपल्याकडे उपहासानें पाहून दांत विचकणारीं शेंकडों तोंडें भोंवतीं फिरत आहेत, असें भयानक दृश्य सारखें त्याला दिसत होतें !

## .२६. संशयनिरास

छाया रात्रीं घरीं आली तों तिच्या नांवावर एक पत्र घरीं येऊन पडलें होतें. कित्येक पत्रें केव्हां यायचीं हें ठरलेलें असतें, इतकेंच काय पण त्यांत काय असेल ह्याचाहि अंदाज बहुधा चुकत नाहीं. पण अशा पत्रांपैकीं हें पत्र नव्हतें. पत्रावरील अक्षर केव्हांतरी आपल्या ओळखीचें होतें एवढेंच छायाला आठवलें. पण तें कोणाचें आहे हें नक्की सांगतां येत नव्हतें. अर्थात् अशा अपरिचित अक्षराच्या पत्रांत काय असेल हें जाणण्याची छायाला तीव्र उत्कंठा लागली, पण तितकीच भीतिहि वाटली. एकादी स्फोटक द्रव्याची पेटी मनुष्य जितकी सावधगिरीनें उघडील तितकें तें पत्र छायानें काळजीपूर्वक उलगडलें. पण पत्राचा आरंभ वाचतांच तें कोणाचें असावें याबद्दल तिला शंका उरली नाहीं.

तें कृष्णचंद्रांचें पत्र होतें. एकदा सर्व पत्र अधीरपणें वाचून टाकल्यानंतर छायानें पुढील भाग पुनःपुन्हां आणि काळजीपूर्वक वाचले.

"......तुझ्या रम्य सहवासांत लाहोरला गेलेले दिवस आठवले म्हणजे वाटतें छाया, त्या इंग्रजी लेखकानें कल्पनेनें निर्माण केलेल्या 'कालयंत्रा' ( Time machine ) समोर उभें राहावें, आणि त्यांत बसून आपण परत त्या मागील काळांत जावें: सारे कविसंकेत आपण त्या काळांत प्रत्यक्ष अनुभवीत नव्हतों का ? फुलपांखरांप्रमाणें आनंदी असलेलें आपलें मन गरुडासारख्या भराऱ्याहि मारीत हिंडे. तुझ्या तेजानें मला उजाळा मिळे म्हणून मीं स्वतःला चंद्र म्हटलें, तर तुझ्या मुखचंद्राकरितां आतुर झालेला चकोरहि मीच होतों. तुला शिकवितांना, तूं खालीं वाकून वाचूं लागलीस म्हणजे

तुझा प्रचंड केशकलाप, त्यावरील सुगंधी गजरा, आणि तोंडाचा टवटवीत गोल भाग याकडे पहात मी मूढ होऊन जाई, आणि वाचतां वाचतां तूं एकादी शंका वर न पाहतांच विचारावी, मला उत्तरहि देण्याची शुद्ध असूं नये, आणि मग वर पाहून माझ्या आतुर दृष्टीला दृष्टि मिळतांच तूं सलज्ज व आनंदित व्हावें. तुझा हात हातांत घेऊन मी कित्येकदां शिकवीत असे. आणि एकादे वेळीं तसें केलें नाहीं तर आपण होऊन मुकाट्यानें तूं हात पुढें करावा. असो. अशा कितीतरी आठवणी आहेत. तूं दुःखांत आहेस. यावेळीं आणखी लिहिणें बरें नव्हे. हें देखील केवळ ऊर्मीसरशी लिहिलें. क्षमा कर. तुला लिहितांना तो काळ विसरणेंच शक्य नाहीं म्हणूनच एवढा उल्लेख केला गेला. ”

“ लाहोरहून तुम्ही निघालांत आणि मींहि पंजाब सोडलें. कारण माझ्या एकांतिक आणि अहंकारी स्वभावाची तेथें ओळखीच्या मंडळींत पदोपदीं कठीण स्थिति होऊं लागली. माझें येणें जाणें तुमच्याकडेच असे फक्त ! बाकी कोठेंहि तुला ठाऊकच आहे मी जायचा नाहीं. तुम्ही गेल्यानंतर माझ्या हितशत्रूंनीं माझी पाठच पुरविली. ‘आतां पंडित गेले, आतां दुसरें कोणतें घर पकडणार ?’ असें कोणी विचारीत. खरी स्थिति मला माहीत होती. तूं मला उपासकाच्या पदवीला चढवलेंस, पण मी मूढ होऊन स्वतःला तुझा प्रियकर समजूं लागतांच तूं कौशल्यानें मागें पाय घेतलास. माझ्या प्रेमाची ही निराशा तर मला जाणविलीच. पण माझ्या अहंकारालाहि कोणीं दंश केला असें मला वाटूं लागलें. एवढ्या साध्या मुलीचा भाव माझ्या बुद्धीला कसा आकलन करतां आला नाहीं, याची मला चीड वाटे. खरें पाहिलें तर विकारांनीं बुद्धि मलीन झाली म्हणजे ती बोथट होते हें साधें सत्य मला कळायला पाहिजे होतें ! पण तें फार उशीरां उमगलें. लोकांना काय हें माहित ! मीं पूर्ववत् माझें एकांतिक आयुष्य सुरू केलें, तेव्हां त्यांना वाटलें याची प्रियकरिणी दूर गेल्यामुळें उदास होऊन हा जनसहवास टाळीत असावा ! कोणी कोणी मिस्किलपणें तुझ्या आठवणी काढून मला संतुष्ट पण विव्हल करण्याचा प्रयत्न करीत. कोणी छद्मीपणानें प्रश्न करून तुमच्या प्रेमाचें प्रकरण कोठपर्यंत गेलें होतें असा गूढ प्रश्न करीत. अधिकाऱ्यांचीं मनेंहि कलुषित

करण्यापर्यंत कोणाची मजल गेली. अखेर मीं लाहोर सोडलें आणि कराचीला आलों. तेथें माझ्याबद्दल पूर्वग्रह असलेलें कोणी नव्हतें. म्हणून मला सुखेनैव जीवन काढतां येऊं लागलें. आणि तुझा हृदयनाथ प्रकाश याच्या सहवासाचा लाभ मला याच ठिकाणीं झाला.

"........छाया, प्रकाश हिरा आहे तो अशा अर्थानें कीं, त्याचें मोल अगणित आणि व्यवहाराच्या घणानें त्याचा चुराडा उडायचा नाहीं. पण हिऱ्यासारखी शीतलता त्याचे अंगीं नाहीं. त्याच्यांतून अग्नीसारख्या ज्वाळाहि निघत आहेत. छाया, प्रकाश आहे याहून रतिभरहि कमी लायक असता तर माझ्या मनांत मत्सराग्नीची ज्वाळा केवढी तरी उंच गेली असती. परंतु मत्सरानेंहि आपलें विध्वंसक शस्त्र मागें घ्यावें एवढा तो थोर आहे. त्याच्या खोलींत प्रथम तुला पाहिलें तेव्हां मला धक्काच बसला. भूतकाल विसरण्यासाठीं स्वदेश सोडून दूरदेशीं नाव हांकारावी, आणि वादळांत सांपडून पुनः आपल्या बंदराला लागावें तशी गत झाली. पण तुझी निवड योग्य आहे असें लगेच मला पटलें. तुझ्या पूर्वींच्या जीवनाबद्दल प्रकाशला सांगावें असें मत्सरानें आंतून कित्येकदां सांगितलें. असें सांगणें प्रकाशच्या हितासाठींच अवश्य आहे अशीहि मत्सर माझी समजूत घालीत होता. मनांतले वाईट भाव देखील कृति करण्यास प्रोत्साहन देण्यापूर्वी आपली न्याय्यता पटवीत असतात ! पण तुमच्या प्रेमांत अंतराय येईल म्हणून मीं मत्सराचीं सारीं आवाहनें फेटाळून लाविलीं.

" शिवाय, दुसरें एक छुपें कारण आतां सांगतों. छाया, मला ठाऊक आहे कीं, तूं तें ऐकतांच माझी आठवणसुद्धां विसरून जाण्याचा प्रयत्न करशील. पण तें संकट पत्करूनच तुला मी तें सांगणार आहें. कराची येथें लैला अडवाणी नांवाची एक सुंदर सिंधी मुलगी आहे. त्या जीवाला अजून कसलीच जाणीव नाहीं. धुक्यांतून उत्पन्न होणाऱ्या आणि धुक्यांतच विरून जाणाऱ्या परीसारखी आहे ती. तिनें मला वेड लाविलें आहे. तूं आणि प्रकाश यांच्या जीवनांतील वादळांत हेलकावे खाणाऱ्या या पतंगाचें सूत्र कोठें होतें हें आतां तुला कळेलच. छाया माफ कर. पण प्रेम ही अमर

आणि शाश्वत गोष्ट आहे असें मला वाटत नाहीं. पुरुषाला कोणतीहि स्त्री सारखीच प्रिय वाटते हें तत्त्व कदाचित् एकांतिक असेल, पण एवढें मात्र खरें कीं, अगदीं एकाच स्त्रीवर प्रेम बसेल आणि दुसरीवर बसणारच नाहीं असें नाहीं. मात्र एका वेळीं एकीबद्दल आपण उत्कृष्ट भाव बाळगतों कीं नाहीं हीच प्रेमाची कसोटी."

"....तुम्हा सर्वांना दुःखांत सोडून मी कराचीला एकाएकीं आलों याचें तुला आश्चर्य वाटेल. पण गैरसमज करून घेऊं नको. मी प्रकृतीनें नव्हे तर इच्छासामर्थ्यानेंहि दुबळा आहें. तुमच्या तेथें राहून मीच अधिक दुःखी झालों असतों. मी कसें आणि कोणाचें सांत्वन करूं शकणार ? आणि पुनः वाटतें प्रकाश सुटला-तो सुटेल याची खात्री आहे मला-तर अनेक वेळां परत-विल्यामुळें दबा धरून बसलेला माझा मत्सर पुनः उसळेल. आणि तुझ्या जीवनाचीं चक्रें जमिनींत शिरतील."

पत्र संपवितांना आणि मधूनहि कृष्णचंद्रांनीं सर्वांनीं आपल्याबद्दल जी आस्था व प्रेम दाखविलें त्याबद्दल गाढ कृतज्ञता व्यक्त केली होती.

पत्राचें नीट मनन केल्यानंतर छायाची अवस्था काय झाली हें तिचें तिलाच कळेना. मनांतली एक वेदना निश्चित थांबली होती. आपल्या गतजीवनाबद्दल कृष्ण-चंद्रांनीं प्रकाशला कांहीं खऱ्याखोट्या गोष्टी सांगितल्या कीं काय ही धागधूग तिच्या मनांत सारखी होती, ती आतां अजिबात नाहींशी झाली. प्रकाशच्या वागण्यांत आपणाला जो सडेतोडपणा आढळला तो त्याच्या एकंदर क्रांतिकारक स्वभावाचाच भाग आहे हें तिला उमगलें. आजवरचा संशय खोटा होता. अर्थात् तो संशय दूर होतांच त्यानें उभ्या केलेल्या आगामी संकटाच्या कल्पनाहि ढांसळल्या. छायाला हायसें वाटलें.

पण तिच्या मनाला अगदीं संपूर्ण समाधान झालें का ? मुळींच नाहीं. एकाद्या औषधानें मुख्य रोग बरा व्हावा आणि निराळीच व्यथा जडावी असें झालें. प्रकाशच्या मनांत संशय उरला नाहीं हें ठीक झालें. पण कृष्णचंद्रांनीं आपली प्रीति दुसरीकडे वळविली याचें मात्र तिला वैषम्य वाटूं लागलें. तसें पाहिलें तर तिला प्रथम जरी कृष्णचंद्राचा थोडा ओढा असला तरी गाढ प्रेम किंवा आकर्षण

असें केव्हांच नव्हतें. आणि आतां तर कांहींशा आदराखेरीज कोणतीच भावना कृष्णचंद्राबद्दल तिला वाटत नव्हती. पण आपल्यामुळें कृष्णचंद्र दुःखी आहेत या जाणिवेनें तिला एक तऱ्हेचें सार्थक वाटे व त्यांच्यासारख्या अहंकारी माणसाला आपले रूपगुण हे एकमेव आकर्षण व्हावें ही गोष्ट तिच्या अभिमानाला सदैव फुलवीत असे. पण एक प्रेममंदिर ढासळतांच कृष्णचंद्रांनीं त्याच सामानांतून दुसरी इमारत उभी करावी हें नवल! 'कोण ही लैला अडवाणी?' छाया विचार करूं लागली—'कृष्णजींनीं अहंकाराच्या भरांत हें असत्य तर लिहिलें नसेल? बघ, तूं मला तुझ्या हृदयमंदिराच्या गाभाऱ्यांत येऊं दिलें नाहींस; तर दुसऱ्या एका मूर्तीची प्रतिष्ठापना करून मी उपासनाव्रत सुरू केलें, असाच त्यांच्या या कल्पित कथेचा भावार्थ असावा. नाहींतर प्रेम हें स्वर्गीय, दिव्य, अमर आहे अशी श्रद्धा बाळगणारे कृष्णचंद्र एक प्रणयिनी दूर होतांच दुसरीच्या नादीं लागतील हें शक्य तरी आहे का?'

कृष्णचंद्र दुसऱ्या मुलीच्या नादीं लागले हें छायाला खरेंच वाटेना. आणि त्यांतून लैला अडवाणीचें जें वर्णन कृष्णचंद्रांनीं दिलें त्यावरून तर अशी मुलगी कृष्णचंद्रांना भुरळ घालूं शकेल कशी हेंच तिला कळेना? नुसती चित्रासारखी पोरकट मुलगी कृष्णचंद्रांना कशी आवडेल? सौंदर्य, बुद्धि, समंजसपणा, गुणग्राहकता सर्वच कांहीं मुलीच्या ठिकाणीं असेल तर कृष्णचंद्रांना ती पटायची. दुसरें लैला सारख्या 'परी' छाप मुलीला तरी कृष्णचंद्रांत मोहक वाटण्यासारखें काय आहे? खास ही बनावट कथाच असली पाहिजे.

'पण जर ती खरी असेल तर मात्र दुर्दैव आहे.' छायाला वाटलें, 'कृष्णचंद्रासारखा रोमँटिक माणूस असा बदलतो, मग प्रकाश तर काय प्रेमाला गौणस्थान देणारे! त्यांच्या शास्त्रांत प्रेमाचींसुद्धां प्रमाणें ठरलेलीं. आजचे निर्मळ प्रकाश उद्यां असेच राहतील का?'

पण छायानें ही विचारमालिका मध्येंच तोडून टाकिली. लैला अडवाणीची सत्यकथा असेल, तर ह्या साऱ्या विचारतरंगांना अर्थ! नाहींतर उगाच नसत्या कुशंकांनीं मन कशाला व्यग्र करायचें. कृष्णचंद्रांच्या पत्रावरून एक खुलासा झाला. हा काय कमी आनंद! अशा मुद्यांनीं ती आपल्या दुखवलेल्या मनाचें सान्त्वन करूं लागली.

दुसरे दिवशीं दुपारीं लौकर जेवण करून किशोर आणि शशांक यांनीं ट्रॅम गांठली. बॅरिस्टरशीं विचारविनिमय करून अपिलांतले बचावाचे मुद्दे निश्चित करावयाचे होते. खेरीज आर्थर रोड जेलमध्यें जाऊन प्रकाशची गांठहि घ्यावयाची होती. हायकोर्टनें अपिल दाखल करून घेतांना जामिनावर प्रकाशची मुक्तता करण्याचें नाकारलें होतें. अपिलापूर्वी वकील या नात्यानें किशोरला प्रकाशची मुलाखत घेणें शक्य होतें. आणि ती संधि साधण्याची चपळाई त्यानें केली.

सुलभाला दुपारीं गिरगांवांत जाण्याची लहर आली. तिची कोणी हुजूरपागेंतली जुनी मैत्रीण नुकतीच लग्न होऊन मुंबईला सासरीं राहायला आली होती. ती सुलभाला एकदोन दिवसांपूर्वीच भेटली आणि तिनें सुलभाला आपल्याकडे येण्याचा अति आग्रह केला होता. सुलभा तिचें सांसारिक सुख पाहण्यासाठीं अगदीं उतावीळ झाली होती. पण तिनें एकटें जाणें छायाला तितकेंसें पसंत पडेना. चित्रलेखाहि तिला म्हणाली, “ सुलभा, तुला एक दोन दिवस थांबायला काय हरकत आहे ? एकदोन दिवसांत शशांक नि किशोर अपिलाच्या कामांतून मोकळे होतील आणि मग तुला कोणीहि तुझ्या त्या मैत्रिणीकडे नेऊन सोडील. आजच काय घाई आहे !” पण कोणतीहि गोष्ट एकदां मनानें घेतली कीं ती पुरी केल्याशिवाय राह्यचें नाहीं असा सुलभाचा स्वभाव होता. शिवाय मुंबईला मधून मधून आपण कितीदां तरी येतों; मुंबईचे त्यांतूनहि गिरगांवचे रस्ते आपल्या चांगल्या ओळखीचे आहेत, अशा कितीतरी गोष्टी सुलभानें छाया—चित्रलेखांला सुनविल्या. अखेर नाइलाज होऊन त्यांनीं तिला जायची अनुमति दिली. मात्र चारच्या आंत परत येण्याविषयी बजावलें.

—आणि मग काय विचारतां ? सुलभानें जरीच्या किनारीचें तऱ्हेदार पातळ, मोठाले डूल, विचित्र मण्यांची माळ, नाजुक चढाव....सर्व नयनमनोहर, आधुनिक, मादक पोषाख केला. त्या पोषाखानें आणि उल्हसित वृत्तीमुळें ती इतकी सुंदर दिसूं लागली कीं छाया म्हणाली देखील, ‘ संभाळ हो, कुणी पळवून नेईल तुला. ’

सुलभा क्षणार्धांत झरझर जिना उतरून नजरेआड झाली.

मामींचा अंमळ डोळा लागला होता. मुलें शाळेला गेलीं होतीं. आतां चित्रलेखा आणि छाया दोघीच राहिल्या. दोघींनींहि आपल्या मनाचीं कपाटें उघडून आंत चाललेली खळबळ, आपल्या प्रणयभावना सर्व उघड केल्या. दोघींनाहि एकच

असा ध्रुव होता. चित्रलेखाला प्रकाशाविषयींच्या आकांक्षांना मर्यादा घातल्या पाहि-जेत याची कटु पण सत्य जाणीव झाली होती. छायाला चित्रलेखाचें भय वाटावें अशी परिस्थिति नव्हती. तथापि कधींकधीं चित्रलेखाला छायाबद्दल मत्सराचा एकादा झटका येणें आणि छायाला चित्रलेखाची व प्रकाशची मैत्री कोठपर्यंत गेली असेल याची पुटपुट लागणें साहजिकच होतें. आज मात्र सहज ओघाओघानें बोलत दोघींनीं आपल्या मनांतल्या खळबळींना इतका वाव दिला कीं दोघींचीं मनें कधीं निवळलीं हें त्यांचें त्यांनाच उमगलें नाहीं.

चार वाजून गेले. अजून सुलभा कां आली नाहीं याची दोघीजणींना काळजी पडली. जसजसा वेळ जाई, तसतसें त्यांच्या काळजीचें रूप अधिक तीव्र होत चाललें. किशोर आणि शशांक ५–५॥ ला आले तेव्हां तर त्या दोघीजणी गांगरूनच गेल्या. सुलभाला आपणच नाइलाजानें कां होईना, पण गिरगांवांत जाण्याची अनुमति दिली. आतां हे दोघेजण आपल्यावर ठपका ठेवतील, अशी दहशत त्यांना पडली. किशोर आणि शशांक यांनीं प्रथमच सुलभाची चौकशी केली. छायानें धीर धरून झाला प्रकार जेव्हां सांगितला तेव्हां दोघांचेहि चेहरे व्यग्र झाले. ‘ छायाताई, तिच्या लहरीला तूं उगाच मान दिलास ! ’ शशांक म्हणाला. ‘ लेखाताई, तिच्या सर्वच गोष्टी चालूं देणं चांगलं नाहीं.’ किशोर उद्गारला ! यावर त्या दोघीजणी काय बोलणार !

आतां कांहीं वेळानें अंधार पडणार ! किशोर आणि शशांक यांना आतां मात्र राहवेना.

सुलभाच्या शोधासाठीं दोघेहि बाहेर पडले.

## २७. सुलभाचा शोध

सुलभा ट्रॅममध्यें वरच्या मजल्यावर गेली. आणि स्त्रियांसाठीं राखून ठेवलेल्या जागेवर खिडकीशीं ती बसली. ट्रॅममधील मजूर, विद्यार्थी, व्यापारी सर्वचजण तिच्या मनोज्ञ रूपाचें, असाधारण वेषभूषेचें, आणि चमकदार हालचालीचें निरीक्षण करण्यांत दंग झाले. पुरुषांनाच नव्हे स्त्रियांनाहि तिच्या मूर्तीनें मोहिनी घातली असावी. कारण एका पारशी युवतीनें सुलभाच्या अंगकांतीवर दृष्टि रोखून मग सहज आपल्या हाताकडे नजर फिरविली, एक प्रभु मुलगी सुलभाकडे पहात पहात आपल्या पातळाचे कांठ व्यवस्थित करूं लागली. जणूं काय या आदर्श व्यक्तीची अंगकांति आणि वस्त्रें यांच्याशीं नकळत त्या आपल्या वर्णाची आणि वस्त्रांची तुलनाच करीत होत्या !

मुंबईहून दादरलाच आलेली ती ट्रॅम मुख्य रुळांच्या एका बाजूच्या फांट्यावर होती. तिचा नंबर येतांच ती मुख्य रुळांवर येऊन थांबली. इतक्यांत एक लठ्ठसें पुस्तक हातांत घेतलेला सदानंद वर चढला. वरच्या मजल्यावर येतांच साहजिकच सर्वांच्या कटाक्षांचें केंद्र झालेल्या सुलभावर त्याची दृष्टि गेली.

" ओहो, सुलभा ! "

" हो, मी आज ५–६ दिवस मुंबईंत आहें. "

आपला जाणकार चाहता भेटावा तसा आनंद सुलभाला झाला. सदानंदानें तिच्या जवळच आसन ठोकलें.

" तूं मध्येंच कशी मुंबईला ? "

" प्रकाशचं अपील आहे उद्यां. त्यासाठीं आम्ही सर्वजण आलों आहोंत. अन् आमच्या छायाताईचे वडील गेले, कळलं का तुम्हांला ? "

" हो का ? अरेरे ! बरं, उद्यां प्रकाशचं अपील का ? सुटेल म्हणा तो. "

" कशावरून हो ? "

" अग, या लोकांची तशी भीति सरकारला वाटत नाहीं. हे नुसते बोलण्यांत समाजवादी. यांच्या चळवळीचीं सूत्रं जोंपर्यंत मुंबई–अहमदाबादच्या व्यापाऱ्यांच्या ताब्यांत आहेत, तोंपर्यंत यांची चळवळ कुठपर्यंत भडकणार हें दिसतंच आहे. दरिद्रीनारायणाचे हे उपासक अखेर दरिद्री लोकांना दगाच देणार ! "

" मग तुम्हांला नाहीं कोणी पकडत ? "

" सुलभा, तुला हीं कारस्थानं इतक्यांत नाहीं कळायचीं. आमच्यासारख्या शंभर नंबरी जहालांना लोकांचं पुढारीपण मिळूं नये, म्हणून अशीं कारस्थानं रचण्यांत येतात, व आयतंच यांना पुढारीपण लाभतं. पुढारी 'बनविण्याचा' डाव आहे हा ! "

आपल्या बिनतोड युक्तिवादावर आणि कोटीवर खूष होऊन सदानंद मोठ्यानें हसूं लागला.

" तुम्ही कांहीं म्हटलं तरी आमचा प्रकाश खरा कार्यकर्ता आहे. "

यावर सदानंदानें पड खाल्ली. सुलभाला विशेष त्रस्त न होऊं देण्याची तो सावधगिरी बाळगीत असे.

एवढ्या वेळांत तीन चार स्टेशनें जाऊन एका ठिकाणीं ट्रॅम थांबली. सदानंद सुलभाला आपल्याबरोबर उतरण्याचा आग्रह करूं लागला. 'आपल्या 'स्वस्तिक' मुव्हिटोनमध्यें जाऊं, तेथें तुला सर्व दाखवीन, आणि मग परत येऊं.' असें तो तिला सांगूं लागला. दादरला परत लौकर गेलेंच पाहिजे ही जाणीव सुलभाला होती, पण सिनेटोन पाहण्याची ही नामी संधि दवडण्यासहि तिचें मन तयार होईना. अगोदर सिनेमाच्या सृष्टीबद्दल तिला विशेष आकर्षण असे आणि आज तर काय तिचा चहाता आग्रहानें तिला नेऊं पहात आहे. सदानंदाबरोबर यायला अखेर तिनें संमति दिली.

सदानंदानें एक व्हिक्टोरिया बोलाविली. मुव्हिटोनपर्यंत येण्यास त्यांना सुमारें अर्धा तास लागला असेल. या अर्ध्या तासांत सिनेमांतील नटनटींच्या विलासी आणि कीर्तिशाली जीवनाचीं भडक वर्णनें सदानंद मधून मधून करीत होता.

मुव्हिटोनमध्यें शिरतांच सदानंद दिमाखानें चोहींकडे सुलभाला हिंडवूं लागला. त्या मुव्हिटोनमध्यें हा असिस्टंट डायरेक्टर म्हणून येणार अशा वदंता पसरल्या होत्या. त्यामुळें नायकनायिकापासून नर्तिकांपर्यंत सर्व नटनटी त्याच्याशीं एकदोन तरी शब्द बोलण्याची संधि घेतच. सुलभासारखी सुकुमार सौंदर्यखनी या प्राण्याबरोबर हिंडतांना पाहून होतकरू नटींना भय वाटूं लागलें. नायकाची आणि खलपुरुषाची भूमिका करणारे नट आशाळभूतपणें पाहूं लागले, आणि इतर मंडळी नवीन येणाऱ्या डायरेक्टरचें हें ‘ फाइंड ’ बहोत खुबसुरत आहे असें आपसांत कुजबुजूं लागली.

सुलभाला तेथील दोन तीन दृश्यें विलक्षणच वाटलीं.

एका खोलींत एका मोठ्या कोचावर एक नट बसला होता. त्याच्या मांडीवर डोकें ठेऊन कोणी सिनेमासम्राज्ञी पडली होती. भोवतालीं कांहीं उपग्रह उत्तान व अश्लील भाषणें करून हंसत खिदळत होते.

एक गोरी मुलगी समोरून येत असतां गेंड्यासारखा गलेलठ्ठ व युरोपियन पोषाख केलेला मनुष्य तिला भेटला. त्यानें एक पाचकळ कोटी करतांच तिनें त्याचें नाक हंसत हंसत पिरगळलें, आणि ती निघून जाऊं लागली. तिच्या कांपीव केसावर हाताचा एक झटका देण्यास त्या निर्लज्ज माणसानें मागेंपुढें पाहिलें नाहीं. तिनें उसन्या रागानें मागें पाहिलें, पण तिच्या छद्मी हंसण्यावरून तो मनुष्य त्या ठिकाणीं आणखीहि कांहीं चावटपणा करता, तरी तिला तो हवाच होता असें दिसलें.

सुलभानें तो प्रकार पाहतांच तिचा थरकांप उडाला. सदानंदाच्या तें लक्षांत येतांच तो हंसून म्हणाला, “ अग, ती नाचांतली मुलगी आहे. हिरॉईनचा सभ्यपणा तिला कसा येणार ? ”

संगीत, देखावे, रंगभूमि इ० मुव्हिटोनमधील निरनिराळीं खातीं दाखवून झाल्यावर, स्टूडियोंत सीन घेण्याचें काम चाललें होतें तेथेंहि थोडा वेळ त्यानें सुलभाला नेलें. सर्व माहिती देत असतां कीर्ति आणि पैसा मिळविण्याचें हें केवढें

साधन गुणी स्त्रीपुरुषांना यंत्रकलेनें उपलब्ध करून दिलें आहे, याचें माहात्म्य सदानंद सुलभाला सांगत होता.

नंतर एका स्थूल, कामुक पण सभ्य दिसणाऱ्या गृहस्थाकडे सदानंदानें सुलभाला नेलें.

" सुलभा, हे आमचे मालक आणि डायरेक्टर ईश्वरप्रसाद जे. भट. सिनेमाच्या धंद्यांतले हे जादुगार आहेत. बंगाल्यांत देवकी बोस, इंग्लंडमध्यें अलेक्झँडर कोर्डा, अमेरिकेंत सेसिल मिल, आणि या मुंबईत आमचे ईश्वरप्रसाद...."

" अरे कॉम्रेड, काय बोलतो हें. "

" या आमच्या मिस् सुलभा. यांच्याविषयीं आपण कितीदां तरी बोललों आहों. "

" हां हां, कॉलेजांत तुमचा नाच पाहिला आम्हीं. बहुत आनंद झाला. तुम्ही स्क्रीन-वर आला तर 'इम्मॉर्टल' व्हाल. चला सदानंद आतां आपण बंगल्यावर जाऊं. यांचा कांहीं सत्कार केला पाहिजे ना. "

" नको नको, मला आधींच उशीर झाला आहे. मला जाऊं द्या घरीं. " सुलभा भीत भीत म्हणाली.

" चला हो, तुम्हांला लगेच पोहोचतं करूं. "

सुलभाची छाती धडधडूं लागली. मुख्य रस्त्यापासून आडवळणांनीं ती इतक्या एका बाजूला आली होती कीं एकटे जाणें शक्य नव्हतें. त्यांतून काय नेम! आपण त्यांच्या इच्छेविरुद्ध जाऊं लागलों तर हे दांडगे काय करतील कोणास ठाऊक? ती मुकाट्यानें ईश्वरप्रसादच्या मोटारमध्यें चढली. मोटारमध्यें सदानंद अगोदर पुढें शॉफर जवळ जाऊन बसला होता. सुलभाला त्यानें मुद्दामच मागें शेटच्या शेजारीं बसायला लाविलें. सुलभा अगदीं एका कोपऱ्यांत क्रुद्ध होऊन बसली होती. शेटजीच्या बोलण्यांत आढळून येणारा लघळपणा आणि कामुकता यांचा दर्प तिला असह्य होऊं लागला. शेटजीच्या बंगल्याजवळ मोटार थांबली. 'इंद्रमॅन्शन' नांवाप्रमाणेंच भव्य आणि श्रीमंती इमारत होती. शेटजी मोटरींतून उतरून आंत जाऊं लागले. सदानंद आणि सुलभा यांना 'या या' असें म्हणत ते झपझप पावलें टाकीत होते. इतक्यांत गंगाराम बंगल्यांत शिरला. शेटजींना रामराम करून तो म्हणाला, " साहेब, जव्हेरीशेटनीं ही चिठ्ठी दिली आहे आपणांला. "

" ठीक आहे. देईन मी उत्तर धाडून; तूं जा. "

गंगारामला पाहतांच सुलभाला आनंद झाला. ईश्वरप्रसाद वर जिना चढूं लागला आणि सदानंद मुनीमाशीं बोलत बाहेर उभा होता, तेवढ्यांत तिनें गंगारामला एका बाजूला हलकेंच सांगितलें, " गंगाराम, हा एक रुपया घे आणि हिंदु कॉलनींत दादरला जा. पुलाजवळच्या लेनमध्यें पंडित कुठं राहतात तें तुला कुणीहि सांगेल. आणि दादा आणि वकीलसाहेब यांना इकडे लौकर पाठवून दे. मी मोठ्या संकटांत आहें. "

गंगाराम भानावर नव्हता. त्याच्या विषण्ण चेहऱ्यावर कांहींच भाव उमटला नाहीं. आपल्या बायकोच्या प्रियकराची ही बहीण! हिच्या भावानें आपल्या गैरहजेरींत आपल्या अब्रूची कितीशी काळजी घेतली. आतां हिचें संरक्षण कशाला करायचें आपण! तो कांहीं न बोलतां बाहेर पडला. सुलभाचा धीर आतां मात्र सुटला. हा गंगाराम देखील या दुष्टांच्या कटांत सामील आहे काय?

तिसऱ्या मजल्यावरच्या एका सुंदर खोलींत सारी सिद्धता थोड्याच वेळांत झाली. खाद्यपेयांचा थाट उडाला.

एका लहानशा कोचावर शेटजी बसले होते. तेथेंच ते सुलभाला बसण्याचा आग्रह करूं लागले. 'पुढच्या फायद्याकडे लक्ष देऊन आतां कशालाहि नाहीं म्हणूं नकोस' अशी सूचना सदानंदानें हळूच केली. सुलभा रागानें लाल झाली होती.

सुलभा कांहींच घेईना. शेटजी सारखा आग्रह करीत होते. " अरे, हें काय आमचा आहे? हा बंगला तर तुमचाच आहे. ...बस्स सुलभाबाई, तुम्ही घराची काळजी नका करूं!...तुमच्यासारखी 'स्टार' मिळाली तर हॉलिवुडचे डायरेक्टर येतील इथं शोध घेत...." अशी कामुक, लोचट, प्रशंसात्मक भाषा ईश्वरप्रसाद सारखा बोलत होता. तो आणि सदानंद कांहीं केल्या ऐकेचनात, म्हणून सुलभानें एक लेमनचा पेला अखेर तोंडाला लावला. तिचा डावा हात टेबलावरच होता. ती पेय पिण्यांत गर्क आहे असें पाहून ईश्वरप्रसादानें तिच्या हातांवर आपला हात पडल्यासारखें केलें.

सुलभा एकदम चवताळून उठली. " शेटसाहेब, तुम्ही मांडलंय् काय हें? अद्याप तीनचार आंकड्यांचा पगार कांहीं तुम्ही मला चालू केलेला नाहीं! मी सहज

या सदानंदाची ओळख म्हणून स्टूडियोंत आलें. सिनेमांत जायचं कधीं तरी मी गमतीनं म्हणत असें. नक्की प्रवेश मिळण्याची कांहीं वाट पहात नव्हतें. आतां तुमच्या स्टूडियोंतलं वातावरण पाहून तर माझे डोळे चांगले उघडले आहेत. पगारी नटीशीं जसं हक्कानं वागावं तसं वागत आहां; पण याद राखा, किशोर आणि शशांक आले तर तुमचं वैभव धुळीला मिळवितील. "

शेटजींनीं प्रश्नचिन्हांकित मुद्रेनें सदानंदाकडे पाहिलें. सदानंद मोठ्यानें हंसत म्हणाला, "अहो शशांक म्हणजे हिचा चित्रकार भाऊ. हिच्यासारखाच सुरेख पण भारी उर्मट आहे. अन् किशोर म्हणजे एक श्रीमंताचं वकील झालेलं चढेल पोरगं. त्या बच्चे लोकांचा वकूब काय ?"

"तो दिसेलच आतां आपणांला...." असें म्हणत संतप्त झालेला किशोर आंत आला ! त्यानें दार धाडकन् उघडलें ! त्याच्या मागोमाग शशांक आला !

सुलभाला हा चमत्कार वाटला. पण तिची भीतीनें गाळण उडाली. 'दादा, दादा' असें म्हणत शशांकाच्या गळ्यांत पडून ती रडूं लागली. "मी आपण होऊन नाहीं रे आलें इथं. यांनींच मला आणलं. हे काय काय घाणेरड्या गोष्टी बोलतात इथं. मला यांनींच पेचांत आणलं होतं. किशोर, माझी चूक नाहीं. "

किशोर आणि शशांक यांच्या अकस्मात् आगमनामुळें सदानंद गोंधळला होता. त्याला भीतीहि वाटत होती. पण तो निगरगट्ट वरकरणी हंसून म्हणाला, "वा सुलभा, इतका वेळ शेटजीशीं वाटेल ते रंगढंग केलेस आणि आतां आपली मंडळी आल्यावर उलटलीस वाटतं. "

"अहो, कॉम्रेड गप्प बसा" किशोर म्हणाला, "खालून आम्ही सर्व गोष्टी ऐकत होतों. जंगलांत चुकलेल्या मेंढराच्या आर्त ओरडण्याच्या मागानें जसा मेंढपाळ येतो, तसे आम्ही खालून हिच्या करुण शब्दावरूनच या खोलीचा तपास लावला. नाहींतर आपण पढवून ठेवलेले नोकर चाकर आम्हांला दाद देतच नव्हते. अहो शेटसाहेब, मी ओळख करून देतों तुम्हांला. मी किशोर, श्रीमंताचं वकील झालेलं चढेल पोरगं आणि हा या कुलीन कन्येचा सुरेख अन् उर्मट भाऊ. "

"कुलीन अकुलीन या कल्पना संपत्तीमुळें निर्माण झाल्या आहेत...."

“अहो साडेतीन इंटरनॅशनलवाले,” किशोर सदानंदावर चवताळून म्हणाला, “तुमचं तत्त्वज्ञान जरा गुंडाळून ठेवा. आपल्या आवडत्या कोयत्याहातोड्याचा उपयोग करण्याची नामी संधि आणून देऊं तुम्हांला. कोयत्यानें जेलच्या आवारांतलं तण काढणं आणि हातोड्यानं खडी फोडणं. आपलं तत्त्वज्ञान जगतां येईल तिथं तुम्हांला. सोबतीला हे शेटजीहि देऊं. तिथं छान डायरेक्शन करतील हे.”

तुरुंगाची भाषा निघतांच शेटना घाम सुटला. “अरे वकीलसाहेब, आम्हांला काय माहीत तुम्ही बडे लोक आहांत! हा कॉम्रेड म्हणाला मला, कीं पोरगी सिनेमांत यायला नाचती आहे. मीं म्हटलं, घेऊन ये. ती खुषीनं याच्या बरोबर आली....”

“मीं नुसतं स्टूडियो पाहायला यायचं कबूल केलं! हे पुढले अर्थ तुम्ही लावलेत.”

“सुलभा, तूं बोलूं नकोस.” शशांक तिला आवरीत म्हणाला, “अहो पण शेटसाहेब, समजा. ती सिनेमांत यायला कबूल झाली. म्हणून तिचे आई, बाप, भाऊ यांची चौकशी न करतां, एकदम प्रकरण हातघाईवर आणायची कां चपळाई केलीत हो?”

“तो गंगाराम भेटला नसता तर देवा! माझ्यावर काय प्रसंग...” सुलभा स्फुंदून रडूं लागली. तिला वाटलें गंगारामनें किशोर–शशांकना वर्दी दिली. पण खरा प्रकार तसा नव्हता. तिचें सांत्वन करीत शशांकनें विचारलें, “कोण, गंगाराम इथं आला होता? आम्हांला नाहीं भेटला.”

सुलभा बुचकळ्यांत पडली. गंगाराम भेटला नाहीं मग यांना आपला पत्ता कसा लागला?

इतक्यांत किशोर शेटना म्हणाला, “हें पहा ईश्वरप्रसाद, आतां तुमचा निरोप घेतों. आमची पोरगी सापडली या आनंदांत खटला भरण्यापूर्वीच तुम्हांला बंधमुक्त केलं आहे. कारण ‘स्टंट’ ला सरावलेल्या तुमच्यासारख्या डायरेक्टरला आणि या भुरट्या भाईला खटल्याची मौजच वाटेल. पण आम्हांला तो तमाशा नको आहे.”

असें म्हणून सुलभा व शशांक यांना घेऊन किशोर बाहेर पडला; पण कांहीं आठवल्यासारखें करून तो परत आला; आणि कोटाच्या खिशांतून एक लहानसें कार्ड

काढून सदानंदाचे हातीं देत तो म्हणाला, " डीअर कॉम्रेड, पूना मेलमध्यें मागें आपली गांठ पडली होती ना, तेव्हां आपल्या पुस्तकांतून हें या शेटच्या नांवाचं व्हिजिटिंग कार्ड पडलं खालीं. त्यानंतर आपण प्रथमच भेटतों आहोंत; हें घ्या तें कार्ड. "

—किशोर झटकन् निघून गेला.

ईश्वरप्रसाद आणि सदानंद एकमेकांकडे भकास चेहरे करून पाहूं लागले.

## .२८. बंधमुक्तता

हायकोर्टचा देखावा गंभीर, बादशाही, पण आदर उत्पन्न करणारा होता. वाटेंत जागोजाग भेटणारे सत्तेचे प्रतिनिधी, मधून मधून थोडेंसें अंधारलेलें, एकाद्या व्यक्तीचें भाषण आणि पंख्यांची घरघर एवढ्यानेंच होणारा निःशब्दतेचा भंग, कायद्याचीं सूत्रें उलगडण्यांत मग्न झालेले कायदेपंडित आणि वरून पडणाऱ्या विजेच्या प्रकाशांत चकचकणारीं त्यांचीं टकलें, आपल्या भवितव्याबद्दल चिंतातुर झालेले वादी प्रतिवादी, आणि रुपेरी केसांचे, उच्चासनावर शोभणारे हिमालयाप्रमाणें थंड व भव्य न्यायाधीश, हें सर्व दृश्य पाहून क्षणभर श्वास आवरून न धरणारा विरळा! तेथें अंधार आणि प्रकाश, मौन आणि वक्तृत्व यांच्याच जोडीला निराशा आणि आशा येऊन बसल्या होत्या. शांति आणि दया यांना तेथें स्थान नव्हतें असें नाहीं, पण न्यायाच्या दरबारांत त्या पडदानशीन ललनांप्रमाणें मर्यादेच्या झिरझिरीत पडद्यांतून पहात एवढेंच !

प्रकाशच्या अपिलाचें काम बॅरिस्टर पद्माकर यांनीं कौशल्यानें चालविलें. तथापि त्यांना सर्व मदत किशोरचीच झाली. किशोरनें खटल्याचा अभ्यास कसून केला होता. टिपणें तयार केलीं होतीं. खालच्या कोर्टांत कौशल्यानें खटलाहि चालविला होता. पद्माकरना ही सर्व सामुग्री आयतीच उपयोगी पडली. त्यांतून सफाईदार इंग्रजी उच्चार, हळू पण स्पष्ट आवाज, न्यायाधीशांना मोठेपणा देऊन बोलण्याची पद्धति, आणि विशेषतः कामांत आढळून येणारी प्रामाणिकता यामुळें अपिलाला रंग चढला.

अपील ऐकण्यास छाया, शशांक आणि चित्रलेखा आलीं होतीं. आदले दिवशींच्या प्रकारामुळें सुलभा अजून अस्वस्थ होती. अर्थात् ती आली नव्हती. कल्याणच्या स्टेशनवर छायाला भेटलेले कांहीं समाजवादी पुढारी व मुंबईचे कांहीं स्थानिक जुने नामांकित वकील हेहि अपिलासाठीं मुद्दाम आलेले होते. प्रकाशच्या पक्षाबद्दल कितीही तीव्र मतभेद असले तरी खुद्द प्रकाशविषयीं सर्वच पक्षोपक्षांना अत्यादर वाटे. म्हणून अपिलासाठीं जमलेल्या श्रोतृवृंदांत जुन्या व नव्या पक्षांचें प्रातिनिधिक संमेलनच भरलेलें दिसत होतें. आणि रघुनंदनांसारखे प्रकाशचे जाणते चहाते मुद्दाम तेवढ्यासाठीं मुंबईस आले होते !

छायाला एक प्रकारची भीति वाटत होती. थोड्या अवधींत एक दोन मोठ्या अनिष्ट गोष्टी अनपेक्षित रीतीनें घडल्या म्हणजे सर्वच गोष्टींचा निकाल आपल्या-विरुद्ध लागणार आहे असें वाटूं लागतें. किंबहुना प्रत्येक बाबतींत निराशेसाठींच मन तयार करण्याच्या प्रयत्नाला माणूस लागतें. छाया अशाच प्रकारच्या उदासीन-तेंत होती.

चित्रलेखाची स्थिति तर विलक्षणच झालेली. खटला प्रकाशचा आणि चालविणार पद्माकर ! आणि पुढारी मंडळींत अगदीं प्रमुखपणें दिसणारे रघुनंदन ! एकेका वेळीं जिवाला हैराण करणाऱ्या सर्वच गोष्टी एकदम समोर आलेल्या. ती कसेंबसें मन आवरून अपील यशस्वी होवो असें मनोभावें प्रार्थीत होती.

अपिलाचे सर्व विधी झाले.

आतां न्यायाधीश निकाल देणार !

सर्वजणांनीं अवधान दिलें.

लेखकाला वर बोलावून न्यायमूर्ति हलक्या आवाजांत निकाल लिहिण्यास सांगूं लागले. पुरावा आणि कायदा यांचा सविस्तर कीस काढून पुढील शब्दांत न्याय-मूर्तींनीं समारोप केला : "श्रीयुत प्रकाश यांच्याविरुद्ध जो पुरावा फिर्यादी पक्षानें पुढें आणला आहे त्याची नीट छाननी करून पहातां, आरोपीचा उद्देश सरकार उल-थून पाडण्याचा आहे असें दिसत नाहीं. आरोपी जाणता आणि जबाबदार आहे, अर्थात् निव्वळ एखाद्या लहानशा सभेला चिथावणी देऊन प्रस्थापित समाजरचना बदलेल अशी वेडगळ आशा तो कशी बाळगील ? आदर्श समाजरचना कशी असावी

हें तात्त्विक दृष्ट्या समजावून देणें हा प्रत्येक नागरिकाचा हक्क आहे, हें सुधारलेल्या देशांतल्या न्यायकोर्टांनीं मान्य केलें आहे. अर्थात् तात्त्विक विवेचनांत आपला मुद्दा नीट ठसविण्याचे भरांत, एकादा अधिक उणा शब्द माणसाच्या तोंडून जाणें साहजिकच आहे. अशा वेळीं तेवढाच शब्द घेऊन माणसाला राजद्रोही ठरविणें हें अयोग्य होईल. भाषा ही विचारांचें वाहन आहे. म्हणून शब्दांवरून आरोपाचें स्वरूप न ठरवितां शब्दांतील विचारावरून ठरविलें पाहिजे. नुसत्या २–४ शब्दांवरून जबाबदार व प्रगतिपर विचारांच्या पुढाऱ्यांना असे तुरुंग दाखविण्यांत येतील, तर जनतेच्या जीवनाचा प्रवाह गढूळ होईल. आमच्या मतें भाई प्रकाश हे पूर्ण निर्दोष आहेत म्हणून त्यांना आम्ही बंधमुक्त करण्याचा हुकूम करीत आहोंत.”

छाया आणि चित्रलेखा अश्रु ढाळूं लागल्या !

शशांकला गहिंवर आला !

जमलेल्या मंडळींनीं न्यायमूर्तींना कितीतरी मूक धन्यवाद दिले !

किशोर आणि पद्माकर यांच्या आनंदाला तो मिळविण्याच्या बाबतींत पडलेल्या कष्टांमुळें विशेष गोडी आली होती. छाया आणि चित्रलेखा यांना तर आपण या दोघांचें कसें कौतुक करावें हेंच कळेना !

* * *

सर्वजण बाहेर आले.

मुंबईतील अभिनंदनें स्वीकारतां स्वीकारतां किशोर आणि पद्माकर यांची त्रेधा उडाली. त्यांतच कोणी नव्या ओळखी करून देत. अखेर मंडळी पांगतां पांगतां जेवढी राह्यची तेवढीच राहिली.

“छायाताई, हे माझे मित्र बॅ. पद्माकर. आतां यांच्या वकिलीकौशल्याची कसोटी लागलीच आहे. तेव्हां अलमति विस्तरेण ! आणि हे रघुनंदन, आमच्या पिढींतले सुसंस्कृत व घरंदाज पुढारी.”

“यांची नाहीं माहिती सांगितलीत, किशोर ?” रघुनंदन छायाला नम्रपणें अभिवादन करून म्हणाले.

“सांगतों ना, या छाया पंडित. आमच्या या शशांकची मामे बहीण. सध्यां

विल्सनमध्यें ज्यूनियरला आहेत. पण आतां बहुतेक पुण्यास स्थायिक होतील. आम्हां प्रकाशच्या भक्तगणांत यांचें स्थान कदाचित् पहिलें लागण्याचा संभव आहे.''

"...आणि रघुनंदन, या चित्रलेखाताई, आमच्या किशोरच्या भगिनी." शशांक छद्मीपणानें म्हणाला.

"वाः वाः त्यांना मी ओळखत नाहीं का?" रघुनंदन कांहींसे ओशाळून म्हणाले, "काय लेखाताई, हौ आर् यू?"

"क्वाइट वेल, थॅंक यू." चित्रलेखानें शांतपणें उत्तर दिलें.

नंतर चहा घेऊन मग आपापल्या ठिकाणीं जावें अशी रघुनंदनांनीं विनंति केली. सर्वांनीं एका सुंदर उपहारगृहाचा आश्रय केला.

सर्वांना आपापल्या परीनें निर्भेळ आनंद झाला होता. पण त्या आनंदोत्सवांत एकच अभागी जीव होता. आणि तो म्हणजे चित्रलेखा. कांहीं रोगांनीं शरीरांत ठाण दिलें म्हणजे पौष्टिक अन्नाचा सत्त्वांश न बनतां विषच होत जातें, त्याप्रमाणें चित्रलेखाच्या जीवनांत कसलाहि आनंद औदासीन्यालाच कारण होई. आज समोरच्या दोन परपुरुषांपैकीं एकानें आपणाला सोडलें आणि एकाला आपण गमाविलें. आणि आज ज्याच्या बंधमुक्ततेचा आनंदोत्सव तो तर आतां दुरावलेलाच आहे! अशा त्रिविध तापांत चित्रलेखा होरपळत होती!

## .२९.  'सुखदुःखाचीं आभाळें'

प्रकाश सुटल्यानंतर एकदोन दिवस घरांतल्या आनंदाला पारावारच नव्हता. बाबांच्या मृत्यूमुळें पसरलेली शोकाची सावली बरीचशी दूर झाली. मामींच्या दुःखामुळेंच इतरांना वाईट वाटे तेवढेंच. छाया पितृनिधनामुळें कष्टी होती खरी, परंतु प्रियकराच्या सांनिध्यांत तिचें दुःख पुष्कळच शीतळ होऊं लागलें. प्रकाशच्या वागण्यांत इतका मोकळेपणा तिला दिसला कीं कृष्णचंद्रांनीं प्रकाशला खरोखरच कांहीं सांगितलें नसलें पाहिजे, अशी तिची खात्री झाली. शशांक तर सावलीसारखा प्रकाशच्या बरोबर असे. किशोर त्याला थट्टेनें म्हणे, 'तूं पुढें तरी प्रकाशला कधीं एकांत मिळून देणार आहेस कीं नाहीं ?' सुलभाला झाल्या प्रकाराबद्दल कोणीहि बोलायचें नाहीं असें कडक फर्मान छायानें काढल्यामुळें सुलभाला मोठेंच संरक्षण मिळालें. आपल्या नाचरेपणाचे होणारे अनर्थ समजून आल्यानें सुलभा आतां अधिक विचारी होईल अशी आशा उत्पन्न झाली होती.

पण या सर्व आनंदाला मोठाच धक्का बसला. महोत्सव चालू असतां एकादा दिवा भडकून छतानें पेट घ्यावा तसें झालें. गंगारामनें ईश्वरप्रसादकडे सुलभाचा निरोप ऐकला न ऐकल्यासारखें केलें. आणि तेथून तो बाहेर पडला. मत्सर आणि सूड या भावना प्रबल झाल्यामुळें त्यानें तो निरोप दादरला पोचविला तर नाहींच, पण सुलभाकडचा मिळालेला रुपया घेऊन तो गुत्त्यांत शिरला आणि तेथें यथेच्छ दारू पिऊन तो इतस्ततः हिंडूं लागला. घराकडे जायला म्हणून तो गैरशुद्धींत कोठेंतरी भटकत होता. पण अखेर घरापर्यंत पोचला नाहींच !

थंड होत चाललेल्या हवेनें जेव्हां त्याला किंचित् शुद्धी आली तेव्हां त्याला असह्य

यातना होऊं लागल्या! दारूची निशा उतरतांच शरीराचा दाह शांत झाला, पण मनाचा भडका उडाला. सुलभाचा निरोप आपण शशांकपर्यंत खुनशीपणानें पोचविला नाहीं. आतां त्या पोरीची काय वाट झाली असेल! शशांकनें आपल्या बायकोशीं आपल्या गैरहजेरींत लगट केली असें नक्की कुठें सिद्ध झालें आहे! ती तर आपल्यावर पूर्वीसारखेंच प्रेम दाखविते आहे! आणि ती जर अपवित्र नसेल तर शशांकच्या रागावर सुलभाला त्या अरक्षित स्थितीत सोडण्यांत आपण केवढी भयंकर चूक केली! आज दोन पिढ्या ज्या आबासाहेबांच्या छत्राखालीं आपण वाढलों, त्यांच्या मुलीच्या अब्रूवर नकळत आपण निखारे ठेवण्यास मदत केली. याच भयानक कल्पनांनीं तो वेडावत गेला. सुलभाच्या शीलाभोवतीं वणवा लागला असतां आपण तिला तसेंच सोडलें हें कळलें तर आपले आश्रयदाते काय म्हणतील, आपणांला अन्नाला लावणारे वकीलसाहेब आपली काय किंमत करतील, हे विचार मनांत येऊन तो घाबरला आणि अखेर अंधारांत धांवत जाऊन, विजेच्या सामर्थ्यानें फोकावत येणाऱ्या गाडीखालीं त्यानें आपला देह ठेवला! तिसऱ्या मजल्यावरून खालीं दगडावर पडलेली हंडी फुटावी त्याप्रमाणें त्याच्या देहाचे हजारों तुकडे उडाले!!

शेवंतीला वार्ता कळली. तिच्यावर आकाशच कोसळलें. शशांक, किशोर, आणि प्रकाश यांच्याकडे हंबरडा फोडीत ती आली. सकाळीं शिदोरी घेऊन हंसत मुखानें गेलेल्या गंगारामनें अखेर दहाबारा तासांत आत्महत्या कशी केली हें नीट उमगलें नाहीं. किशोरनें कांहीं दुवे जुळविले, पण सर्व कांहीं जुळेनात.

—आणि नुसते सर्व दुवे जुळवून तरी काय करावयाचें होतें? कॉरोनरनीं आत्महत्या ' असा निर्णय दिला. इतकेंच नव्हे तर शेवंतीचे गेले १–२ वर्षांतले कामधंदे विचारून असेंहि लिहून ठेविलें कीं, " पतीच्या गैरहजेरींत पत्नीनें कलांच्या नादीं लागूं नये. सिनेमा, मॉडेल वगैरे धंद्याला अजून यावी तितकी प्रतिष्ठा आलेली नाहीं. त्यामुळें अधू मनाच्या नवऱ्यांना मनस्ताप होतो." कॉरोनरचीं हीं बोधवचनें प्रसिद्ध होतांच, दोनचार दिवस सनातन्यांना चिंतनाचा, व सुधारकांना विनोदाचा एक विषय मिळाला!

* * *

पुण्याला जाणाऱ्या सकाळच्या गाडींत एक तीन चार बाकांचा लहानसा भाग शशांक, किशोर, प्रकाश यांनीं आपल्या ताब्यांत घेतला. तीन सीट्सच्या एका

बाकावर सुलभा, चित्रलेखा, आणि छाया बसल्या, आणि त्यांच्यासमोर किशोर, शशांक, आणि प्रकाश यांनीं ठाण दिलें. मुलांनीं खिडक्या गांठल्या, आणि शेवंती व मामी त्यांच्या जवळ बसल्या.

गाडी सुटेपर्यंत भेटायला आलेल्या मजूर पुढाऱ्यांशीं प्रकाश बोलत होता.

गाडी सुटल्यानंतर गेल्या कित्येक दिवसांतल्या घडामोडींवर साहजिकच बोलणीं सुरू झालीं. तीं सारीं माणसें मनानें एक होतीं. किशोरनें गेल्या कांहीं दिवसांत जी कामगिरी केली, तिचीं रसभरित वर्णनें करण्यांत सर्वजण दंग होतीं. किशोर मात्र वारंवार प्रकाशवर वृत्तपत्रांनीं वेळोवेळीं जें स्तुतिपर लिहिलें त्याच्या हकिकती सांगून विषयांतर करी; तथापि आपली स्तुति चालत राहावी याविषयींची गूढ इच्छा त्याला सोडीना. स्तुतिसाठीं नव्हे, तर आपल्या स्तुतीनें सलज्ज व आरक्त होऊन सुलभा जे मुग्ध कटाक्ष टाकी, त्याकरितां तरी लोकांनीं आपल्याबद्दल बोलत राहावें असें त्याला वाटे.

मामी सर्वांचें मुकाट्यानें ऐकत होत्या. शेवंतीला किती तरी उत्कण्ठा वाटे कीं एकादा शब्द आपणहि बोलावा; पण आपली पायरी कशी सोडायची ? प्रकाश सुटल्यामुळें उल्हासावर झोके घेणारें शशांकचें मन शेवंतीच्या करुणसुंदर मुखावर जरा स्थिर झालें कीं गंभीर होई. शशांकला वाटे हिच्या मनांत कोणती खळबळ असेल बरें !

बोलतां बोलतां खंडाळ्याच्या घाटांत गाडी केव्हां शिरली हें कळलें नाहीं. या ठिकाणीं चहूंकडून प्रवास करून आलेला वर्षाऋतु अखेरच्या मुक्कामासाठीं थांबला होता. किशोरनें सर्वांच्याकरितां चहा मागविला; आणि त्या पेयामुळें पुनः ताजेतवाने होऊन सर्वजण घाटांतली सृष्टिशोभा पाहूं लागले.

खालीं दरीमध्यें गर्द झाडी, धुक्यांतून हिरवीं तांबडीं पानें आणि चकाकणारीं जलाशयें दिसत. जणूं एका झिरझिरीत वस्त्राखालीं पांच माणिकेंच झाकून ठेविलीं आहेत. समोर हिरव्यागार डोंगरांवर अगदीं माथ्यापासून खालपर्यंत दोनचार मोठाले ओहोळ कोसळत होते. त्यांच्या चकचकीतपणामुळें एकाद्या भल्यामोठ्या हिरव्या पार्श्वभूमीवर, मोठाले पुराणकालीन सापच ( त्यांचा पोटाकडील भाग दर्शनी ठेवून ) टांगून ठेवले आहेत, असा भास होई. आणि दाट झाडींतल्या भिल्लाच्या अदृश्य झोपडींतून क्वचित् बाहेर येणारा धूर हे जणूं सापांचे उःश्वासच असावेत असें वाटे. एका बाजूला

डोंगराच्या प्रचंड सुळक्याभोंवतीं धुक्याचा समुद्र पसरला होता. सूर्याच्या किरणांनीं त्या धुक्याची पांगापांग होत चालल्यामुळें त्या समुद्रांत खळबळ माजली होती. ती खळबळ आणि मध्यंतरींचा तो प्रचंड सुळका पाहिला म्हणजे एकादा दिग्गज जलक्रीडा करीत असावा असें दिसे; तथापि याहून समर्पक वर्णन द्यायचें म्हणजे मंदार पर्वताची रवी करून देवदानव समुद्र–मंथन करीत आहेत, या भव्योदात्त पुराणकल्पनेचें चित्र डोळ्यांपुढें उभें राही!

"काय अप्रतीम शोभा ही! या देखाव्याचं नुसतं यथातथ्य चित्रण केलं तरी त्या चित्राला ध्येयदर्शी चित्र म्हणून वाखाणतील." शशांक प्रसन्नपणें म्हणाला.

"ह्या आमच्या महाराष्ट्राच्या 'कनू'ची प्रतिभा स्फुरण पावलेली दिसते!" किशोर हंसत म्हणाला.

या वेळीं कांहीं आठवल्यासारखं करून प्रकाश उद्गारला, "खरंच, या वेळीं आपल्या या स्नेहसंमेलनांत आणि असा सुंदर देखावा समोर असतां आपले कृष्णजी पाहिजे होते. कुठं त्या रुक्ष सिंधमध्यें जाऊन पडले कोणास ठाऊक?"

यावर कांहींशा तुसडेपणानें छाया म्हणाली, "कां? त्यांच्या रुक्ष सिंध प्रांतांत-सुद्धां त्यांना असला देखावा आणि स्नेह भरपूर आहे."

हें ऐकून किशोर गंभीर झाला. "छायाताई, कृष्णजींच्याबद्दल तुमचा असा ग्रह होणं साहाजिक आहे. पण आतां खरी गोष्ट लपवून ठेवतां येत नाहीं. माफ करा, कृष्णजींनीं तुम्हांला तें पत्र लिहिलें त्यांत बराचसा भाग असत्य आहे."

"म्हणजे?" छायानें घाबरून विचारलें. प्रकाशला आपण कांहीं सांगि-तलें नाहीं हें कृष्णजींचें म्हणणें खोटेंच तर एकूण! तिनें भीत भीत प्रश्न केला— "पण तुम्हांला कसं हें कळलं?"

"हें पहा मी कांहींच सांगत नाहीं. तुम्हांला ज्या दिवशीं कृष्णजींचं पत्र आलं त्याच दिवशीं मलाहि आलं. त्या पत्रावरून तुम्हांला सर्व कांहीं उमजेल. सुलभा, तूंच हें पत्र मोठ्यानें वाच."

सुलभा वाचूं लागली—"प्रिय किशोर..."

ती किंचित् लाजत अडखळली.

"हं वाच वाच." शशांक डोळे मिचकावीत म्हणाला, "तुला कोणी उद्दाम म्हणणार नाहीं. अवतरणचिन्हांतलं तें संबोधन आहे."

"....तुम्हीं मला कळविलेंत त्याप्रमाणें शंका निरसन करणारें एक पत्र मीं छायाला आजच टाकिलें आहे. तिच्या पूर्वीच्या जीवनांत असें गर्ह्य कांहींच नव्हतें कीं, जें सांगितल्यानें तिच्याविषयीं प्रकाशचें मन गढूळ व्हावें. परंतु मीं मत्सरामुळें कांहीं गोष्टी विकृत करून प्रकाशला सांगितल्या असतील, असें जर छायाला वाटत असेल तर तिचा तो ग्रह आतां खास नाहींसा होईल. तुमचें म्हणणें अगदीं सत्य आहे ! सध्यांच्या तिच्या कष्टी मनःस्थितींत आणखी संशयाचा अंगार भडकूं नये. बरें केलेंत तुम्हीं मला सांगितलें तें ! कारण तिला अशी संशयबाधा झाली आहे हें एरव्हीं मला कसें कळलें असतें ? किशोर, तुमच्या चांगुलपणाबद्दल आणि तत्परतेबद्दल तुम्हांला किती धन्यवाद देऊं ! छायाचें दुःख कमी करण्याची संधि तुम्ही मला दिलीत ! तिला कोणतेंहि दुःख नसावें, आणि माझ्यामुळें तर यत्किंचितहि दुःखबाधा न व्हावी. ती बाधा दूर करण्यासाठीं मी स्वतःवर वाटेल तो आरोप लादून घेईन, पण किशोर ! या विचित्र माणसाची एकच विनंति. प्रकाशच्या मनांत छायाविषयीं किल्मिष नाहीं अशी एकदा प्रकाशनेंच छायाची खात्री पटविली, म्हणजे योग्य क्षण पाहून एक गोष्ट करा. 'लैला अडवाणी'ची कथा कल्पित आहे हें छायाला सांगा. म्हणजे माझ्याविषयीं तिचें कलुषित झालेलें मन शुद्ध होईल जग मला विचित्र समजो, पापी समजो, छायाला मात्र मी अवनत न वाटावा. कराल ना एवढी कृपा ? तुम्ही सर्वांनीं माझ्यावर अकारण लोभ ठेवून ऋणाचे डोंगर रचिलेत. त्यांत एवढें कठीण नाहीं. तुमचा सर्वांचा पुढील काळ सुखाचा होवो. निराशेच्या तापानें तापलेल्या वालुकामय जीवनभूमिकेंत, अज्ञात स्थितींत भटकत असतां तुम्हा सर्व देवमाणसांच्या कल्याणासाठींच मी अहर्निश प्रार्थना करीत राहीन. तुमचा-कृष्णचंद्र."

पत्र वाचून सर्वांचींच अंतःकरणें व्यथित झालीं. छायाच्या गूढ अहंकाराचें समाधान झालें. आणि विशेषतः किशोरनें आपल्या सुखासाठीं जी कामगिरी केली, त्याची तिला विशेष धन्यता वाटली. ती अगदीं सद्गदित होऊन म्हणाली, "किशोर, तुमची ही आस्था पाहिली म्हणजे खरोखरच वाटूं लागतें कीं माझा शामकान्त अद्याप जिवंत आहे, अगदीं माझ्याजवळ माझ्या सुखासाठीं झटतो आहे."

---

## .३०. छायाप्रकाश

गेल्या चार महिन्यांत जीवनचक्रें किती वेगानें फिरलीं !

प्रकाशखेरीज इतरांना भोंवळ आली होती. प्रकाशची मनोरचनाच अशी होती, कीं कोणत्याहि अनपेक्षित संकटानें किंवा दुर्दैवी घटनेमुळें त्याच्या धैर्याचा तोल जाऊंन नये. त्याच्याहि भावना इतरांप्रमाणें हळुवारच होत्या. पण अस्थैर्य ही जीवनाची प्रकृति आहे, आपल्या अंतःप्रेरणेनें केलेल्या कामांत अक्षर आनंद आहे, ही त्याची वृत्ति असे. पण ही वृत्तीहि त्याची त्याला उमगत होती असें नाहीं, किंवा ती त्यानें मोठ्या व्रतवैकल्यानें अंगीं आणिली होती असेंहि नव्हे.

'दुपारची विश्रांति' या शशांकच्या चित्राला एका प्रदर्शनांत सुवर्ण पदक मिळाल्याचें वर्तमान आलें. 'प्रकाश चित्रमंदिरा'चें कामहि आतां मार्गाला लागल्यासारखें झालें. पण शेवंतीचें गूढ दुःख त्याला विव्हल करीत होतें. तिच्या संसाराची वाताहात झालेली पाहून त्याला वाईट वाटे. पण तिला सुखी करतां येईल काय ? हा कूटप्रश्न त्याला सोडवितां येत नसे.

—आणि शेवंती ! तिच्या वेदनांचें पृथःकरण करणें कठीणच. गंगारामसाठीं इतकी धडपड करून अखेर त्यानें आत्महत्येचा मार्ग पत्करिला ! आणि पुनः आत्महत्येचें कारण तर गूढच राहिलें. आपलें काय चुकलें, त्याला काय संशय आला कांहींच कळलें नाहीं. पण दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडून अखेर शशांकचाच आश्रय घ्यावा लागला, यामुळें फुटलेले संतोषाचे पाझर तिच्या दुःखांत तेवढीच शीतळता उत्पन्न करीत, हें सर्वांना कळून चुकलें होतें.

सुलभाला किशोरनें ऐनवेळीं संकटांतून सोडविल्यामुळें शेकडों उपदेशवचनांनीं होणार नाहीं एवढा परिणाम तिच्यावर झाला. किशोर त्यावेळीं तेथें आला नसता तर काय झालें असतें, या कल्पनेनें तिला अजूनहि घाबरल्यासारखें होई.

किशोरला कृतकृत्य झाल्यासारखें वाटायला कांहींच हरकत नव्हती. पण आपल्या सुखाच्या ऐन वसंत काळीं आपल्या प्रिय भगिनीच्या–चित्रलेखाच्या आशेची पालवी कायमची झडून गेलेली असावी याची त्याला खंत वाटे.

छायाला मिळायचें तें मिळालें होतें. परंतु आतां पितृनिधनानंतर आपण प्रौढ झालों या तापदायक गोष्टीचा तिला विसर पडला नव्हता. बाबा असते आणि आपलें लहानपण हरपलें नसतें, तर आज मिळालेल्या सर्वस्वाला किती गोडी आली असती.

अशा तऱ्हेच्या सुखदुःखमिश्रित भावनांनीं भारावलेले ते तरुण जीव मुठेच्या लहान पुलावरून शहरांत यायला निघाले होते. आज सकाळपासून प्रकाश त्यांना भेटला नव्हता. तो कसल्या कामांत गर्क आहे हें त्यांना कळेना. अखेर 'आनंदभुवन' कडून 'शांतिनिकेतन' कडे येणाऱ्या त्याच्या आवडत्या रस्त्यानें मंडळी निघाली. हेतु हा कीं तो आपल्याकडे निघाला असल्यास त्याची चुकामूक पडूं नये.

संध्याकाळ झाली होती.

एक पक्षी वर उडतां उडतां अगदीं काटकोनांत पाण्यावर पडून पाण्याच्या पृष्ठावर आलेला मासा धरून नेई. नदीच्या एका बाजूच्या डबक्यांत कांहीं लव्हाळे माजले होते आणि चार पांच बगळ्यांची बैठक भरली होती. परीट कपडे घेऊन निघाले होते. कोळ्यांनीं जाळीं काढून स्नानें आटोपलीं आणि तेहि घराकडे परतत होते. चोहीबाजूच्या झाडींतून घराकडे वळलेल्या खिल्लारांचे घंटातरंग ऐकूं येत. पुलाच्या मत्स्यांवर एक दोन रसिक जोडपीं खळखळणाऱ्या प्रवाहांत पाय सोडून गुजगोष्टी करीत बसलीं होतीं. त्या एकंदर रम्य पण कांहींशा उदास देखाव्यांत आपल्या जीवनांतील चांगल्या वाईट घटनांचें प्रतिबिंबच जणूं प्रत्येकाला भासमान होत होतें, आणि त्यांमुळेंच कीं काय कोणी कांहीं बोलत नव्हतें.

इतक्यांत शशांक म्हणाला, "काय करावं, प्रकाश कुठं गेला कांहीं कळत नाहीं."

'अरे त्याला आतां अस्मान ठेंगणं झालंय्.' सुलभा छायाकडे पाहात गमतीनें म्हणाली; सर्वांत आज प्रकाशच अधिक सुखी आहे याबद्दल सुलभाच्या मताला सर्वांनीं दुजोरा दिला असता.

—तोंच समोरच्या उतरणीवरून प्रकाश झपाझप येतांना दिसला. त्यानें खिशांत हात घातले होते, आणि इकडे तिकडे न पाहतां तो ताठ मान करून झरझर चालत होता.

मित्रमंडळी पाहतांच तो थबकला.

"—अरे वा !"

"काय भाई, आपणाला बंधमुक्त केलं तें असं मित्रांना चुकवून हिंडण्याकरितां नव्हे." किशोर म्हणाला.

प्रकाशचा चेहरा किंचित् त्रस्त दिसत होता. पण बळेंच हंसून तो म्हणाला, "नाहीं नाहीं, मित्रांची सोय पुनः एकवार पाहिली जाणार असें दिसतें."

"म्हणजे ?" सर्वांच्या मुखांतून एकच उद्गार बाहेर पडला.

"कुठल्याहि सभेंत भाषण करायचं नाहीं, आणि परवानगीवांचून पुणं सोडायचं नाहीं अशा अटी माझ्यावर घातल्या जाणार अशी बातमी आहे. म्हणजे आतां कांहीं काल तरी मित्रांजवळ राहण्यावांचून गत्यंतर नाहीं !"

सर्वांचा उल्हास मावळला. सर्वजण विचारमग्न झाले.

"मघाशींच कुणींतरी म्हटलं कीं, पुढचं काय होईल तें होवो, पण आजच्या घटकेला तरी निदान प्रकाश अगदीं निर्भेळ आनंदांत आहे ! नेहमीं निदान पैशाची विवंचना तरी असायची, पण रघुनंदनांनीं अगदीं आग्रहानं महिन्याला आपणांकडून पन्नास रुपये घ्याच असं याला सांगितल्यामुळें तीहि कटकट राहिलेली नव्हती. किती जुळून आल्या होत्या गोष्टी ! पण शेवटीं थोडासा विरस झालाच. माणसाचं जीनवचित्र रेखाटण्यांत दैवानं कोणतं तंत्र निश्चित केलं आहे देव जाणे !"

## छाया–प्रकाश

सिंहगडाच्या शिखरावर अखेरचें पाऊल टेकून उभ्या असलेल्या रविप्रभेकडे आणि बाजूच्या टेकड्यांना अंधारांत बुडविणाऱ्या रजनीकडे दृष्टि फेकून, शशांकला उत्तर देण्यासाठीं किशोर उद्गारला—

"छाया–प्रकाश !"

